

## उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१


'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७




॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. रेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक - श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक - डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य - डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख - ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे - श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण - श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे - श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्त्या - पारितोषिके देत आहे -

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/- ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/- खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वतः मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करून घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी - श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



थोरले राम (गोंदवले)



श्रीमहाराजांचे गुरु श्रीतुकाई महाराज



श्रीमहाराजांचा तरुणपणातील फोटो



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी,

पुणे ४११ ०३७.

टेलिफोन क्रमांक : ५१००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये

नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -

ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१

कलम ८०ग खाली आयकर सवलत क्रमांक :

पी एन् / ६५ / डी २० / १९९६-९७ दिनांक २३-६-९६

१-४-९६ ते ३१-३-९९ या कालावधीसाठी आयकर सवलत प्राप्त



**असे राम हा नित्य आनंदरूप**
**जगा व्यापितो ना दिसे सूक्ष्मरूप ।।**
**न कर्ता न भोक्ता वसे साक्षिरूप**
**उपाधिविना 'मी' खरा ब्रह्मरूप ।।**

**प. पू. कै. प्रा. के. वि. बेलसरे**

# श्रीगोंदवलेकर महाराजांचे हस्ताक्षर

श्री

गोंदवले चैत्र शु॥।२ १८२९

अनेक आसिरवाद उपरि वि ॥. येथे येताच तिकडे येण्याचा विच्यार होता पण भा व दादांचे सुतक असल्यामुळे तसे करता आले नाही. तुमची यावयाची इच्छा असल्याचे समजले पण घरच्या मंडळीस या प्रसंगी इकडे आल्यास वाईट वाटेल. माझा तिकडे येण्याचा विच्यार आहे. परंतु तुमची मर्जी मला मोडवत नाही. यासाठी तुमच्या मर्जीवर ठेवतो जसे तुम्हास वाटेल तसे करावे. सुज्ञाप्रति फार काय लिहावे हा आसिर्वाद

ब्रह्मचैतन्य

द. खु.

(मोडि लीपितील पत्राचा मराठी अनुवाद)

---

श्रीराम समर्थ

श्रीराम भक्त परायण सर्व उपमा योग्य राजमा
न्य राजेश्री ब्रह्मानंद बुवा मु. तेरदाळ यासी
अनेक आसीरवाद विशेष जी होण्याचे कारण
तुमचे पत्र पोचले त्यांचे सुखालीबद्दल फार
आनंद जाहला असाच अखंड अपव रामा-
ची सेवा करत असावे. विजापूर वालेस इक
डे येऊन जाणेस कळवावे. मासी प्रकृती बरी
आहे फक्त थोडासा थ्यास मधून मधून होतो

खबरी आहे समस्त मेथे अंती सुख झाले
ईल फार लिहिता येणार नाही कारण तु
लिहावे लागेल. सोडुनी क्रोध काम लोभ मोह
सर्व अभिमान स्व आनंदाने करावे स्वी-
स्तु हेच आयकावे भजन तुम्ही माझे
वाचे जीवन प्राण येवढेची सांगणे असे ए
कलावे हा आसीरवाद. ब्रह्मचैतन्य.
सर्वत्र अपकार मंडळीस माझा फार
फार आसीर्वाद सांगावा. ब्रह्मचैतन्य.
श्रीराम समर्थ



# संपादकीय

'जयाचा जनी जन्म नामार्थ झाला ।
जयाने सदा वास नामात केला ।।
जयाच्या मुखी सर्वदा नाम कीर्ति ।
नमस्कार त्या ब्रह्मचैतन्य मूर्ति ।'

नामाचा महिमा सांगण्यासाठीच ज्यांचा जन्म झाला, भगवंताच्या नामाची थोरवी गात गात ज्यांनी आयुष्याचा प्रत्येक क्षण वेचला आणि आयुष्याच्या अखेरच्या क्षणापर्यंत ज्यांनी नामसाधनेचे महत्त्व सांगितले असे आधुनिक काळातील महान संत प. पू. ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांचे चरणी 'कल्याणी' अंकाचे या वर्षीचे साहित्य पुष्प श्रद्धायुक्त अंतःकरणाने समर्पित करण्यात येत आहे.

साधु वेगळाले दिसती । परि अंतर्यामी ते एकचि असती ।।. अंतर्यामी एकची असती म्हणजे सर्व साधुसंतांच्या जीवनाचे ध्येय एकच असते आणि ते म्हणजे सर्वसामान्य प्रपंचाभिमुख असणाऱ्या माणसांना भक्तीमार्गाच्या वाटेला वळवून भगवंताभिमुख करणे हे होय. भक्तीमार्गाचे जे नऊ प्रकार आहेत त्यातील नामस्मरण भक्ती ही सर्वांना आचरणात आणण्यास अतिशय सुलभ अशी आहे. त्यामुळेच सर्वसामान्य माणसांची कुवत ओळखून सर्व साधुसंतांनी नामस्मरण भक्तीचा पुरस्कार केला आहे. संतश्रेष्ठ ज्ञान माऊलींनी पण हरिपाठाद्वारे नामाची महती सांगितली आहे.

सुलभ अशा नामस्मरण भक्तीचा महिमा सांगणारी प. पू. महाराजांची प्रवचने म्हणजे भक्तांना नामामृताची मेजवानीच आहे. भगवंताचे नाम त्यांनी जितक्या मुक्तहस्ताने वाटले तितक्याच मुक्तहस्ताने त्यांनी अन्नदान पण केले. त्यांची ही परंपरा त्यांच्या भक्त मंडळींनी आजही चालू ठेवली आहे. याचे प्रत्यंतर श्रीक्षेत्र गोंदवले येथे गेले की लक्षात येते. 'जय जय श्रीराम । जय जय श्रीराम' हा नामजपाचा घोष त्या ठिकाणी ऐकला की असे म्हणावेसे वाटते :

नामजपाचा अमोल ठेवा ।
रामनाम हे अमृत जीवा ।।
नाम जपे रे दुःख विसरले ।
माझे मी पण विसरून गेले ।।

दरवर्षी प्रमाणेच या वर्षीचा कल्याणीचा विशेषांक पण आपणास निश्चितच आवडेल. कारण विचारवंत लेखक व प. पू. महाराजांचे भक्त यांनी अतिशय श्रद्धेने आपले अनमोल लेख देऊन अंकाची शोभा वाढवली आहे व आम्हाला उपकृत केले आहे. नुसते शाब्दिक आभार मानून याची फेड होणार नाही, हे आम्ही जाणून आहोत. तरीसुद्धा एक औपचारिक शिष्टाचार म्हणून आम्ही त्यांचे आभार मानीत आहोत.

त्याच प्रमाणे ज्यांच्या सहकार्याने हा अंक निघू शकतो अशा सर्व जाहिरातदारांचे पण आम्ही आभारी आहोत. व्यावसायिक मंदीच्या झळीची आच सोसून त्यांनी आम्हाला जाहिरातीच्या रूपाने अर्थ सहाय्य केले आहे हे आम्ही विसरू शकणार नाही.

लेखक, जाहिरातदार, अंक काढण्यासाठी हस्ते परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे आभार मानल्याशिवाय आम्हाला रहावत नाही. या सर्वांचे आम्ही सदैव ऋणी आहोत.

वाचकांचा प्रतिसाद, हितचिंतकांच्या सदिच्छा या बळावर 'ओंकार' न्यासाची वाटचाल सुरू आहे. न्यासाच्या उज्वल प्रगतीची वाटचाल अंकामध्ये स्वतंत्रपणे समाविष्ट केली आहे.

जय जय रघुवीर समर्थ

**सौ. रजनी काळे**

# अनुक्रमणिका

## कविता



## भवसागर

भवार्णवाच्या भोवऱ्यामध्ये सापडली मम होडी रे
पाण्यावरती राहू कैसी माया ममता वेडी रे
दुःख सुसर ही लचके तोडी मस्तकात कळ जाते रे
अहंकार कधी शिखरी नेई कधी पाताळी बुडवी रे
काम मगरीची मिठी सुटेना तिरस्कार त्या संगे रे
भूल पाडितो मद मत्सरही पाठ सोडिना कैसी रे
वासनेची बसली नागिण वेटोळे ते निसटेना
संसाराचा भार शिरावर कुळाभिमानही उतरेना
अज्ञानाचा दगड बांधुनी जीव तराया बघतो रे
त्या दगडावर 'राम' लिहून घे भवसागर मग तरसी रे

**सौ. मंजिरी कुलकर्णी**




ओंकार ट्रस्ट १९९९ चा **"श्री गोंदवलेकर महाराज"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.

टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** असून तो विनामूल्य आहे.

(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.





**मुखपृष्ठ संकल्पना**
सौ. अंजली पुरंदरे

**व्यवस्थापकीय सहकार्य**
शाम देऊळकर
अनंत सर्व्हीसेस, पुणे ३८.

**अक्षरजुळणी**
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४.

**छपाई**
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४.

**प्रोसेसिंग**
फिक्सेल ग्राफिक्स प्रा. लिमिटेड, शनिवार पेठ, पुणे - यांच्या सौजन्याने.

# कै. प्रा. के. वि. बेलसरे यांनी सांगितलेली नामस्मरणाची प्रक्रिया

**शब्दांकन - डॉ. वा. रा. अंतरकर**

*कै. प्रा. के. वि. बेलसरे, एम. ए. (थिसिस) लॉजिक व फिलॉसॉफी प्रोफेसर, खालसा कॉलेज. सायकॉलॉजी प्रमुख, सिद्धार्थ कॉलेज, २५ वर्षे नोकरी. श्रीमहाराजांशी संबंध तत्त्वज्ञान व अध्यात्म याचा गाढा अभ्यास. मालाड व गोंदवले येथे प्रवचने. श्रीमहाराजांचे चरित्र गाजले. मोठी ३ व लहान १५ पुस्तके प्रसिद्ध*

*(३१ वर्षांपूर्वी (१३-८-१९६७) कै. प्रा. के. वि. बेलसरे यांनी मला वरील विषय तोंडी समजाऊन सांगितला होता. तो मी तसाच पण यथास्मृति लिहून ठेवला होता. त्यांनी सांगितलेला व मी लिहून ठेवलेला मजकूर पुढील प्रमाणे होता. या लिखाणात कोणत्याही प्रकारची चूक असल्यास ती माझी आहे एवढे मात्र लक्षात ठेवावे.)*

नामस्मरणाचा विचार करताना प्रथमच लक्षात ठेवायची गोष्ट म्हणजे नामस्मरण हे परमेश्वर प्राप्तीचा मार्ग म्हणून करावयाचे असते. म्हणून ईश्वर, ईश्वराची प्राप्ती या गोष्टी यात गृहित धरलेल्या आहेत. कोणत्याही (लौकीक) वासनेच्या पूर्ततेकरता म्हणूनही जेव्हा नामस्मरण किंवा जप केला जातो तेव्हाही पूर्ती ही शेवटी परमेश्वरच करीत असतो. जे काही फळ म्हणून येते ते त्याच्याकडूनच येते. तो दाता आहे ही भावना त्यात असते. (गीता - ७ : २१,२२ हे श्लोक पाहावे).

१) आता ईश्वर कसा आहे याचा विचार केला तर त्याची ४/५ लक्षणे (Characteristics) सांगितली जातात. तो अतिंद्रिय, अन्तर्यामी, सर्वव्यापी, सर्वसाक्षी व सर्वशक्तिमान् आहे. तो शक्तिमान् आहे, शक्तिरूप (चिन्मय किंवा चिद्रूप) आहे. पण ही सर्व लक्षणे सामान्य (Universal) स्वरूपाची आहेत. ईश्वरप्राप्तीकरिता या लक्षणांशी संबंध ठेवता आला पाहिजे. (We must be able to establish contact with the universal) मनुष्य हा मर्यादित (finite and particular) आहे. त्याला ईश्वरासारख्या अत्यंत सूक्ष्म तत्त्वाशी संबंध ठेवायला साधन म्हणजे बुद्धी होय. बुद्धीचे स्वरूप विचार, आणि विचार अर्थमय आहे. अर्थाचे प्रतिक शब्द आहे. म्हणून त्या ईश्वराशी संबंध ठेवायला शब्दाची जरुरी आहे. नाम हा शब्द आहे. ते नाम जर सारखे उच्चारीत राहिले तर हळूहळू तो संबंध उत्पन्न होतो व शेवटी ईश्वरप्राप्ती होते.

हे नाम स्वतःचे स्वतः (म्हणजे दुसऱ्या कोणाकडून न घेता, आपल्या मनाने) घेतले तर उपयोग होतोच. जडाचे नाम व सूक्ष्माचे - त्यातल्या त्यात सूक्ष्मतम अशा ईश्वराचे किंवा भगवंताचे नाम यात फरक असतो. भगवंताचे नाम चैतन्यमय असते, स्वतः शक्तिमय असते व ते आपण घेतले तर हळूहळू आपले काम होते. पण तेच नाम एखाद्या सिद्ध पुरुषाकडून आले तर त्याचा फायदा अधिक होतो. शब्द (नाम) अर्थ - विचार म्हणजे संकल्प - अशी ही मालीका (Chain) आहे. म्हणजे, शेवटी नाम हे विचारातून किंवा संकल्पातून येते. संतांचा संकल्प मूळ संकल्पाशी एकरूप असतो. तो चिन्मय म्हणजे शक्तिरूप असतो. त्यातून जे नाम येते ते विशेष शक्तिरूप असते. म्हणजेच, ती सत्ता (Power) त्यांनी दिलेल्या नामाच्या मागे अधिक असते आणि म्हणून ते घेत गेले तर त्याचा उपयोग अधिक होतो. ते सांगतात ते नाम त्या शक्तिरूप संकल्पातून स्फुरते व म्हणूनच मी त्यांच्यामागे असतो, मी त्यात आहे असे महाराज म्हणत असत.

नाम घेताना आपण त्यासारखे झाले पाहिजे. त्या संकल्पापर्यंत पोचले पाहिजे. ते होण्यास - म्हणजे नामस्मरणाचा उपयोग होण्यास एक उत्कट तळमळ तरी पाहिजे व ती पाहिजेच, दुसरे काही नको. म्हणजेच शरणागती पाहिजे किंवा गुरुकृपा पाहिजे. म्हणजे त्याने निवडले पाहिजे. त्याला कोणीतरी तयार करण्याची इच्छा असली तर तो हा मनुष्य मंद असला तरी त्याला शक्ति देऊन तयार करतो. असा मनुष्य एकदम पुढे जातो. तो का निवडतो हे नेहमीच सांगता येत नाही. वेदान्तात त्याचे पूर्वकर्म, पूर्वजन्मीची तयारी, संस्कार वगैरे सांगतात. पण ती गुरुची कृपा का ते माहीत नाही हेच खरे. आपल्याला का निवडले हे त्याचे त्यालाही सांगता येत नाही. अर्जुनाची तीच परिस्थिती होती. सर्व पांडवांत तोच का निवडला गेला. याला श्रीकृष्णाची इच्छा याशिवाय दुसरे खरे कारण सांगताच येत नाही. ते ठाऊक नाही म्हणून तर त्याच्या शंका व गीतातत्त्वज्ञानाची उत्पत्ती झाली. जर त्याला बरोबर माहीत असते तर तो कर्म बरोबर करून मोकळा झाला असता. जेव्हा त्याला बरोबर कळले तेव्हा 'करिष्ये वचनं तव' म्हणून कर्म केले. त्या शिकवणीचा रोखही हाचआहे. ही **अनुभवाची (Mystical) बाजू झाली.**

२) माणसाच्या मनाचे तीन थर आहेत. त्यातील खालील थर फार खोल आहे व त्यात अनेक जुने संस्कार - त्या रूपांतील घाण आहे. ते सर्व संस्कार वर आणून काढले पाहिजेत. त्याच्याकरिता जाग्रदवस्थेत नाम घ्यायला लागले पाहिजे. ते नाम मनाला लपेटले गेले म्हणजे ते हळूहळू खाली जाऊ लागेल. मग जागेपणीच स्वप्नावस्था येईल आणि त्यापुढे सुषुप्तिही येईल. शेवटी तिन्ही अवस्था (जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति) ओलांडून जागेपणी समाधी (अवस्था) येईल. हीच तुरीयावस्था होय. हे होताना सुरुवातीला तो व्यवहाराला निरुपयोगी होईल. विशेषतः त्या अवस्थेत असताना. परंतु पुढे ती अवस्था मुरली म्हणजे तसे होणार नाही. नाम घेताना तो (मनुष्य) हळूहळू आत जाईल व एरवी तो वर येईल पण ती (म्हणजे आतली) अवस्था घेऊन वर येईल. म्हणजे त्याचा मूळ स्वरूपाशी संबंध आला आहे तो घेऊन वर येईल. त्याचे जोरावर तो पुनः आत जाऊ शकेल. दोरी बांधून घागर पाण्यात जाते व दोरीच्या साहाय्याने वर येते तसे हे आहे. घडा म्हणजे मन, दोरी म्हणजे

नाम. **ही मानसशास्त्रीय (Psychological) बाजू झाली.**

३) वेदान्ताच्या दृष्टीने मूळ परमात्मस्वरूपच जीवरूपाने प्रकट झाले आहे. प्रत्येक माणसात ते बिन्दुरूपाने प्रकट झाले आहे. एखादा दारूचा फटाका फुलून वर जाणे व आकाशात फुटून ठिणग्या पडतात तसे हे झाले आहे असे श्रीमहाराज म्हणत. तो बिन्दु शक्तिरूप आहे. ती शक्ती माणसात बेंबीचे ठिकाणी आहे. तो (बिंदु) वाणीच्या रूपाने चार ठिकाणी व्यक्त होतो. दगड-मातीतही तो पण अगदी सुप्त रूपाने आहे. वनस्पतीत तो जाणीवरूप आहे पण त्यांना सुख-दुःख भावना नाहीत. जनावरांत मध्यमा वाणीपर्यंत प्रकटीकरण आहे. त्यांना भाषा कळते पण बोलता येत नाही. माणसात तो (बिंदु) वैखरीपर्यंत प्रकट झालेला आहे म्हणून त्याला बोलता येते. पण माणसाचा सर्व व्यवहार बाहेरच (म्हणजे दृश्यात) चाललेला आहे व सर्व शक्ती वाटली जाऊन फुकट जाते. ती सर्व आवरून वाणीचा उपयोग नामाकरता करावयाचा व उलट क्रमाने आत आत जायचे. जसाजसा तो बिंदु (म्हणजे त्याची शक्ती) आत जातो तशातशा शक्ती प्रकट होऊ लागतात व पश्यंतीपर्यंत आल्यावर मूळ शक्तीला धक्का मिळाल्यासारखे होते व परावाणीला पोचल्यावर बिंदुदर्शन होते व अनाहत नाद ऐकू येऊ लागतो. त्यात तो मुरला म्हणजे आपल्या बिंदूतून तो विश्वबिंदूकडे जातो, म्हणजेच तो सर्वव्यापी होतो. पहिली अवस्था 'अहं ब्रह्माऽस्मि होय' व दुसरी 'सर्वं खल्विदं ब्रह्म' ही होय. मग तो सर्व शक्तिमान होतो. **ही तत्त्वज्ञानाची (metaphysical) बाजू झाली.**

४) ही जी बिन्दुस्थानीय चिच्छक्ति आहे तिला योगशास्त्रात कुण्डलिनी म्हणतात. तिचे शरीरातील व्यक्त स्वरूप म्हणजे Vitality आहे आणि तिचे केंद्रस्थान प्राण आहे. ही शक्ति अधोमुख म्हणजे विषयाभिमुख आहे व ती ऊर्ध्वमुख म्हणजे आत्माभिमुख करावयाची. त्याकरता मुख्य जो प्राण त्याचा निरोध करून तो ताब्यात आणायचा प्रयत्न ते करतात. बाहेर जाणाऱ्या सर्व शक्तींना आवर घालून ती शक्ति केन्द्रीभूत करून आत ठेवायची. ती ताब्यात आली म्हणजे कुण्डलिनीला त्याचा धक्का बसतो. त्यालाच ती जागृत होते असे म्हणतात व मग ती वर जाऊ लागते असे म्हणतात.

५) पूर्वीच्याच बाजूतून पुढची म्हणजे नैतिक अथवा ethical बाजू येते. आत्मदर्शनाला किंवा कुण्डलिनी जागृत व्हायला प्राणावर ताबा आला पाहिजे, म्हणजे सर्व शक्ती आवरून ती केन्द्रित व्हायला पाहिजे. माणसाची शक्ती अनंत मार्गांनी बाहेर जात असते. निरर्थक बोलणे किंवा निंदेसारखे घातक बोलणे, पाहणे, शरीराच्या क्रिया, काळजी करणे, द्वेष करणे, क्रोधादि विकार वगैरे सर्व शक्तिक्षय करणाऱ्या गोष्टी आहेत. या सर्व बाजूला सारून या सर्व शक्ति राखून आत आणल्या पाहिजेत. या सर्वांत कामवासना फार प्रबल आहे. या सर्व शक्ति ताब्यात आणल्याशिवाय त्या केन्द्रित होऊन आतील शक्तीवर ताबा येणारच नाही. त्याशिवाय पुढची प्रगती होणार नाही. म्हणून नीति हा पारमार्थिक प्रगतीचा पाया म्हटला जातो. एकंदर ध्येयप्राप्तीच्या दृष्टीने याचे महत्त्व गौण खरे (Secondary) पण सुरुवातीच्या अवस्थेत त्याचे स्थान फार मोठे आहे. म्हणून संत त्याच्यावर जोर देतात. पातंजल योगसूत्रातही यमनियमादी सांगितले आहेत, त्याचे महत्त्व व मर्म यातच आहे. त्याने त्यातच संतोष फार महत्त्वाचा म्हणून वर्णन केला आहे. मन प्रसन्न असल्याशिवाय आत लागणे कठीण आहे. नीतीचे मुख्य कार्य हेतू शुद्ध करणे व जगाला उपयोगी, उपकारक असे कर्म करणे. मनाचा आज असलेला कल बदलायला या वरील गोष्टींची फार आवश्यकता आहे; आणि तो बदलेल तेव्हा निःस्वार्थ जगाला उपयोगी / उपकारक कर्म घडेल. दुसरा आपल्याजवळ जसा वागावा असे आपणास वाटते तसे आपण त्याच्याजवळ वागणे ही नीति असे श्रीमहाराज म्हणत. यातील मर्मही हेच आहे. हे लक्षात ठेवले तर आपला मनोधर्म व मग होणारे कर्म पालटलेच पाहिजे. थोडक्यात म्हणजे हे दोष घालवून आपण प्रथम खरा मनुष्य झाले पाहिजे. विशेषतः विकाराच्या अधीन असणे हे पशुत्वाचे लक्षण असून मनुष्यत्वाला कमीपणा आणणारे आहे. त्याचेवर ताबा मिळवणे म्हणजे मनुष्य म्हणून जगायला शिकणे व लागणे होय. मनुष्यत्व बाणल्यावर मग देवत्वाची गोष्ट. म्हणून नामस्मरणालासुद्धा या गोष्टींचे महत्त्व आहे. **नामस्मरणाची ही नैतिक (Ethical) बाजू झाली.**

६) आता एखादा मनुष्य असा प्रयत्न करू लागला म्हणजे त्याला बळ लागते. पण तेच मन एखाद्या समुदायात - एकत्र असाच प्रयत्न करणाऱ्यांच्या समुदायात राहिले तर ते (मन) ती गोष्ट अधिक सहजपणे करू शकते, कारण तेथे group mind (समूह मन) व group consciousness (सामूहिक जाणीव) निर्माण होऊन ते वातावरण तयार होते आणि त्याच्या मनाला त्या प्रयत्नाला चिकटून उत्साहाने ते पुढे चालू ठेवण्यास उपयोग होतो. म्हणून सामुदायिक जप किंवा भजने केली जातात. ही नामस्मरणाची सामाजिक (Social) बाजू झाली.

७) भाषेच्या दृष्टीने, जगातील सर्व गोष्टी संकेतमय किंवा सांकेतिक आहेत. ज्याप्रमाणे सर्व वाणी संकेताने भरलेली किंवा संकेतात्मक (symbolical) आहे त्याप्रमाणे देह आत राहणाऱ्या जीवात्म्याचा संकेत आहे.देहाला तशी स्वतंत्रतया किंमत नाही. म्हणून देह आतल्या आत्म्याकरता आहे किंवा मी परमात्म्याकरता आहे ही भावना ठेऊन राहाणे हे अत्यंत जरूर आहे. नाम घेण्याचा अर्थ तोच आहे. ज्याचे नाम तो खरा आहे, मी नाही हा त्याचा अर्थ आहे व मी त्याच्याकरता आहे ही भावना ठेऊन नाम घेतले तर नामस्मरणाचा शेवट लवकर गाठता येतो. ही नामस्मरणाची भाषेची (Language) बाजू झाली.

जगातील सर्व व्यवहार भगवंताच्या सत्तेने होत असतात. त्या शक्तीचे स्पन्दन सदैव चालू असते. हे जे आत्मशक्तीचे सहज स्पन्दन चालते त्यालाच अजपाजप - अजपेचा जप - म्हणतात. जगातील सर्व व्यवहार त्या शक्तीने चालतात. माणसाला ही जाणीव नसून मी करतो हा अहंकार आहे. तो साधनाने जाऊन जीव जेव्हा वस्तूस्वरूपात मिसळतो तेव्हा तो पूर्णपणे तद्रूप होऊन त्या शक्तीच्या स्वाधीन होतो. तो वागवील तसा बिनतक्रार वागतो व त्यात स्थिर राहतो. त्याच्यात ही अवस्था येते त्या वेळी त्याच्यातील अहंकाराचा भाव जाऊन आत्मशक्तीचे

जागृतीच फक्त शिल्लक असते. ती अखंड व सहज असते. म्हणून त्याच्या ठिकाणी अजपाजप सुरू असतो असे म्हणतात. त्या शक्तीचे स्फुरण इतके खोल जावे लागते व ते इतके खोल जाते की ते रोमारोमात भिनते व मग वेळप्रसंगी ते परिचयाच्या नामोच्चाराच्या रूपाने शरीरातून त्या माणसाला पाहिजे त्या भागातून प्रकट होते. ते अनुसंधान चालू असते पण नामोच्चार चालू असतोच असे नाही, पण तो त्या माणसांना प्रकट करून दाखविता येतो. श्रीमहाराजांनी श्री. महादेव चिंतामणी केळकर (साहित्य सम्राट श्री. न. चिं. केळकर यांचे वडील बंधू) यांना हे दाखविले होते. (वाङ्मयशोभा - सप्टेंबर १९५७ चा अंक - 'माझे गुरू' हा त्यांचा स्वतःचा लेख). चोखोबांच्या हाडांतून 'विठ्ठल विठ्ठल' असा ध्वनी येत होता असे म्हणतात, त्याचा अर्थ हाच आहे.

नामस्मरण करू लागल्यावर प्रथम मेंदूवर - त्यातील वाणीच्या केंद्रावर (Speech - centre) होतो व तेथे सूक्ष्म स्पंदन चालू होते. शब्द अर्थमय आहे. त्याचे सूक्ष्म स्पन्दन सुरू झाले म्हणजे त्याचा मनावर आपोआप परिणाम होतो आणि मन आणि प्राण एकाच शक्तीच्या दोन बाजू असल्याने मनावर परिणाम झाला की प्राणावर (vitality) परिणाम होऊ लागतो. याप्रमाणे सतत चालू राहिले तर शेवटी प्राणावर ताबा येऊन माणूस आत्मदर्शनापर्यंत जातो. हे आपोआप होते व म्हणून इतर भानगडीत न पडता नीति सांभाळून नुसते नाम घ्या असे श्रीमहाराज म्हणत असत.

डॉ. वा. रा. अन्तरकर,
बी - ५, जयराम निवास, ११६, टिळक मंदिर रोड,
विलेपार्ले, पूर्व, मुंबई - ४०० ०५७. दूरध्वनि - ६१७१९१७

(प्राचार्य श्री. श्रीपाद केशव बेलसरे यांचे सौजन्याने)

---

- **हाताने प्रपंचाचे काम, मुखाने भगवंताचे नाम आणि अन्तःकरणात समाधान एवढाच परमार्थ मला कळतो. बाकी सर्व वेदांत आहे.**
- **कर्तव्याची जागृती व त्यात भगवंताची अखंड स्मृति किंवा कर्तव्यात स्मरण हे सर्व गीतेचे सार आहे.**
- **होईल तितके शास्त्र सांभाळावे, प्राणाबरोबर नीति सांभाळावी आणि प्राण गेला तरी शिल्लक राहील इतके नाम घ्यावे.**

# "नामा लागी अर्पुन जीवन"

नामाविषयी प्रेम निर्माण होऊन दृढ होण्यास नामाशी सतत सहवास हवा. नामाशी सतत वासाने काय होते ते महाराजांनी प्रासादिक व प्रत्ययकारी शब्दांत सांगितले आहे :

नामालागी अर्पुन जीवन वर्ते जो मानवा
त्याची चिंता जानकिजीवन वाही ये अनुभवा
यास्तव घ्यावे अनन्य भावे रघुरायाचे नाम
श्रीराम जयराम जयजय राम ।। धृ ।।
जरा तापता बाळ लेकरू
माय बावरे काय मी करू
तैसे व्हावे येता आपुल्या नामस्मरणि विराम ।। १ ।।
नाम असावा धर्म आपुला
त्यात असावी श्रद्धा विपुला
एकचि इप्सित त्रिलोक स्वामी भेटावा अभिराम ।। २ ।।
नामी ठेवी सदैव बुद्धी
तेणे होई मानस शुद्धी
शुद्धीतून ये प्रेम बहरूनी सुखमय हा विश्राम ।। ३ ।।
सहवासाने फुलते प्रीती
अशी पुरातन चाले रीती
मनांतरी नित कौसल्यासुत ते त्याचे हो धाम ।। ४ ।।
ताकामधले स्नेहल लोणी
मंथन करि जो त्यास लाभणी
मनोरवीने नाम मंथिता प्रगटे प्रिय घनशाम
श्रीराम जयराम जयजय राम ।। ५ ।।

विनायक ताडे
२०९, गुरुवार पेठ, कृष्णा हरि चौक, पुणे ४२.

# श्रीमहाराज प्रणित नामाचे तत्त्वज्ञान

**डॉ. शंकर रामचंद्र तळघट्टी**

*एम. ए., पीएच. डी., तत्त्वज्ञानाचे निवृत्त प्राध्यापक, पुणे विद्यापीठ. अनेक इंग्रजी - मराठीत लेख. भारतीय तत्त्वज्ञान व विशेषतः संतवाङ्मयाच्या अभ्यासाची आवड. त्यावर व्याख्याने व व्याख्यानमाला. पीएच. डीसाठी अनेक विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. प्रसिद्ध पुस्तके १) श्रीज्ञानेश्वर विचार दर्शन, २) चांगदेव - पासष्टी, इंग्लिश भाषांतर व टीपा., 3) The concept of Moral obligation*

'नाम' हा श्रीसद्गुरु ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचा प्राण होता. त्यांचे जीवन, चरित्र, उपदेश आणि कार्य हे सर्व 'नाम' या एका अक्षर शब्दात साठवले आहेत. त्यांचा अवतार हा 'नामावतारा' चा परिचय माहात्म्यासहित करून देऊन सामान्यजनास 'नामा'स लावण्यासाठीच झाला होता. स्वतः महाराजांनीच म्हटले आहे की संतांचे सर्वाधिक महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनी 'नाम' सिद्ध करून दिले. प्रवचनातील त्यांचे शब्द आहेत, "भगवंताचे नाम सिद्ध करून देणे हाच संतांचा जगावर सर्वात मोठा उपकार होय. हजारो लोक भगवंताच्या नामाला लावणे हेच खरे संतांचे कार्य होय." (पृ. ९७). श्रीमहाराजांनी आयुष्यभर केवळ नामाचे माहात्म्यच गायिले. खरे तर त्यांच्या मते 'नाम' हे अनंत कल्याण गुणसंपन्न असल्याने त्याच्या बाबतीत दोनच गोष्टी संभवतात; एक म्हणजे ते शब्दातीत आहे म्हणून त्याविषयी मौन राहणे आणिदुसरे म्हणजे त्याचे महत्त्व कितीही वर्णिले तरी ते कमीच पडते म्हणून अखंड त्याचे महात्म्य गात राहणे. महाराजांनी दुसरा मार्ग स्वीकारला कारण 'नामा' ची कास धरून सर्व लोकांनी आपल्या जन्माचे सार्थक करून घ्यावे ही त्यांची तळमळ होती. मातेच्या कळवळ्याने त्यांनी लोकांना परोपरीने नाम-साधेनेचे महत्त्व समजाऊन दिले आणि सांगितले, 'दीनदास म्हणे सार । नाम साधनची थोर ।।' (९७). आणखी एका अभंगात ते म्हणतात - 'नाम साराचेही सार । नाम सकळांसी आधार ।। दास म्हणे सांगू किती । नामाविणें नाहीं गति ।।' (१०९)

नामाचे श्रेष्ठत्व वेद, शास्त्रे, पुराणे, भगवद् गीता या सर्वांनी निःसंदिग्धपणे प्रतिपादिले आहे. 'वेद सांगे गर्जून । कलियुगीं हरिकीर्तन ।।' (९९) ही वेदाची साक्ष महत्त्वाची आहे. कलिसंतरणोपनिषदातील पुढील श्लोकातील निर्णय महत्त्वाचा आहे. 'हरे राम हरे राम राम राम हरे हरे । हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।। इति षोडशकं नाम्नां कलिकल्मषनाशनम् । नातः परतरोपायः सर्ववेदेषु दृश्यते ।।' महाराजांनी 'कलियुगी हरिकीर्तन' असे जे अभंगात म्हटले आहे तेच श्रीमद्भागवतातही म्हटले आहे - 'कृते यत् ध्यायतो विष्णुं त्रेतायां यजतो मखैः । द्वापरे परिचयायां कलौतद् हरिकीर्तनात् ।।' (१२-५-५२)

सर्व साधनांमध्ये 'नाम' हे श्रेष्ठ असल्याचे त्यांनी अनेक प्रकारे सांगितले आहे. ते सांगतात - 'सर्व साधनांचे मूळ । रामनामचि केवळ।। तत्त्वज्ञान योग ध्यान । रामनामीं जाहले लीन ।। सर्व साधन आटाआटी । रामनाम ठेवा कंठीं ।। दास म्हणें नाम अंतःकरणीं । तोचि जाणा आत्मज्ञानी ।।' (११५). इतर साधने उपयुक्त आहेत पण जर नामासहित ती केली तर ! नामावाचून ती व्यर्थ आहेत. प्रवचनात त्यांनी एक उपमा दिली आहे ती मार्मिक आहे. ते सांगतात की, इतर साधने घराच्या खोल्यांप्रमाणे आहेत, तर 'नाम' हे घराच्या छपराप्रमाणे आहे. म्हणून ते सांगतात - 'दास म्हणे अवघें केलें । नाम नसतां निर्फळ झालें ।।' (११७); या उलट, 'दास म्हणे राम गातां । सर्व सहज आलें हातां ।।' (१३२). केवळ गोंदवलेकर महाराजांनीच नव्हे तर सर्वच संतांनी नामाचा अपार महिमा गायिला आहे. श्रीमहाराजांच्या 'रामपाठा' प्रमाणेच सर्व संतांनी आपापला 'हरिपाठ' केला आहे. नामात अशी काय शक्ती, जादू आहे की ज्यामुळे सर्वच संतमंडळी नामाने भारली गेली ? तेच आपणास महाराजांच्या शब्दांत समजून घ्यायचे आहे.

'श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ।।' (भा. ७।५।२३)

या भक्तीच्या नवविधा, भक्तवर प्रल्हादाने श्रीमद्भागवतामध्ये सांगितल्या आहेत. समर्थांनी दासबोधाच्या चतुर्थ दशकात त्यांची सविस्तर चर्चा केली आहे. त्यात 'स्मरण' ही तिसऱ्या प्रकारची भक्ती आहे. वास्तविक भक्ती ही एकच; तिचे हे विविध आविष्कार होत. परमेश्वराविषयी नितान्त व निरपेक्ष प्रेम म्हणजे भक्ती; ईश्वरापासून कधीही 'विभक्त' नसणे म्हणजे भक्ती. या ना त्या प्रकारे ईश्वराशी अखंड अनुसंधान राखणे हे तिचे स्वरूप आहे. त्यालाच भगवंताचे अखंड 'स्मरण' असेही म्हणता येईल. म्हणून नवविधा भक्तीमध्येसुद्धा 'स्मरण' केंद्रस्थानी आहे असे दिसून येईल. हे स्मरण 'नामा' ने सहज साधते म्हणून 'स्मरण भक्ती' म्हणजे 'नामस्मरण भक्ती' असे समीकरण रुढ झाले आहे. 'स्मरण देवाचें करावें । अखंड नाम जपत जावें । नामस्मरणें पावावें । समाधान ।।' (दा. ४-३-२) असे समर्थ सांगतात. अर्थात स्मरण ठेवायचे आहे ते देवाचे. त्यासाठी नाम अखंडपणे जपायचे आहे. योगाच्या भाषेत यास 'जपयोग' म्हणतात. पण महाराजांनी ज्या 'नामा' चे माहात्म्य गायिले आहे ते 'नाम' केवळ जपापुरते मर्यादित नाही हे ध्यानात घेणे आवश्यक आहे. आपण आतापर्यंत 'साधन' असा शब्द वापरला. पण साधन कशाचे ? ते नीट जणायला हवे.

'भक्ती' बरोबर 'ज्ञान', 'कर्म' व 'योग' यांचाही उल्लेख केला जातो. येथे 'योग' म्हणजे पातंजल योग. हे सर्व मोक्षप्राप्तीचे मार्ग आहेत. 'मोक्षमार्ग' या अर्थाने त्यांना 'योग' असे म्हटले जाते. गीतेमधील ज्ञानयोग, कर्मयोग आणि भक्तियोग यांची चर्चा याच दृष्टीने केलेली आहे. त्यापैकी भक्तियोगांतर्गत नवविधा-भक्तीची मीमांसा केली जाते. भक्तीचे हे मुख्य दोन प्रकार आहेत - साध्यभक्ती आणि साधन भक्ती. नवविधा भक्ती ही साधन भक्ती मानली जाते. समर्थांनी नवव्या आत्मनिवेदन भक्तीला साध्यभक्तीचे स्थान दिले आहे. साध्य भक्तीलाच पराभक्ती असे नाव आहे. आता नामस्मरण ही या चौकटीत साधन भक्ती असली तरी 'नाम' ही संकल्पना मात्र आपणास साध्याच्या क्षेत्रात नेऊन सोडते. विशेषतः ब्रह्मचैतन्य महाराजांच्या सर्व विवेचनातून ही गोष्ट स्पष्ट होते. थोडक्यात सांगायचे तर 'नाम' हे साधनही आहे आणि साध्यही. येथे साध्य आहे भगवंताशी एकरूप होणे. नेहमीच्या भाषेत आपण त्यास ईश्वर प्राप्ती असे म्हणतो. त्यालाच ईश्वर-साक्षात्कार असेही म्हणतात. महाराजांनी त्यास 'नामाचा अनुभव' असे साधे, सोपे नाव दिले आहे. वेदान्त दर्शनात या साध्याला म्हणजे ईश्वर-साक्षात्काराला, 'आत्मसाक्षात्कार' किंवा 'ब्रह्मसाक्षात्कार' म्हटले जाते. कारण परमसत्य अशा सच्चिदानंदस्वरूप सद्‌वस्तूलाच आत्मा, ब्रह्म, ईश्वर असे कारणपरत्वे म्हटले जाते. ज्ञानेश्वरीचा प्रारंभ 'जय जय स्वसंवेद्या आत्मरूपा' असा आत्मतत्त्वाच्या जयजयकाराने झालेला सर्वांना माहीतच आहे.

भगवंताची प्राप्ती हे जीवनध्येय आहे. कारण भगवंत हा शुद्ध आनंदस्वरूप आहे. तोच खरा 'परमार्थ' - परम अर्थ - आहे. भगवंताशी 'अद्वैत' पुनःर्प्रस्थापित करणे हे त्याचे साधन आहे. महाराज प्रवचनात सांगतात - 'द्वैतामध्ये दुःख आहे, तर एकामध्ये सुख आणि आनंद आहे. आपण एकामध्ये राहिलो तर आनंद मिळेल.'' (१२।६). अद्वैत हे विश्वव्यापी आहे. कारण या चराचर विश्वात एक परमात्माच भरून राहिला आहे. 'ईशावास्यम् इदं सर्वम् ।' किंवा 'सर्व खल्विदं ब्रह्म' हा उपनिषदांचा मुख्य सिद्धांत आहे आणि सुखासंबंधीचा (सुख = आनंद) वेदान्ताचा सिद्धान्त आहे - 'यो वै भूमा तत्सुखम् । नाल्पे सुखमासी ।'. 'भूमा' म्हणजे सर्वव्यापकता - अनन्तता. त्यात आनंद आहे. सान्त हे अपूर्ण असल्याने आनंदरूप असू शकत नाही. या 'आनंदा'ला श्रीमहाराज 'समाधान' असेही म्हणतात. श्रीमहाराजांनी 'समाधाना' ची त्यांच्या अजोड पद्धतीने साधी-सरळ व्याख्या दिली आहे. ते म्हणतात - 'जे मिळाल्याने दुसरे काही हवेसे वाटणार नाही, ते समाधान.' (८/८) 'समाधान' ही मनाची परमोच्च अवस्था आहे. त्याच्या प्राप्तीसाठी पूर्णपणे वासनाक्षय होणे आवश्यक आहे. गीताही सांगते - 'यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।' [१] (६-२२). या योगस्थितीला गीता 'समत्व' म्हणते. महाराजांच्या मते 'रामकर्ता' ही भावना दृढ झाल्याखेरीज 'समाधान' प्राप्त होणे शक्य नाही. त्यासाठी पुनः रामनामाचीच कास धरायची ! 'मोक्ष' ही संकल्पना काहीशी नकारात्मक आहे. बंधनापासून - दुःखापासून - मुक्ती असे तिचे स्वरूप आहे. अविद्येमुळे बंध प्राप्त होतो असे वेदान्तदर्शन मानते. त्यामुळे ब्रह्मविद्येने अविद्येचा पडदा दूर होऊन आत्मसाक्षात्कार (दर्शन) होतो हा सिद्धान्त. हाच मोक्ष. परंतु मोक्षाचे आनंद-स्वरूप या नकारात्मक संकल्पनेत स्पष्टपणे व्यक्त होत नाही. केवळ दुःख, निवृत्ती ही सांख्य दर्शनातील मोक्षाची कल्पना पुरेशी नाही म्हणून वेदान्तदर्शनात 'मोक्ष' म्हणजे आत्यंतिक दुःख निवृत्तीपूर्वक परमानंद प्राप्ती' असे स्पष्टपणे म्हटले आहे. तरीही 'भक्ती' ही शुद्ध आनंदाची अनुभूती असल्याने, 'दुःखनिवृत्तीरूप' मोक्षापेक्षाही ती श्रेष्ठ प्राप्तव्य आहे असे संतांनी जाहीर करून टाकले आणि 'पराभक्ती' ला पंचम पुरुषार्थ मानला. याचे कारण त्यात दुःखाची कल्पनाच नाही. 'अवघेचि त्रैलोक्य आनंदाचे आतां । चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें ।।' अशी एकनाथांबरोबर सर्वच संतांची अनुभूती आहे. श्रीमहाराजांच्या मते 'नामा' ची अनुभूतीही मूर्तिमंत आनंदाचीच अनुभूती आहे. हा विचार थोडा अधिक स्पष्ट करणे उपयुक्त ठरेल.

'नामा' संबंधीचा महाराजांचा तात्त्विक केंद्रवर्ती सिद्धांत असा की, 'नाम हेच परब्रह्म होय.' उपनिषदात 'ब्रह्म' या अंतिम सद्‌वस्तूची दोन रूपे असल्याचे म्हटले आहे व ती म्हणजे 'मूर्त' आणि 'अमूर्त'. 'द्वेवाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च ।' (बृह. २-३-१). येथील मूर्त-अमूर्तचा अर्थ प्रस्तुत संदर्भात 'सगुण-निर्गुण' असा स्थूलमानाने करता येईल. भक्तीच्या दृष्टीने 'सगुण-निर्गुण' ब्रह्म म्हणजे ईश्वर आणि ब्रह्म. आता 'नाम' हा सगुण-निर्गुणाला जोडणारा दुवा आहे. हा श्रीमहाराजांचा विचार महत्त्वाचा आहे. तो विशेषतः साधनेच्या अंगाने. 'सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाविजे निर्धारें । सारासार विचारें । संतसंगें ।।' (दा. ६-६-५५). या समर्थांच्या उपदेशानुसार श्रीमहाराजांनी आपले 'नामा' चे तत्त्वज्ञान मांडल्याचे आपणास दिसून येते. तसे पाहिले तर निर्गुण ब्रह्म हे नाम रूपातीत आहे. उपनिषदात संपूर्ण जगतालाच 'नाम-रूप' असे म्हटले आहे. असे असले तरी त्या निर्गुणाला काहीतरी 'नाम' दिल्याशिवाय त्याचा उल्लेखच करता येणार नाही; मौन पाळावे लागेल. आत्मा, ब्रह्म, ईश्वर - हीपण या दृष्टीने नामेच आहेत. 'विष्णुसहस्त्रनाम' आपणास परिचित आहे. त्यापैकी कोणत्याही एका नामाचा (गुरुपदिष्ट नाम श्रेष्ठ) जप केला तरी चालेल. हे सर्व महाराजांनी सांगितले आहेच. पण ही विविध नामे रूप-गुण-सापेक्ष आहेत. ब्रह्मतत्त्व तर निरुपाधिक, निरपेक्ष आहे. 'राम' म्हटले की दाशरथी राम डोळ्यांपुढे येतो आणि 'कृष्ण' म्हटले की देवकीनंदनाच्या मधुर लीलांनी मन आनंदित होते. पण या अवतारांना समाप्ती आहेच. म्हणून महाराजांनी 'नाम' या तत्त्वाचीच मीमांसा केली. ही गोष्ट महत्त्वाची आहे. अवतारांच्या लीला या युग-सापेक्ष आहेत. परंतु तात्त्विक दृष्ट्या या सर्व चराचर विश्वात जे जे होते-जाते ती सर्व त्याचीच लीला आहे. सर्व नामे-रूपे त्याचीच आहेत. मात्र ईश्वराला योगनिद्रा घ्यावीशी वाटल्यास तो या सर्व लीलांचे संहरण करून तो स्वरूपी अवस्थितही होतो. ही सगुण-साकाराची मर्यादा आहे. म्हणून अंतिम तत्त्वाचे नित्य स्वरूप हे निर्गुण-निराकार असल्याचे वेदान्त सांगतो. आपण तर सगुण-साकार विश्वात - संसारात वावरत

**१. नारदही 'भक्तिसूत्रा'त सांगतात - 'यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति । यत् प्राप्य न किंचित् वांछति ।' (ना. भ. सू. ४, ५, ६).**

असतो, मग निर्गुणाप्रत जायचे कसे ? हा महत्त्वाचा प्रश्न. या दृष्टीने विचार करता विशिष्ट रूपे व तद्सापेक्ष नामे लयास गेली तरी 'नाम' हे उरते; ते नित्य आहे. म्हणून महाराज सांगतात की, 'ब्रह्माची सगुणातील अत्यंत जवळची खूण म्हणजे नाम'. श्रीमहाराजांनी जिला 'अखंड नामात राहणे' असे म्हटले आहे ती स्थिती आणि गीतोक्त 'ब्राह्मी स्थिती' दोन्ही एकच होत. याचे कारण महाराज सांगतात त्या प्रमाणे 'नाम' आणि 'नामी' यांच्यात अभेद - अद्वैत आहे. ज्याप्रमाणे शैव दर्शनात 'शक्तिशक्तिमतोरभेदः ।' हे तत्त्व स्वीकारले आहे त्याप्रमाणे संतांनी, विशेषतः श्रीमहाराजांनी 'नामीनाम्नोरभेदः ।' हे तत्त्व प्रतिपादिले आहे. खरं म्हणजे ज्याला महाराज 'नाम' म्हणतात ते दुसरे-तिसरे काही नसून शास्त्रात ज्यास 'प्रणव' - ओंकार म्हटले आहे तेच होय. 'तस्य वाचकः प्रणवः ।' असे पातंजल योगदर्शनातील सूत्र आहे; आणि स्वरूपावस्थितीरूप योग प्राप्त करण्यासाठी योगसूत्राने 'तज्जपः तदर्थभावनम् ।' हा मार्ग सांगितला आहे. श्रीमहाराजांनी जे 'नामा' चे तत्त्वज्ञान मांडले आहे त्याचे एक अंग योगाच्या या साधनेत व्यक्त झाले आहे.

'नाम' हेच ब्रह्म होय हा श्रीमहाराजांचा अंतिम तात्त्विक सिद्धांत आहे. नाम-ब्रह्माची तात्त्विक मांडणी मांडूक्य उपनिषदात ओंकार रूपात केली आहे. ती मुळात अभ्यासायला पाहिजे. त्यात ओंकार आणि परब्रह्म यांचे ऐक्य प्रतिपादिले आहे. श्रीमहाराज तर 'नामा' ला 'प्रणवाचाही आराम' असे म्हणतात. मांडूक्य उपनिषदातील काही महत्त्वाच्या ऋचांचा उल्लेख प्रस्तुत चर्चेच्या संदर्भात महत्त्वाचा आहे. पहिलीच ऋचा आहे - 'ओमित्येतदक्षरमिदं सर्वं तस्योपव्याख्यानं भूतं भवद् - भविष्यदिति सर्वमोंकार एव । यच्चान्यत् त्रिकालातीत तदप्योंकार एव ।।' याचा भावार्थ असा की 'ओम्' असे जे अक्षरतत्त्व आहे तेच सर्व काही आहे. जे जे काही भूत-वर्तमान-भविष्य या त्रिकालात आहे ते सर्व आणि जे त्रिकालातीत आहे ते ही सर्व ओंकारच आहे. पुढील दुसऱ्याच ऋचेत विधान आहे की - 'सर्वं ह्येतद् ब्रह्म अयमात्मा ब्रह्म ।' म्हणजे - 'हे सर्व ब्रह्म आहे; हा आत्माही ब्रह्मच आहे.' येथे ओंकार आणि ब्रह्म यांचे ऐक्य प्रस्थापित करून पुढील ऋचांत त्याच्या चार पादांची चर्चा केली आहे. पैकी जागरित, स्वप्न, सुषुप्त ही तीन स्थाने (पाद) सगुणातील आहेत, तर तुरीय - चतुर्थ - स्थान म्हणजे 'प्रपंचोपशम, शिव, ओंकार, अद्वैत, आत्मा' - हे निर्गुण स्वरूप. याचा अर्थ 'नाम' (ओंकार) आणि 'नामी' (ब्रह्म) हे एकरूप असून त्या अक्षरतत्त्वाने सर्व सगुण-साकार चराचर विश्वाला व्यापिले आहे; अंती निर्गुण स्व-रूपात तेच एक उरते. हा नामाचा महिमा ! श्रीमहाराज प्रवचनात सांगतात - 'नाम हा जीव आणि ईश्वर यांच्या मधला दुवा आहे. नाम हे साधनही आहे आणि साध्यही आहे. नाम सगुणही आहे आणि निर्गुणही आहे. नामाचा आरंभ सगुणात आहे तर शेवट निर्गुणात आहे.' संपूर्ण विश्व हे ब्रह्माचे सगुण रूप आहे; म्हणूनच विष्णुसहस्त्रनामातील पहिलेच नाव 'विश्वम्' हे आहे. मात्र त्याचे निर्गुण स्वरूप विश्वातीत आहे. महाराज 'श्रीरामपाठा'त सांगतात - 'रामी रंगलें त्रिभुवन । जडमूढ काष्ठ पाषाण घटमठात सर्वांत परिपूर्ण । त्याहून वेगळा राहिला ।।' (२०). थोडक्यात म्हणजे - 'नाम' हे उघडे परब्रह्म होय - 'दास म्हणें रामनाम । उघडें जाणे परब्रह्म ।।' (११०). किंवा - 'भागवती बोले वर्म । नामीं उभे परब्रह्म ।।' (१२०).

आता प्रश्न असा की जर 'नाम' हे परब्रह्म आहे तर ते आपणास तसे का प्रतीत होत नाही ? याचे उत्तर आहे - आपली देहबुद्धी त्याच्या आड येते. समर्थ सांगतात -

'देहबुद्धिचा निश्चयोज्या टळेना । तया ज्ञान कल्पांतकाळीं कळेना।
परब्रह्म ते मीपणें आकळेना । मनीं शून्य अज्ञान हें मावळेना ।।' (१९१).

म्हणून ते सांगतात - 'देहबुद्धि ते आत्मबुद्धि करावी.' श्रीमहाराजांच्या शब्दात सांगायचे तर - 'देहबुद्धि जसजशी कमी होत जाईल तसतसे नाम अधिकाधिक व्यापक आणि अर्थगर्भ बनत जाते आणि शेवटी नाम हे परमात्म स्वरूप आहे असा अनुभव येतो.' महाराजांनी अविरत नाममाहात्म्य जे गायिले आहे ते नामाला परमेश्वर मानूनच. महाराजांची वचने फार अर्थगर्भ आहेत. 'नामाचे प्रेम नामाच्या सहवासाने येईल' नामाचे प्रेम म्हणजे भगवंताचे प्रेम; परंतु त्याचा सहवास मात्र नामाच्या रूपातच घडू शकतो. या दृष्टीने पाहता, 'नाम' हेच भगवंताचे 'रूप' आहे असा जो अत्यंत महत्त्वाचा सूक्ष्म, तात्त्विक विचार श्रीमहाराजांनी मांडला आहे, तो अभूतपूर्व आहे. रामाला मागणे मागायचे ते - 'तुझ्या नामाचे प्रेम मला दे.' त्यांचे आणखी एक महत्त्वाचे वचन आहे - 'नामाकरिता नाम घ्या की त्यात राम आहे हे कळेल.'

श्रीमहाराजांचा दुसरा एक महत्त्वाचा तात्त्विक विचार म्हणजे, 'रूपाला अस्तित्व नामामुळेच आहे.' रूपे उत्पन्न होतात व नाहीशीही होतात, पण नाम मात्र कायम राहते. रूपे अनित्य आहेत, तर 'नाम' नित्य, निरूपाधिक आहे; म्हणून ते परमेश्वर रूप आहे. उपनिषदातील एक महत्त्वाचा सिद्धान्त महाराजांच्या या विचारात समाविष्ट असल्याचे जाणवते. जगतामधील नानात्वा विषयी उपनिषदात म्हटले आहे की, 'वाचारंभणम् विकारो नामध्येयम्, मृत्तिकेत्येव सत्यम् ।' (छां. ६-१-४). अर्थात 'मातीपासून तयार होणारा कोणताही पदार्थ (विकार) केवळ वाणीचे अवलंबन म्हणजे नाम-मात्र आहे, वस्तुतः मातीच सत्य आहे.' त्याप्रमाणे ब्रह्मापासून निर्माण होणारे जगताचे नानात्त्व हे नाम-मात्र आहे व ब्रह्मच केवळ सत्य आहे. म्हणून जगताला केवळ 'नाम-रूप' आहे, अस्ति-भाति-प्रियत्त्व नाही. [२] श्रीमहाराजांनी याही पुढे जाऊन रूपांना अस्तित्त्व 'नामा'मुळेच आहे असे सांगितले आणि सद्वस्तू म्हणून 'नामब्रह्मा'चे निरूपण केले. वेदान्ताला त्यांनी दिलेले हे योगदान अत्यंत मौलिक आहे. ब्रह्म हे सच्चिदानंद स्वरूप आहे. 'नाम' हे त्याचेही अधिष्ठान आहे. महाराज सांगतात - 'सच्चिदानंद घन । नाम त्याचें अधिष्ठान ।।' (१०५) किंवा 'दीनदास म्हणे नाम । निज कैवल्याचे धाम ।।' (१०२).

---

**''अस्तिभाति प्रियं रूपं नाचेत्यंशपंचकम् । आद्यमयं ब्रह्मरूपं जगद्रूपं ततो द्वयम् ।।' (शंकराचार्य - 'वाक्यसुधा')**

प्रस्तुत चर्चेच्या संदर्भात श्रीमहाराजांचा अत्यंत मार्मिक व सूक्ष्म अशा आणखी एका महत्त्वाच्या तात्त्विक विचाराचा उल्लेख करायला पाहिजे. धर्मसंस्थापनेसाठी परमेश्वर अवतार घेतो. स्वतः श्रीकृष्ण गीतेत सांगतात - 'धर्मसंस्थापनार्थाय संभावामि युगे युगे ।' (४-८). अशा तऱ्हेच्या मत्स्य, कूर्म, वराह इत्यादी दश अवतारांचा उल्लेख नेहमी केला जातो. श्रीमहाराजांनी त्यात एका सर्वात महत्त्वाच्या अवताराची भर घातली आहे आणि तो म्हणजे 'नामावतार' 'नाम' हाच अवतार. बाकीचे सारे अवतार देहधारी-सगुण-साकार असल्याने स्थूल आहेत. त्यांना अवतार-समाप्ती आहे. परंतु 'नाम' हा सूक्ष्म अवतार आहे. रावण, कंसादी देहधारी दुष्टांचे निर्दालन करून धर्मसंस्थापना करण्यासाठी राम-कृष्णांचा अवतार आवश्यक व पुरेसा होता. परंतु कलियुगात दुष्ट प्रवृत्ती, दुर्वासना - ज्यांना गीतेत आसुरी संपत्ती म्हटले आहे - यांचा बीमोड करायचा आहे. ज्या साधूजनांच्या परित्राणासाठी देहधारी अवतार घ्यायचा असे साधूच कलियुगात दुर्मिळ झाले आहेत. म्हणून सद्गुण, सद्विचार आणि सदाचार यांची सद्भावनेसह स्थापना करायची आहे; दैवीसंपत्ती निर्माण करायची आहे. त्यासाठी वृत्तीमध्ये पालट घडवून आणणे आवश्यक आहे. हे कार्य सूक्ष्मातील असल्याने अवतारही सूक्ष्मच हवा. तो अवतार म्हणजे 'नाम'. या विषयासंबंधीचे (३१ जानेवारीचे) 'नाम हाच भगवंताचा अवतार' या शीर्षकाचे संपूर्ण प्रवचन अभ्यासनीय आहे. श्रीमहाराज सांगतात - 'आजच्या युगात नाम हाच भगवंताचा अवतार आहे. आताचा प्रश्न दुर्वासना जाऊन सद्भावना कशी उत्पन्न होईल हा आहे. म्हणजेच कार्य सूक्ष्मातले आहे. जसा रोग तसे औषध. या न्यायाने उपाययोजना सूक्ष्मातच केली पाहिजे. वासना बदलायला वासने इतकाच जबरदस्त इलाज पाहिजे; आणि तो म्हणजे भगवंताचे नाम. म्हणून नामावताराची आज गरज आहे.' या अवताराला समाप्ती नाही. खरे तर इतर अवतारांचे तत्त्वही 'नाम' च आहे. ज्या धर्माच्या संस्थापनेसाठी अवतार होतो त्या धर्माचा गाभा सद्बुद्धी, सद्भावना व सदाचार हाच आहे. त्याचे संरक्षण व संवर्धन करायचे तर नाम-साधनाच केली पाहिजे, 'हरिपाठी स्थिरावले पाहिजे. ज्ञारेश्वरांनी 'सारासार विचार । हरिपाठ ।।' म्हणून 'नाम' रूपी सर्वश्रेष्ठ तत्त्वच आपल्या हाती दिले आहे. ते सांगतात - 'एक तत्त्व नाम दृढ धरी मना ।' श्रीब्रह्मचैतन्य महाराजांच्या मते या 'नामा' चे वैशिष्ट्य असे की साधन म्हणून सुरू केलेले नामच स्वरूपस्थितीच्या रूपात साध्य बनते. म्हणून ते सांगतात - 'मी नाही ऐसे म्हणा । रामनामीं ब्रह्म जाणा ।' (१३१).

अशा रीतीने 'नाम' हे निर्गुण-निराकार, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त-स्वभाव, सच्चिदानंद स्वरूप साक्षात परब्रह्मच आहे अशी श्रीमहाराजांची दृढ धारणा होती. या नाम-तत्त्वाचे विवेचन करताना त्यांनी अनेक महत्त्वाचे तात्त्विक विचार सूत्ररूपाने मांडून भारतीय ब्रह्ममीमांसेमध्ये जशी भर घातली, तशी भक्ति-मीमांसेमध्येही भर घातली आहे. 'नामा' चे माहात्म्य एवढे अपार आहे की, ते केवळ वाचा-मन-बुद्धी यांच्याद्वारे आकळिले जाऊ शकत नाही. त्यासाठी सद्गुरुनांच शरण जायला हवे. ते स्वतःच 'अमृत घुटका' या मौलिक ग्रंथाच्या शेवटी सांगतात - 'रामनाम जाणा अक्षरें दोन । गुरुमुखें करावी ओळखण । सद्गुरुचे कृपेकरून । ब्रह्मचैतन्य बोलेदिन ।।" (२४).

श्रीसद्गुरु ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज हे 'नामा'शी इतके एकरूप झाले होते की, त्यांना आपण यथार्थपणे 'नामावतार' म्हणू शकतो. त्यामुळे 'नामा' चा गूढार्थ समजावून घ्यायला त्यांची गुरुवाणी पूर्णार्थाने समर्थ आहे. त्यांच्या मुखातून जणू 'नाम' च आपले स्वरूप उलगडून दाखवित आहे. म्हणून त्यांनाच शरण जायचे !

अंती, भगवंत स्वरूपी 'रामनाम' सर्वांना अभ्युदय-निःश्रेयसरूपी परमकल्याण प्राप्त करून देवो अशी त्या नाम-देवाच्याच चरणी पुढील प्रसिद्ध श्लोकाच्या साहाय्याने प्रार्थना करून लेखास पूर्ण विराम देतो -

'कल्याणानां निधानं कलिमलमथनं पावनं पावनानाम् ।
पाथेयं यन्मुमुक्षोः सपदि परपदप्राप्तये प्रस्थितस्य ।
विश्रामस्थानमेकं कविवरवचसां जीवनं सज्जनानाम् ।
बीजं धर्मद्रुमस्य प्रभवतु भवतां भूतये रामनाम ।।'
(श्रीहनुमन्नाटकम्)
इतिशम् ।

डॉ. शं. रा. तळहट्टी,
चैतन्य २, गणंजय सोसायटी, पुणे ४११ ०२९.

## ब्रह्मचैतन्यांची राम नाम ठेव

ब्रह्मचैतन्यांची राम नाम ठेव ।
अंतरिचा भाव । सांभाळीतो ।। १ ।।

रामाविण नाही जीवनात राम ।
मंत्र सर्वोत्तम । राम नाम ।। २ ।।

राम नाम गोडी अमृताला नाही ।
ब्रह्मरूप राही । भक्ती संगे ।। ३ ।।

रामभक्ता नाही । संसाराचि बाधा ।
सौख्य मार्ग साधा । रामनामे ।। ४ ।।

**विनायक ताडे**
२०९, गुरुवार पेठ,
कृष्णाहरी चौक, पुणे ४२.

# सद्‌गुरुची सेवा आणि परमार्थ-साधना

**श्री. सुनील चिंचोलकर**

*बी. कॉम., १२ वर्षे सज्जनगड येथे व्यवस्थापक. १६ पुस्तके प्रकाशित. शिवचरित्र व श्रीसमर्थ रामदास स्वामी व वारकरी संप्रदायावर रंगीत स्लाईडस्. महाराष्ट्र व बाहेर प्रचार दौरे. ज्ञानेश्वरी, दासबोध, गीता वगैरेंवर प्रवचने. समर्थ व्यासपीठाचा समर्थ पुरस्कार १९९८ प्रदान.*

## संत चरित्र : एक लीला

भगवंतांनी भगवत्‌गीतेमध्ये ४ थ्या अध्यायात अवतार संकल्पना समजावून सांगत असताना 'जन्मकर्मच मे दिव्यं' असे म्हटले आहे. भगवंत अवतार घेतात, तेव्हा त्यांचे सारे जीवनच भव्य आणि दिव्य असते म्हणून त्याला लीला असे म्हणतात. म्हणून भगवंताच्या जन्माला जयंती, निर्याणाला समाधी आणि जीवनाला लीला असे यथार्थ शब्द संबोधिले आहेत. लीला याचा अर्थ नाटक. नाटकातील किंवा चित्रपटातील कलावंताला सारे कथानक ठाऊक असते. केवळ अभिनय म्हणून तो हर्ष, शोक, चिंता, क्रोध हे सारे करीत असतो.

परमपूज्य गोंदवलेकर महाराजांचे चरित्र पाहत असताना या लीला शब्दाचे प्रकर्षाने स्मरण होते. आपली समजूत अशी असते की लीला म्हणजे चमत्कार. परंतु लीला म्हणजे अभिनय. महाराजांच्या जीवनातला सद्‌गुरु शोधाचा आणि पारमार्थिक साधनेचा अध्याय पहिला म्हणजे संत कशी लीला करतात याची प्रचिती येते. महाराज हे जन्मतःच ज्ञानी होते. त्यांना ईश्वराचा लाभ झालेलाच होता. ते अखंड नामात असत. परंतु त्यांची ही अभिजात सिद्धावस्था सामान्यजनांना कळणार नाही म्हणून महाराज गुरुविषयक तळमळीचे, गुरुशोधाचे, गुरुसेवेचे आणि नानाविध साधनांचे नाटक करतात. एरवी महाराजांना गुरुची खरंच गरज होती का ? एकदा द्वैतामध्ये आल्यानंतर हे संत द्वैतातले सारे नियम पाळतात. एकदा देह धारण केल्यानंतर देहबुद्धीचे सारे नियम ते अनुसरतात. हेतू हा की सामान्य माणसाला त्यांच्यासारखी अवस्था प्राप्त करून घेता यावी. बालवयातच गुरुशोधासाठी महाराजांनी घरातून केलेले साहसी पलायन, कोल्हापूरला कानातील भिकबाळी क्षणात तोडून भिकाऱ्याला देण्याचे त्यांचे दातृत्व, नैमिषाराण्यात किंवा उज्जैनजवळ घोर जंगलात किशोर वयातच त्यांनी केलेली तपश्चर्या किंवा तपश्चर्येच्या काळात एका गाईने रोज गुहेच्या तोंडाशी येऊन हंबरडा फोडावा व पान्हा फुटून महाराजांच्या दुग्धपानाची सोय तिने सकाळ-संध्याकाळ करावी या सगळ्या घटना महाराजांचे अवतारीत्व सिद्ध करणाऱ्या आहेत. दक्षिणेश्वरचे रामकृष्ण परमहंस, हुमणाबादचे माणिकप्रभू, नाशिकचे देव मामलेदार या सत्‌पुरुषांनी त्यांचा हा अधिकार जाणूनच त्यांना अनुग्रह दिला नाही. तेव्हा सद्‌गुरु सेवा आणि परमार्थ साधना ही महाराजांच्या जीवनातील लीला असून तुम्हा-आम्हाला महाराज त्यातून काही गोष्टी शिकवीत आहेत अशी माझी प्रामाणिक धारणा आहे.

## गुरुचा शोध आणि गुरुभेट

महाराजांच्या बालपणी त्यांचा संबंध अनेक साधूपुरुषांशी आला. महाराज गोंदवल्यात राहात असताना गावातील मारुती मंदिरात अनेक बैरागी, साधू येऊन राहात असत. महाराजांनी त्यांना आवर्जून भेटावे, भगवंताविषयी त्यांच्या तोंडून ऐकावे. ध्रुवाची आणि प्रल्हादाची कथा ऐकली म्हणजे आपल्यालादेखील देव भेटावा असे त्यांना मनापासून वाटे. समर्थांचे चरित्र त्यांना आदर्श वाटे.

देवाच्या सख्यत्वासाठी । पडाव्या जिवलगासी तुटी ।
सर्व अर्पावे शेवटी । प्राणतोही वेचावा ।।

ही समर्थांची सूचना त्यांच्या चित्तावर पूर्णतः बिंबली होती. म्हणून ईश्वराच्या शोधासाठी आणि सद्‌गुरुच्या प्राप्तीसाठी त्यांनी बालवयात दोन वेळा घरातून पलायन केले होते. गुरु शोधार्थ घरातून पळून जाण्याचा त्यांचा पहिला प्रयोग यशस्वी झाला नाही. कारण 'पडाव्या जिवलगासी तुटी' ही समर्थांची सूचना त्यांनी तंतोतंत पाळली नव्हती. पहिल्या वेळी पळून जाताना त्यांच्या बरोबर बालपणीचे दामोदर आणि वामन हे दोन जिवलग होते. त्यातील दामोदर तर त्यांचा चुलत भाऊ होता. संत कबीर म्हणतात - 'प्रेम गली अती साकरी । दुजा समायाना जाय ।।' त्यामुळे महाराजांना कोल्हापूरहूनच घरी परतावे लागले. ईश्वर दर्शनाची जी ओढ त्यांच्या अंतर्यामी होती, ती दामोदर आणि वामन यांना नव्हती. आणि ते लोक महाराजांच्या बरोबर असल्यामुळे कंटाळून ते गोंदवल्यास परत गेले. पण त्यांनी महाराज नेमके कोठे आहेत याचा ठावठिकाणा घरच्यांना दिला. परिणामतः महाराजांना शोधून काढून पुन्हा संसारात डांबवून ठेवणे कुटुंबीय मंडळींना शक्य झाले. महाराजांचे मन संसारात रमावे म्हणून त्यांनी घाईघाईने महाराजांचे लग्नही लावून दिले. परंतु ईश्वर दर्शन आणि सद्‌गुरुचा शोध याची तीव्र तळमळ महाराजांना गप्प बसू देईना. त्यांचे मन संसारात रमेना.

रामकृष्ण परमहंस म्हणत असत - 'परमेश्वराची खरी तहान कोणाला आहे ? संसारातील गोष्टींसाठी माणसे बादल्या बादल्या आसवे गाळतात. भगवंतासाठी कोण रडणार आहे ?' महाराजांना परमेश्वराची खरी तहान लागली होती. त्यामुळे विवाहाची बेडी त्यांच्यावर प्रभाव

पाडू शकली नाही. दुसऱ्यांदा महाराज घरातून पळाले ते एकटेच. त्यांनी आपल्या आईला तशी पूर्वसूचना दिली होती. त्यामुळे या वेळी महाराजांचा शोध घेण्याच्या भानगडीत घरातील मंडळी पडली नाहीत. किशोरवयात गृहत्याग केलेले महाराज तब्बल ९ वर्षे गुरुशोध, गुरुसेवा आणि परमार्थ साधना यासाठी घराबाहेर होते. यावरून त्यांची ईश्वरप्राप्तीची खरी तळमळ दिसून येते. खरी तहान आहे आणि मार्गदर्शन मिळाले नाही असे अध्यात्मशास्त्रात कधीही घडत नाही. परिणामतः थेहळे गाव येथील तुकाई चैतन्य यांच्याशी महाराजांची गाठ पडली आणि महाराजांची आध्यात्मिक तृष्णा पूर्ण झाली. ते ब्रह्मचैतन्य झाले.

## विविध संतांच्या कृपेचे पायस

महाराजांच्या अंतर्यामी ईश्वरप्राप्तीची खरी तळमळ लागली होती, हे जरी खरे असले तरी त्यांची आणि सद्गुरुंची भेट तत्काळ झाली नाही हीदेखील भगवंताची त्यांच्यावर झालेली कृपाच होय. कारण प्रारंभीच सद्गुरु लाभले असते तर गुरुशोधाच्या निमित्ताने ज्या विविध सत्पुरुषांचा महाराजांना सहवास लाभला तो लाभला नसता. त्या विविध सत्पुरुषांकडून त्यांना परमार्थातील निरनिराळ्या मार्गांचे ज्ञान झाले. त्यामुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व परिपूर्ण झाले. लोकमान्य टिळकांच्यासारखा देशभक्त वा ब्रह्मानंदांसारखा प्रकांड पंडित महाराजांपुढे नतमस्तक होत असे व महाराजांचे शब्द प्रमाण मानीत असे. याचे श्रेय साधनकालात विविध संतांकडून महाराजांना मिळालेल्या अनुभवसंपदेला द्यावे लागेल. पुढे कुर्तकोटींसारखे शंकराचार्य त्यांचे शिष्य झाले. यावरून या ९ वर्षात महाराजांनी प्रत्यक्ष साधना आणि शास्त्राध्ययन यांचा समन्वय जीवनात कसा साधला याची कल्पना करता येते.

झेन साधू एखाद्या शिष्याला २-३ वर्षात आपल्या जवळील सर्व विद्या देत असत व नंतर त्या शिष्याला इतर साधूंकडे जाऊन त्यांच्याजवळील ज्ञान ग्रहण करण्याची आज्ञा करीत असत. परमेश्वराची प्राप्ती अनंत मार्गाने होऊ शकते. प्रारंभिक अवस्थेत साधकाने एका मार्गाचा अवलंब करून त्या चैतन्याचा साक्षात्कार करून घ्यावा. परंतु साधकाने आयुष्यभर एकांगी आणि एकांतिक राहू नये. विविध मार्गाने परमेश्वराची नानाविध रूपे त्याने जाणून घ्यावीत. अनेकदा भक्तीच्या नावाखाली साधक एककल्ली होतो आणि निष्ठेच्या नावाखाली तो कडवा आणि कट्टर सांप्रदायिक होतो. हा कडवेपणा किंवा एककल्लीपणा पुढे ईश्वरप्राप्तीतील अडथळा होऊन बसतो. असे घडू नये म्हणून रामकृष्ण परमहंसांनी विविध प्रकारच्या भावांची साधना केली आणि त्या त्या वेळी त्या त्या क्षेत्रातील आचार्यांकडून दीक्षा घेऊन ज्ञान संपादन केले. महाराजांच्या जीवनात हाच भाग आपल्याला पहायला मिळतो. दुसऱ्यांदा जेव्हा महाराज गुरुच्या शोधासाठी बाहेर पडले तेव्हा त्यांनी वेगवेगळ्या सांप्रदायातील अधिकारी सत्पुरुषांकडून मार्गदर्शन घेतले. परिणामतः सर्व उपासनांचा समन्वय त्यांच्या अंतःकरणाच्या प्रयोगशाळेत त्यांना साधता आला. महाराजांची ३६५ दिवसांची प्रवचने वाचली म्हणजे अनेक साधकांची मती गुंग होऊन जाते व एवढे सारे ज्ञान महाराजांनी केव्हा मिळवले असे वाटू लागते. परंतु या ९ वर्षांच्या काळात विविध सांप्रदायातील सत्पुरुषांच्या कृपेचे पायस महाराजांना प्राप्त झाले. म्हणून त्यांच्या प्रवचनांचा ग्रंथ हा संत वाङ्मयात मेरूमणीप्रमाणे शोभून दिसणारा अलौकिक अलंकार ठरला आहे. ९ वर्षांच्या तरुणपणाच्या कालखंडात महाराजांनी विविध उपासना पद्धती प्रत्यक्ष साधनेद्वारे समजावून घेतल्या. त्यामुळे भक्तित रमणारे महाराज, ज्ञानावर बोलू लागले म्हणजे तर्काची परिसीमा गाठतात तर योगात वृत्तीशून्य झालेले महाराज सद्गुरुचे दर्शन घडताच अश्रूंचा अभिषेक करतात. सर्व साधनांचा असा समन्वय आपल्याला फक्त रामकृष्णांच्या जीवनात पाहायला मिळतो. महाराज जेव्हा बंगालमध्ये गेले होते तेव्हा त्यांची रामकृष्ण परमहंसांशी भेट झाली होती. रामकृष्ण त्यांना म्हणाले होते - 'तू स्वतःला मारून टाक. तू स्वतःचा खून कर.' अहंकाराच्या विसर्जनाचा किंवा देहबुद्धी पूर्णपणे टाकून देण्याचा महान संदेश या वाक्यामध्ये मिळतो.

महाराजांच्या परंपरेत रामभक्ती आणि अन्नदान याला फार महत्त्व होते. महाराज हरिपूरला राधाबाई नामक एका साध्वीकडे होते. ही अन्नदानाची आणि रामभक्तीची परंपरा त्यांना तिथे मिळाली. ते हुमणाबादला माणिकप्रभूंच्याकडे गेले होते. तिथेही त्यांना अन्नदान पाहायला मिळाले. हे अन्नदान आज गोंदवल्याचे खास वैशिष्ट्य झाले आहे. हरिपूरच्या राधाबाई भजन करीत तेव्हा रामाची मूर्ती डोलत असे. महाराजांचे कीर्तन ऐकून गोंदवल्यातील थोरला राम साश्रू नयनांनी महाराजांकडे पाहात राहिला. ही गोष्ट हीच भक्तीपरंपरा दाखवून देते. मिरजेतील सत्पुरुष अण्णाबुवा यांचेदेखील आशीर्वाद महाराजांना लाभले होते. नाशिकचे देवमामलेदार व त्यांची पत्नी यांचे तर महाराजांवर पुत्रवत प्रेम होते. त्यांच्या सहवासात महाराज काही काळ राहिले. मात्र देवमामलेदारांनी त्यांना अनुग्रह दिला नाही. 'माझा तो अधिकार नाही.' असे त्यांनी नम्रपणे सांगितले.

या ठिकाणी एक गोष्ट विशेषत्वाने नमूद करावीशी वाटते की, कोणत्याही सत्पुरुषाने महाराजांसारखा तरुण अधिकारी मुलगा शिष्य मिळतो आहे म्हणून अनुग्रह देण्याची घाई केली नाही. आज तथाकथित गुरु शिष्यांच्याच शोधात असतात आणि 'दाटून उपदेश देण्याचा' तथाकथित खटाटोप करीत असतात. महाराजांचे जीवन एका अवतारपुरुषाची लीला असल्यामुळे जे घडले ते अद्भुत घडले. अनेक सत्पुरुषांनी त्यांच्याजवळ असलेली विद्या महाराजांना दिली पण तुझे गुरु निराळे आहेत असे विनम्रभावाने सांगितले. हेदेखील खऱ्या संतांचेच लक्षण आहे. अक्कलकोटचे स्वामी समर्थ तर महाराज येणार त्या दिवशी सकाळपासून 'माझा बाळ येणार' म्हणून वाट पाहात होते. महाराज आल्यावर त्यांनी मोठ्या प्रेमाने त्यांच्या पाठीवरून हात फिरवला. त्यांच्या मस्तकाचे अवघ्राण केले. माणिकप्रभूदेखील ते येणार त्या दिवशी त्यांची वाट पाहात बसले. महाराज येईपर्यंत ते जेवलेदेखील नाहीत. पण त्यांनीदेखील महाराजांना अनुग्रह न देता 'योग्य वेळी तुझे काम होईल' असे सांगितले. अबूच्या पहाडात एका गुहेत महाराज शिरले. तिथे पोहोचण्यासाठी त्यांना हिंस्त्र श्वापदांनी भरलेल्या जंगलातून वाटचाल करावी लागली. या गुहेत काही काळ राहून तेथील योगीराजाकडून ते

योगविद्या शिकले. काशीमध्ये योगाभ्यासाने पूर्णपदाला पोहोचलेले तेलंग स्वामी त्यांना भेटले. त्यांच्या सहवासातदेखील ते काही दिवस राहिले. त्यांनी देखील महाराजांना आशिर्वाद देऊन प्रेमपूर्वक निरोप दिला. नैमिष अरण्यात आणि बंगालमध्ये त्यांना अनेक सत्पुरुष भेटले. बंगालमध्येच त्यांना दक्षिणेकडे जाण्याची प्रेरणा मिळाली. दक्षिणेत हैदराबादला नदीकाठी बसले असताना समर्थ संप्रदायातील रामकृष्ण नामक सत्पुरुष त्यांच्यासमोर प्रकट झाले व त्यांनी महाराजांना, 'येहळे गावच्या तुकाराम चैतन्यांकडे तुझे काम होईल', असे सांगितले. तेव्हा महाराजांनी मराठवाड्यात येहळेगावला जावयाचे ठरविले.

## सद्‌गुरुची सेवा : एक दिव्य साधना

मिळालेल्या आदेशानुसार महाराजांनी आता सारे लक्ष तुकाराम चैतन्य यांच्याकडे केंद्रित केले. परंतु यापूर्वी म्हटल्याप्रमाणे, सद्‌गुरुंची भेट होण्यापूर्वी विविध प्रकारच्या साधनांनी त्यांचे मानसिक रूपांतरण घडविले होते. संपन्न मन घेऊन ते येहळेगावला आले. तुकारामचैतन्य मोठे अधिकारी सत्पुरुष होते. साधकाला अनुग्रह देण्यापूर्वी ते चांगले तपासून घेत. साधकांचा अपमान करणे, त्यांना उपाशी ठेवणे, शिवीगाळ करणे, वेळप्रसंगी त्यांना मारहाण करणे हे त्यांचे कठीण प्रयोग होते. गंमत म्हणून जो परमार्थात पडला आहे अशा साधकाची पहिल्या भेटीतच वाट लागायची. हे सारे सहन करण्याची तितीक्षा ज्या खऱ्या साधकामध्ये असायची त्याला तुकारामचैतन्य आपले सर्वस्व अर्पण करीत. परीक्षा पाहण्यासाठी ज्या साधकाला ते मारहाण करीत त्याच साधकाची निष्ठा पाहून त्याला ते हृदयाजवळ कवटाळीत आणि म्हणत - 'अरे गाढवांनो, तुम्हाला मारपीट करण्याची मला हौस आहे का ? पण एवढा थोडा अपमान किंवा एवढीशी निंदा तुम्हाला जिरवता आली नाही तर तुम्ही साऱ्या जगाचे आघात कसे सहन कराल ? संपूर्ण जगाचे आघात सहन करून आपली निष्ठा जशीच्या तशी कायम ठेवणे यालाच परमार्थ म्हणतात.' यावरूनच तुकाईचैतन्यांनी महाराजांची कशी परीक्षा घेतली असेल याची कल्पना करता येते. एकदा एका झाडाची पाने त्यांनी महाराजांना तोडायला लावली आणि थोड्या वेळाने तीच पाने झाडाला चिटकावयाला सांगितली. एकदातर उसाची जड मोळी महाराजांच्या डोक्यावर ठेऊन आपल्या पाठीमागे यायला सांगितले व तुकाई रानावनात जोराने धावू लागले. महाराज त्या ओझ्यासकट त्यांच्याबरोबर रानावनात हिंडत राहिले. या सर्व परीक्षा महाराजांनी पोरवयात कशा दिल्या असतील ? इथेच त्यांचे अवतारत्व सिद्ध होते.

एकदा तर त्यांनी महाराजांना नदीवर नेले. तिथे खड्डा खणायला सांगितला. नदीकाठी खेळणाऱ्या तीन मुलांना त्या खड्ड्यात टाकले व पुन्हा माती ओढून त्या पुरलेल्या मुलांच्या ठिकाणीच मातीवर महाराजांना ध्यानाला बसायला सांगितले आणि 'मी सांगितल्याशिवाय आसन सोडू नकोस.' अशी आज्ञा केली. नंतर त्या मुलांचे पालक मुलांचा शोध घेत नदीकाठी आले तेव्हा तुकाराम चैतन्यांनी सांगितले - 'त्या ध्यानाला बसलेल्या लबाड बुवाने तुमची पोरं मारून टाकली.' तेव्हा त्या तिघा-चौघांनी महाराजांना बेदमपणे मारण्यास सुरुवात केली. पण महाराजांनी आसन सोडले नाही. अखेर तुकाराम चैतन्यांनी महाराजांना पुन्हा माती उकरायला सांगितले. खड्ड्यात मुले जिवंत आहेत हे पाहिल्यावर त्या लोकांना तुकाराम चैतन्य आणि महाराज या दोघांचा आध्यात्मिक अधिकार लक्षात आला. पण या सर्व प्रकरणात महाराजांना भरपूर मार खावा लागला. अशा तुकाराम चैतन्यांशी महाराजांनी कसे वागावे ?

त्यांची सेवा करण्यासाठी महाराज ९ महिने झोपू शकले नाहीत. ते रात्री तुकाईंचे पाय चेपीत बसत. त्यांनी 'बास' म्हणताच त्यांच्या पायाजवळ रात्रभर नामस्मरण करीत बसत. एरवी त्यांच्यासमोर कधी बसले नाहीत. त्या वेळी कायम उभे राहात. त्यांचे कपडे धुणे, त्यांना स्नान घालणे, जेवणाची तयारी करणे, दुपारच्या विश्रांतीच्या वेळी त्यांना पंख्याने वारा घालणे ही सेवा ते मनापासून करीत. अनेकदा सेवेत इतके व्यग्र असत की दोन-दोन, तीन-तीन दिवस जेवण मिळत नसे. उलट मारच खावा लागत असे. परंतु त्यांच्या मनाशी महाराज इतके समरस झाले होते की आता गुरु काय आज्ञा करणार याची त्यांना आधीपासून कल्पना येत असे. यावरून गुरुसेवेचा एक वस्तूपाठ आपण शिकण्यासारखा आहे. गुरुला द्रव्यरूपाने वा वस्तूरूपाने दक्षिणा देणे, या पलीकडची गुरुसेवा आपल्याला ठाऊक नसते. पण महाराजांनी अनेक वर्षे अशी सेवा करून गुरुकृपा संपादन केली.

एका रामनवमीला तुकाराम चैतन्यांनी त्यांना जवळ घेतले. दोघांनी स्नान केले होते व शेतातील अशोकवनात दोघे बसले होते. महाराजांच्या डोक्यावर हात ठेऊन तुकाई म्हणाले - 'आजपर्यंत मी तुला फार कष्ट दिले. परंतु आज तुला मी जे देत आहे ते वसिष्ठांनी प्रभू रामचंद्रांना दिले होते.' या घटनेनंतर महाराज समाधिस्त झाले. त्यांची देहभावना पूर्णपणे नष्ट झाली. आत्मज्ञानाचे तेज त्यांच्या चेहऱ्यावर विलसू लागले. समाधी अवस्थेतून उतरल्यावर त्यांनी महाराजांना मिठी मारली. त्यांचे ब्रह्मचैतन्य असे नाव ठेवले. त्यांना रामदासीपंथाची दीक्षा दिली. प्रापंचिक लोकांना अनुग्रह देण्याचा अधिकार दिला. 'रामाची मंदिरे उभी कर व गावागावात रामनामाचा प्रचार कर. रामाच्या भजनाचे प्रेम लोकांमध्ये निर्माण होईल असा उपाय कर.' अशी आज्ञा त्यांना सद्‌गुरुंनी केली. ज्या क्षणासाठी महाराज वर्षानुवर्षे वणवण हिंडले आणि विविध साधुसंतांच्या सहवासात राहिले त्या निर्विकल्प समाधीची प्राप्ती महाराजांना झाली आणि त्यांचे जीवन कृतार्थ झाले. पुढे गुरुच्या आज्ञेनुसार महाराजांनी महाराष्ट्र, मध्य प्रदेश, कर्नाटक या ठिकाणी रामाची मंदिरे उभारली आणि 'श्रीराम जयराम जय जय राम' या त्रयोदशाक्षरी मंत्रांचा तसेच दासबोध या ग्रंथाचा सर्वत्र प्रसार केला. समर्थांच्या पश्चात समर्थ सांप्रदायाचा एवढा मोठा प्रचार करणारे महाराज हे एकमेवाद्वितीय लोकोत्तर पुरुष होत.

## महाराजांची परमार्थ साधना

सद्‌गुरुकडे येण्यापूर्वीच महाराजांना योगविद्येचे परिपूर्ण ज्ञान मिळालेले होते. घरामध्ये परंपरेने पांडुरंगाची उपासना चालत आली होती. राम आणि शंकर यांची उपासना ते बालपणापासून आवडीने

करीत असत. गिरनार पर्वतावर असताना एका दत्त भक्ताकडून त्यांना दत्तोपासना मिळाली होती. त्यांना त्या काळात दत्तात्रयाचे प्रत्यक्ष दर्शन घडले होते. म्हणून आज गोंदवल्यात रामाप्रमाणेच विठ्ठल, दत्तात्रय आणि शंकर यांची मंदिरे पाहायला मिळतात. महाराजांच्या समाधीस्थानी गोपाळकृष्णाचे मंदिर आहे. अशा प्रकारे महाराजांच्या उपासनेत सर्व प्रमुख दैवतांचा समावेश होतो. आदर्श भक्ताचे लक्षण सांगताना मनाच्या श्लोकात समर्थ म्हणतात -

'अनेकी सदा एक देवास पाहे ।
सगुणी भजे लेश नाही भ्रमाचा ॥'

त्यामुळे विविध संप्रदाय आणि विविध दैवते यांच्याबाबत कोणताही कडवेपणा महाराजांच्या जीवनात पाहायला मिळत नाही. लौकिक अर्थाने ते समर्थ संप्रदायाचे होते. पण पारमार्थिक दृष्टीने ते समस्त संप्रदायांचे समन्वयाचार्य होते. स्वामी विवेकानंद म्हणत असत -

'एखाद्या सांप्रदायात जन्माला येणे ही चांगली गोष्ट आहे. त्या संप्रदायात काही काळ राहणे हेदेखील तितकेसे वाईट नाही. मात्र त्याच सांप्रदायात मरण येणे हे काही चांगले नाही.' प्रारंभी संप्रदाय झाडाभोवतालच्या संरक्षक वेलीसारखा असतो. पण तेच संरक्षणाचे कुंपण झाडाच्या वाढीला बाधा ठरू शकते. त्याप्रमाणे महाराजांचे झाले नाही.

अनुग्रहानंतर ते आपल्या सद्गुरुंबरोबर उमरखेडला आजेगुरुंच्या समाधीस्थानी गेले. त्यानंतर तुकामाईंनी त्यांना एक मौलिक उपदेश केला - 'साधकाने परमार्थाचे ज्ञान झाल्यावर ते अंगात पक्के मुरण्यासाठी काही काळ एकांतात राहून साधना केली पाहिजे. म्हणजे ज्ञानाचे दृढीकरण होते. तेव्हा तुम्ही एवढ्यात घरी न जाता काही काळ तीर्थयात्रा करा. एकांतात खोल आत्मचिंतन करा आणि मग घरी परता.' सद्गुरुच्या आज्ञेनुसार महाराज उत्तरेकडे गेले. नैमिष अरण्यात राहून त्यांनी कठोर तपश्चर्या केली. उत्तर प्रदेशातील आणि मध्य प्रदेशातील विविध तीर्थक्षेत्री राहून महाराजांनी साधना केली. सुमारे ७-८ वर्षे एकांतात राहून त्यांची परमार्थ साधना केली. लग्न झाले असताना व घरदार, शेतीवाडी असताना अशा प्रकारे एकांतात राहून साधना करणे यावरून महाराजांची खरी पारमार्थिक वृत्ती दिसून येते. आज अध्यात्मिक क्षेत्रात साधना करणारी माणसे राहिली नाहीत. सगळ्यांना झटपट सिद्धी हवी असते. परंतु अध्यात्मात कुठलाही शॉर्टकट नाही. तपश्चर्येच्या प्रक्रियेतून गेल्याशिवाय ज्ञानप्राप्ती नाही. म्हणून भगवान रामकृष्ण परमहंस ज्ञानप्राप्तीनंतरदेखील आपल्या शिष्यांसमोर आदर्श राखावा म्हणून शेवटपर्यंत साधना करीत राहिले. महाराष्ट्रातील सर्वच संतांनी ज्ञानोत्तर भक्तीचा ठामपणे पुरस्कार केला. सारे संत भगवंताच्या भक्तीसाठी पुन्हा पुन्हा जन्म घ्यावयास तयार आहेत. योगविद्येद्वारा निवृत्ती साधल्यावर महाराजांनी या भक्तीपरंपरेचा पुरस्कार केला व स्वतः नामसाधना केली ती इतरांच्यासमोर वस्तूपाठ ठेवण्यासाठी. अशा प्रकारे त्यांची परमार्थ साधना हीसुद्धा एक लीला होती. रामकृष्ण म्हणत - 'मी जेव्हा १६ आणे करीन तेव्हा तुम्ही १ आणा कराल.' महाराजांनी साधकांपुढे काही काळ तरी एकांतात राहून साधना करण्याचा आदर्श ठेवला आहे. ९ वर्षांनंतर गोंदवल्याला परतल्यावर पुढे आयुष्यभर महाराज लोकसंग्रह आणि रामनाम प्रचार करीत राहिले. त्यांच्या प्रचारकार्याची इमारत साधनेच्या भक्कम पायांवर उभी होती. सुदैवाने आजही गोंदवल्यामध्ये उपासनेची ही शक्ती आणि रामनामाचे तेज पाहायला मिळते. महाराजांनी आखून दिलेली नामसाधना आजही तिथे अखंड चालू आहे. हजारो सुशिक्षित, सुबुद्ध तरुण अनन्य भक्तीभावाने गोंदवल्यात येऊन राहतात. उपासनेशिवाय केलेले कार्य आणि उपासनेनंतर केलेले कार्य यातील हा महत्त्वाचा फरक आपल्याला पाहायला मिळतो. त्यादृष्टीने महाराजांची ही साधना व साधनेचा हा कालखंड महाराजांच्या चरित्रातील महत्त्वाचे पर्व म्हणावे लागेल. तशी साधना करण्याची शक्ती व बुद्धी आम्हाला प्राप्त होवो हीच महाराजांच्या चरणी प्रार्थना.

श्री. सुनील चिंचोलकर
३२१, शुक्रवार पेठ, भागीरथी निवास, पुणे ४११ ००२.

- **संतांच्या भेटीशिवाय भगवंताची प्राप्ति होणार नाही. भगवंताच्या कृपेशिवाय संतांची भेट होणार नाही व भगवंताची कृपा होण्यासाठी नामाशिवाय उपाय नाही. याच्याविरुद्ध सांगेल तेथे ऐकू नये व जेथे नाम आहे तेथे डोळे मिटून राहावे.**




मी बोलावे, गावे घडावे ते स्तवन
तुझी कथा कथन हे गुरुराया
श्रवणी पडावे अमृताचेच बोल
पळही नको फोल हे गुरुराया.
सहज कृति माझी बनो परोपकार
न घडो उच्चार हे गुरुराया.
जे जे भव्य दिव्य तेचि मज दिसावे
आविष्कार ते तुझे हे गुरुराया
तेल माझ्या दिव्याचे कधीतरी संपणार
परी मी तुजवर निर्भर हे गुरुराया

**यशवंत माणकीकर**

# परमार्थाची प्रयोगशाळा

**डॉ. हे. वि. इनामदार**

*एम. ए. एल. एल. बी. पीएच. डी. डॉक्टरेट 'संत नामदेव' या विषयावर, सेवानिवृत्त प्राचार्य एस. एन्. डी. टी. अध्यक्ष, गीता धर्ममंडळ, पुणे. ३०-२५ पुस्तके प्रसिद्ध 'ज्ञानेश्वरी प्रबोध' संपादन. विद्यापीठ पातळीवरील उत्कृष्ट शिक्षक म्हणून राज्य पुरस्कार, विद्यापीठावर मार्गदर्शक अध्यापक.*

ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज (इ. स. १८४५ ते १९१३) हे महान् सत्पुरुष महाराष्ट्रात होऊन गेले. सातारा जिल्ह्यातील माण तालुक्यातल्या 'गोंदवले बुद्रुक' या गावी 'गोंदवलेकर संस्थान' हे त्यांचे पावन क्षेत्र आहे. महाराजांची तीनशे सहासष्ट प्रवचने ग्रंथरूपाने प्रकाशित झालेली आहेत. या ग्रंथाच्या आजवर पंधरा आवृत्त्या निघाल्या; व त्याच्या दीड लाख प्रतींचे वाचकांनी उत्साहाने स्वागत केले. तसेच महाराजांच्या या मूळ मराठी प्रवचन-ग्रंथाचे कानडी, हिंदी, गुजराती व इंग्रजी या चार भाषांमध्ये अनुवाद झाले. त्यांना उदंड प्रतिसाद मिळाला.

श्रीमहाराज हे श्रीरामाचे महान् भक्त होते. सद्गुरुचा अनुग्रह लाभावा, या तळमळीने वयाच्या बाराव्या वर्षी त्यांनी घर सोडले. काशीपासून रामेश्वरपर्यंत त्यांनी प्रवास केला. या प्रवासात गुरु-प्राप्ती काही झाली नाही. पण अक्कलकोट स्वामी व माणिक प्रभू यांच्यासारख्या सत्पुरुषांशी त्यांच्या भेटी झाल्या. पुढे येहळेगावच्या तुकाई महाराजांसारखा सद्गुरु त्यांना लाभला. गोंदवले या सातारा जिल्ह्यातील आपल्या गावी महाराज परत आले. तिथेच त्यांनी आपले जीवितकार्य तडीस नेले.

आपल्या निवडक अभंगांतून व पदांमधून गोंदवलेकर महाराजांनी साधकांना सदुपदेश केला आहे. 'दास' किंवा 'दीनदास' अशी मुद्रा त्यांच्या रचनांच्या अंती आढळते. महाराज म्हणतात,

"अहो मंदिरवासी जन । तुम्ही ऐकावें वचन ॥
आल्या अतीता अन्न द्यावें । रामनाम नित्य घ्यावें ॥
नम्र व्हावें सर्वा भूतां । परनारी जैशी माता ॥
जीवन्मुक्ता नाही भेद । तुम्हां माझा आशीर्वाद ॥
दीनदास म्हणें गुरुपात्र । तोचि होई जीवन्मुक्त ॥"

"देवदर्शनासाठी मंदिरात येणाऱ्या भक्तांनो, माझं एवढं सांगणं तुम्ही ऐकावं. तुमच्या दाराशी येणाऱ्या याचकाला अन्नदान करावं. रामाचं नाव तुमच्या मुखी सतत असावं. सर्व प्राणिमात्रांशी विनयानं वागावं. परस्त्रीला मातेसमान मान द्यावा. जो कुणी याच देही मुक्त दशेला पोहोचला त्याच्या मनात भेदाभेदभाव उरत नाही. मात्र ही दशा प्राप्त होण्यासाठी गुरुकृपा लाभली पाहिजे."

महाराजांनी श्रीरघुनाथाला मातेच्या ठिकाणी मानले आहे. अहंकार आणि स्वामित्ववृत्ती यांचे पूर्ण विस्मरण व्हावे, यासाठी ते श्रीरामाला विनवितात,

"मी, माझे विसरूनि जाई । ऐसें करी माझे आई ॥
मग मी जाईन मुरून । तुझे पायीं स्थिरावीन ॥
तुम्हां जोडू दोन्ही करां । एवढें द्यावें रघुवीरा ॥
कृपा करी देवाधिदेवा । मज न्यावें तुमचे गांवा ॥
मज नको मुक्तिधन । माझें हरावें मीपण ॥
दास म्हणे रामराया । आतां येऊ द्यावी दया ॥"

आत्मविस्मृती झाल्याशिवाय मोक्षप्राप्ती होत नाही, हा आशय महाराजांनी वरील अभंगात व्यक्त केला आहे. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन अशी नवविधा भक्ती, म्हणजेच भक्तीचे नऊ प्रकार भागवतपुराणात सांगितले आहेत. त्यापैकी आत्मनिवेदन भक्ती महाराजांना विशेष प्रिय आहे. श्रीरामापुढे आपले मनोगत त्यांनी आर्ततेने व्यक्त केले आहे.

श्रीरामाची भक्त-वत्सलता व्यक्त करताना महाराज म्हणतात,

"माय बाळापाशी चित्त । तैसें संत करिती हित ॥
स्तनीं पान्हा तों दाहला । हाका मारी बालकाला ॥
त्याची सदा चिंता वाहे । ऐशी कृपाळु ती माय ॥
म्हणुनी संतां शरण जावें । आत्महित शोधुनि घ्यावें ॥
दास म्हणे संत माय । मुमुक्षूची वाट पाहे ॥"

श्रीगोंदवलेकर महाराजांच्या प्रेमळपणात साधकाची उत्कटता व लेकराचा लडिबाळपणा आहे. त्यांच्या अभंगवाणीत भक्तिरस व वत्सलरस एकमेकांत मिसळून गेले आहेत. रामभक्तीचा आविष्कार हा त्यांच्या आयुष्याप्रमाणेच अभंग-काव्याचाही एकमेव विषय आहे. संत एकनाथ महाराज यांच्याप्रमाणेच श्रीगोंदवलेकर महाराजांनीही प्रपंच व परमार्थ यांत साधलेला समन्वय सामान्य माणसाने ध्रुवाच्या ताऱ्याप्रमाणे आपल्यासमोर ठेवावा असा आदर्श आहे.

प्रसिद्ध तत्त्वज्ञ व श्रेष्ठ ईश्वरभक्त प्रा. के. वि. बेलसरे यांची भावपूर्ण प्रस्तावना महाराजांच्या ग्रंथाला लाभली आहे. या प्रवचनांतून महाराजांनी प्रापंचिकांना, तसेच पारमार्थिकांनाही बोध केला आहे. महाराज म्हणतात,

"प्रेम हे सर्वांना उपजतच येत असते. हा माझा मुलगा, ही माझी मुलगी असे आपण सांगतो. त्यांच्यावर प्रेम कसे करावे, हे कुणी शिकवावे लागत नाही. एकदा 'आपले' मानले की, प्रेम आपोआप निर्माण होते. पण हे प्रेमही खरे पाहिले तर स्वार्थी आहे. एक गृहस्थ मला भेटले. मी त्यांना विचारले, 'झालं का मुलाचं लग्न?' ते म्हणाले, 'नाही, उद्या आहे.' मुलगा चांगलं वागतो का, असे मी त्यांना विचारल्यावर ते म्हणाले, 'आत्ताच नाही सांगत. सहा महिन्यांनी सांगेन.' - स्वार्थाचे

प्रेम इतके अशाश्वत आहे ! मला सांगा, अशा प्रेमापासून सुख कसं लाभेल ? प्रपंचात आपण केवळ कर्तव्यबुद्धीने वागावे. मग 'मुलगा माझं ऐकत नाही' हा प्रश्नच उद्भवणार नाही.''

''खरोखर प्रपंच हा एखाद्या प्रयोगशाळेसारखा आहे. उच्च शिक्षण पुरे करण्यासाठी तिथे काही काळ शिकावे लागते. महाविद्यालयाच्या प्रयोगशाळेतून काही उत्पादन काढण्याचा उद्देश नसतो. फक्त विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी त्याचा उपयोग होतो. तिथे सर्व काही शिकून घ्यायचे असते. ते किती उपयोगी पडेल व त्यापासून किती फायदा होईल, ही अपेक्षा ठेवायची नसते. त्याप्रमाणे प्रपंच ही परमार्थाची प्रयोगशाळा समजावी.''

''मनुष्य जन्मभर जो व्यवसाय करतो, त्याच्याशी तो एकरूप होऊन जातो. नोकरी करणारा माणूस आपल्या नोकरीशी इतका एकरूप होतो की, स्वप्नातही तो स्वतःला नोकर समजूनच राहतो. कर्म कसे करावे, तर त्याच्यापासून वेगळे राहून. लग्नाचा सोहळा भोगावा. लाडू खावेत, पण ते दुसऱ्याचे आहेत असे समजून. आपल्या मुलाचे किंवा मुलीचे नाहीत, हे जाणून. नाहीतर व्याह्यांची काळजी लागायची किंवा मानपान झाले किंवा नाहीत, इकडे लक्ष लागायचे ! त्यामुळे तापच होईल.''

''आजपर्यंतचा आपला अनुभव पाहिला, तर आपण केले असे फारच थोडे असते. म्हणून परिस्थितीबद्दल फारशी काळजी करू नये. आपण आपले कर्तव्य तेवढे योग्य रीतीने करावे. आपल्या वृत्तीवर परिणाम होऊ देऊ नये. प्रत्येक गोष्ट घडायला योग्य वेळ यावी लागते. 'तुका म्हणे नाही, चालत तातडी । प्राप्तकाळ घडी, आल्याविण''', हे ध्यानात ठेवावे. तेव्हा कर्तव्यबुद्धीने वागून काय ते करावे. 'भगवंता, हा प्रपंच तुझ्या इच्छेने चालला आहे,' असे म्हणावे. मग आपोआप भगवंताचे प्रेम लाभेल.''

''प्रपंचातले जे आपलेपण आहे, ते भगवंताकडे वळवावे. घरातल्या माणसांवर निःस्वार्थ बुद्धीने प्रेम करायला शिकावे. ते जमले म्हणजे परमार्थ आपोआप साधेल. आपलेपणा भगवंताकडे वळविला, म्हणजे भगवंतावर प्रेम जडेल. त्यासाठी काही वेगळे करायला नको. फणस चिरताना हाताला तेल लावून तो कापावा लागतो व त्यातले गरे काढावे लागतात. मग हाताला चिकाचा त्रास न होता गरेच चटकन् निघतात. देवाचे नाव घेऊन प्रपंचात व्यवहार केला, म्हणजे अहंकाराचा चीक न लागता, ईश्वरी कृपेचे गरे हस्तगत करता येतात. लहान मुले पावसाळ्यात कागदाच्या छोट्या होड्या पाण्यात सोडतात. एखादी होडी तरली, तरी हसतात; बुडाली तरी हसतात. तशीच प्रपंचातली सुख-दुःखे हसत-खेळत झेलावित - हे सारे नामस्मरणाने साधते !''

या ग्रंथातील परमार्थ-बोध जसा आत्मोन्नतीच्या दृष्टीने उपयुक्त आहे, तशीच त्यातील व्यावहारिक शिकवण अनुभवाच्या कसोटीवर पडताळून पाहिलेली आहे. सर्वच प्रवचनांची निरूपणशैली प्रासादिक आणि प्रत्ययकारी आहे. 'हें तों प्रचीतीचें बोलणें' आहे. वर्षातील प्रत्येक दिवशी सकाळी या ग्रंथातील एकेक प्रवचन वाचावे. त्यातला संदेश मनी-मानसी मुरवावा; आणि प्रसन्न वृत्तीने तो तो दिवस सत्कारणी लावावा. प्रस्तुत प्रवचन-ग्रंथ हा जीवनाचा ग्रंथ आहे. 'तुका म्हणे मनीं पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा', असा प्रत्यय देण्याचे बळ महाराजांच्या या ग्रंथात आहे. एखाद्या प्रवचनाच्या शलाका - दर्शनावरूनही त्याची प्रचीती येते. श्रीमहाराज म्हणतात,

''परस्परांत प्रेम वाढविण्यासाठी काही गोष्टी जरुरीच्या आहेत. बारीक-सारीक गोष्टींकडे दुर्लक्ष करून प्रत्येकाच्या स्वभावाला थोडी सवलत ठेवावी. सर्वांना प्रेमाची अशी जी जागा असेल, तिच्याकडे दृष्टी ठेवावी. कोणतीही सूचना व्यक्तिगत स्वरूपात न देता, नम्रपणे व गोड शब्दांत सांगावी. हे सारे करताना स्वार्थाला आळा घालावा. म्हणजे, मी स्वतः जितका माझ्यासाठी आहे असे वाटते, त्यापेक्षा जास्त , मी दुसऱ्याकरिता आहे असे जाणवावे. ही जाणीव प्रेम वाढवायला मदत करते. ज्याला स्वार्थ साधायचा नाही, त्याला काही कमी पडणार नाही. जिथे निःस्वार्थ वृत्ती आहे, तिथे भगवंत पुरवठा करतो.''

'मी कुठं स्वार्थी आहे ? मी कुठं कुणाजवळ काय मागतो ?' असे आपल्याला वाटते. पण एवढ्याने 'स्वार्थदृष्टी नाही' असे म्हणता येणार नाही. अहंकाराइतकाच स्वार्थ जबरदस्त आहे. त्याच्या मुळ्या इतक्या खोल व बारीक असतात की, त्यांचा पत्ता लागत नाही.

स्वार्थ तीन प्रकारचा : कायिक, वाचिक व मानसिक. आपल्या देहाला दुसऱ्यासाठी कष्ट न होतील अशा दक्षतेने वागणे, हा कायिक स्वार्थ होय. माझ्या बोलण्याला सर्वांनी मान डोलवावी, माझे कमी-जास्त बोलणे लोकांनी निमूटपणे सहन करावे, या वृत्तीला वाचिक स्वार्थ म्हणता येईल. माझ्या मताप्रमाणे इतरांनी वागावे, माझे विचार बरोबर आहेत, अशी जाणीव त्यांनी ठेवावी, या इच्छेला मानसिक स्वार्थ म्हणता येईल.''

खरे तर, मी माझ्याकरिता जितका असेन, त्याहून जास्त मी दुसऱ्यासाठी असायला पाहिजे. मी स्वतःला जेवढी सवड ठेवतो, त्याहून थोडी जास्त सवड मी दुसऱ्यासाठी ठेवणे जरूर आहे. जे दुसऱ्याने आपल्या बाबतीत केलेले आपल्याला बरे वाटत नाही, ते आपण दुसऱ्याच्या बाबतीत करू नये. तसेच दुसऱ्याने जे आपल्यासाठी केल्यावर आपल्याला बरे वाटते, तेच आपण दुसऱ्याच्या बाबतीत करावे.

हेच सर्वांचे सार आहे. हाच खरा धर्म आहे. आपण जगावर प्रेम केल्याशिवाय आपल्याला परत प्रेम मिळणार नाही. आपण अनेक लोकांवर प्रेम केले, तर आपण एकटेच त्यांचे करतो. पण प्रसंगाला ते सर्वजण आपल्याला मदत करतात. जो पुष्कळांचा झाला, तोच भगवंताचा झाला!''

**डॉ. हे. वि. इनामदार**
'संतोष', भारती निवास कॉलनी,
६०/१५, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

● **मनुष्य डोळे उघडे ठेऊन प्रपंच करील तर तो एका वर्षापेक्षा त्यात अधिक काळ राहणार नाही.**

# श्रीमहाराजांनी सांगितलेले काही जुन्या व इतर काही घटनांचे व वचनांचे अर्थ

**डॉ. वा. रा. अंतरकर**

*एम. ए. एल. एल. बी., पीएच. डी. प्रबंध 'श्रीमत् आद्य शंकराचार्यांचा जीवनवृत्तांत.' २३ वर्षे खालसा कॉलेज येथे संस्कृत व अर्ध मागधीचे प्राध्यापक. ३ पुस्तके प्रसिद्ध.*

## प्रास्ताविक

महाभारत व रामायण यासारखी आर्ष महाकाव्ये किंवा भागवत विष्णुपुराणासारखे पुराणग्रंथ हे आजच्या अर्थाने ऐतिहासिक नसले तरी त्या नुसत्या दंतकथाही नाहीत. महाभारत व रामायण यांतील मध्यवर्ती पात्रे व घटना पूर्णपणे काल्पनिक (किंवा नुसत्या कविकल्पना) नाहीत, त्यात पुष्कळसे ऐतिहासिक सत्य आहे आणि त्याचप्रमाणे पुराणातही पुष्कळ ऐतिहासिक माहिती आहे हे आता पुष्कळ विद्वानांनी (उदा. विल्सन - पुराणांबद्दल) मान्य केल्यासारखे आहे. या निरनिराळ्या ग्रंथांत वर्णन केलेल्या काही घटनांबद्दल अनेकांना शंका उत्पन्न होतात. अशा काही घटनांबद्दल श्रीमहाराजांना विचारले असता त्यांनी त्यांचा अर्थ समजावून सांगितला. काही पौराणिक घटनांतील सहजी न उमगणारे असे सांकेतिक अर्थही त्यांनी उलगडून सांगितले. त्याचप्रमाणे जीवनातील काही साध्या व स्वाभाविक घटनांचे व वचनांचेही अर्थ त्यांनी उलगडून सांगितले. हे सर्व अर्थ सर्वांनाच पटतील किंवा समाधानकारक वाटतील असे नाही. परंतु आम्हास तरी ते बोधप्रद वाटल्यावरून त्यातील काही यथास्मृति पुढे देत आहोत.

१) महाभारताच्या सभापर्वात शकुनी व युधिष्ठिर यांच्यामधील द्यूतक्रीडा व नंतरचे द्रौपदीवस्त्रहरण या घटना वर्णन केलेल्या आहेत. द्रौपदीस पणाला लावून युधिष्ठिर हरल्यानंतर दुर्योधनाच्या सांगण्यावरून दुःशासनाने द्रौपदीला तिच्या केसांना धरून खेचीत भर दरबारात आणले. त्या वेळी 'युधिष्ठिर स्वतःला पणाला लावून त्यात हरल्यानंतर आपल्याला (म्हणजे द्रौपदीला) पणाला लावून त्यातही हरला की स्वतः हरण्यापूर्वी तिला पणाला लावली.' असे द्रौपदीने भीष्मांना विचारले. तेव्हा भीष्म काही उत्तर न देता गप्प राहिले. या संदर्भात प्रा. अ. बा. गजेंद्रगडकर म्हणाले होते की, ('And to his eternal shame, Bhishma remained silent.') त्यानंतरच्या द्रौपदीच्या वस्त्रहरणप्रसंगीसुद्धा भीष्मांनी ते थांबवण्याचे दृष्टीने काहीही हालचाल अथवा प्रयत्न केला नाही. सर्वांचे पितामह म्हणून त्यांनी हस्तक्षेप करावयास पाहिजे होता. पण त्यांनी काही का केले नाही अशी शंका येते. याबद्दल श्रीमहाराजांना विचारले असता ते म्हणाले, 'महाभारतात तीन महत्त्वाची पात्रे आहेत. श्रीकृष्ण, भीष्म आणि द्रौपदी. त्यापैकी श्रीकृष्ण हा केवळ मानवी नसून ईश्वरी अंश आहे असे त्या वेळच्या ज्या अगदी थोड्या व्यक्तींना माहीत होते त्यात भीष्म आणि द्रौपदी ही होती. त्यांच्यामध्येसुद्धा द्रौपदीवर कसाही प्रसंग आला तरी ती आपले संरक्षण करू शकत होती हे भीष्म जाणून होते. तिची ती अलौकिक शक्ती प्रकट होऊन सर्वांना ती कळावी यासाठी भीष्म मध्ये न पडता गप्प राहिले. आणि मग तिची लज्जा रक्षण करण्याकरता श्रीकृष्णांनी अंबरावतार धारण करून तिचे संरक्षण केले. यामुळेच द्रौपदीचा अलौकिक अधिकार प्रकट झाला व सिद्धही झाला. एरवी तो तसा झाला नसता.

२) द्यूतांत हरल्यानंतर पांडवांना वनवासात जावे लागले. तेथे राहात असता एकदा श्रीकृष्ण त्यांना भेटायला आले. द्रौपदीला भेटले असता अर्थात् वस्त्रहरण प्रसंगासंबंधी प्रश्न निघाला. द्रौपदी म्हणाली, 'कृष्णा, माझी भर राजसभेत इतकी विटंबना चालू असता आणि नंतर तुझ्या नावाने इतका आक्रोश करीत असता तू होतास कुठे ? मला म्हणजे तुझ्या बहिणीला सर्व लोकांनी नग्न पाहावी अशी तुझी इच्छा होती का ?' तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, 'अगं, मी दरवाजाच्या बाहेरच उभा होतो. परंतु आतून अडसर लावलेला असल्याने मला आत येता येत नव्हते. तो निघाल्याबरोबर मी आत आलो व तुला वाचवले.' श्रीमहाराजांनी श्रीकृष्णाच्या म्हणण्याचा भावार्थ सांगितला तो असा :

दुःशासनाने द्रौपदीच्या वस्त्राला हात घातला तेव्हा तिने संरक्षणार्थ म्हणून प्रथम आपल्या पतींकडे पाहिले. परंतु सर्व आधीच 'जित' म्हणून दास झाले होते म्हणून त्यांनी माना खाली घातल्या होत्या व अशा प्रकारे आपली असमर्थता प्रकट केली. त्यानंतर तिने भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र यांचेकडे राजसत्ता आपल्याला मदत करील म्हणून आशेने पाहिले. परंतु त्या सर्वांनीही निराशाच केली. पुढे आपले वस्त्र सुटू नये म्हणून तिने एक हात निऱ्यांवर ठेवला व दुसरा हात वर करून ती श्रीकृष्णाचा धावा करू लागली. पुढे निरीचा हातही सोडून तोही वर केला व दोन्ही हातांनी श्रीकृष्णाला कळवळून हाक मारू लागली तेव्हा तो एका मागोमाग वस्त्ररूपाने प्रकट झाला आणि तिचे संरक्षण झाले. याचा अर्थ असा की प्रथम पती, मग राजसत्ता असे दुसरे कोणीतरी संरक्षण करील असे वाटत होते. पुढे आपले रक्षण आपणच करू असे वाटून एका हाताने वस्त्र धरून ठेवले तेव्हाही अहिल्यासारखेच श्रीकृष्ण प्रकट झाले नाहीत. याप्रमाणे श्रीकृष्णावाचून कोणीतरी शक्ती आपले संरक्षण करील असे तिला वाटत होते तोपर्यंत श्रीकृष्ण प्रकट झाले नाहीत. अशी तिला वाटणारी आशा हा अडसर होता. सरतेशेवटी सर्व आशा नष्ट होऊन आता कोणी रक्षण करील तर श्रीकृष्णच अन्य कोणीही करणार नाही या खऱ्या व अगदी आर्त भावनेने तिने निरीवरचा हातही सोडून दोन्ही

हात वर केले म्हणजे तिचे ठिकाणी खरी अनन्यता (अन् + अन्य = दुसरे नाही) किंवा अनन्यशरणागती आली तेव्हाच तो अम्बररूपाने प्रकट झाला व तिला वाचवले. द्रौपदीच्या ठिकाणी असलेले अनन्यशरणागतीचे माहात्म्य अशा तऱ्हेने जगासमोर आले. परमेश्वरावाचून दुसऱ्या कशाचीही कणभरही आस नसणे हे अनन्यशरणागतीचे रहस्य आहे आणि अशी शरणागती असणे / येणे परमेश्वर प्राप्तीचे एकमेव मर्म (Sine Qua non) आहे.

३) वृन्दावनात दरवर्षी गोप-गोपी इंद्रमहोत्सव साजरा करीत. एका वर्षी श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून त्यांनी तो न करता त्याचेऐवजी गोवर्धन पर्वताची पूजा केली. त्यामुळे चिडून जाऊन इंद्राने तो पर्जन्याची देवता असल्याने वृंदावनात सतत मुसळधार पाऊस पाडून तेथील जनजीवन व प्राणिजीवन पार उध्वस्त करून टाकले. तेव्हा श्रीकृष्णाने सबंध गोवर्धन पर्वत वर उचलला व आपल्या करंगळीवर तोलून धरला आणि अशा रीतीने सर्व वृंदावनवासियांना त्याच्या खाली आसरा दिला. परंतु त्याने त्याचबरोबर तेथील सर्व लोकांना आपापल्या काठ्या त्या पर्वताला लावायला सांगितले. याचा भावार्थ सांगताना श्रीमहाराज म्हणाले, 'सर्व विश्वाचा भार परमात्मा एकटाच आपल्या सामर्थ्याने उचलतो व सांभाळतो आणि तेही अगदी सहजपणे - लीलया (म्हणून करंगळी) म्हणजे सर्व विश्वात खरे कर्तेपण त्याचे एकट्याचेच आहे व विश्वातील सर्व गोष्टी त्याच्याच इच्छेने चालतात. (याच अर्थाने काशीचे सर्वश्रेष्ठ न्यायपंडित श्री. राजराजेश्वर शास्त्री द्रविड एकदा पुण्यात आले असता आमचे देखत म्हणाले होते की 'विश्वातील सर्व कार्यकारणभावाचे पर्यवसान एका हरिच्छेत आहे.)' परंतु तरीही प्रत्येकाने आपल्या कर्तव्याची त्या विश्वाच्या व्यवहाराला लावली पाहिजे. ते करताना मात्र खरे कर्तेपण करंगळीचे आहे. काठीचे नाही, काठी निमित्तमात्र आहे हे ओळखून राहिले पाहिजे.

४) रासक्रीडा : श्रीकृष्णावर अनेकांनी अनेक आक्षेप घेतले आहेत. (म. म. बाळशास्त्री हरदास यांच्या 'भगवान श्रीकृष्ण' या पुस्तकातील प्रकरण - २ पाहावे.) त्याशिवाय त्याच्यावर विलासीपणाचा किंवा रंगेलपणाचाही एक आक्षेप आहे. भागवत पुराणातील १० व्या स्कन्धातील रासक्रीडा म्हणून प्रसिद्ध असलेली घटना याचा पुरावा म्हणून दाखवण्यात येतो. वृंदावनातील किंवा व्रजवासी अशा अनेक विवाहित गोपिका यांचेबरोबर केलेली नृत्य इ. क्रीडा या दृष्टीने आक्षेपार्ह किंवा संशयास्पद मानली जाते. ही घटना श्रीकृष्ण मथुरेला जाण्यापूर्वीची (ते गेले तेव्हा १४ वर्षांचे होते) आहे. याबद्दल श्रीमहाराजांना विचारले असता ते म्हणाले, 'रासक्रीडेच्या वेळी सर्व गोपींशी क्रीडा केली हे खरे नाही. त्या वेळी प्रत्येक गोपीने आपल्यातील श्रीकृष्ण बाहेर काढला म्हणजे प्रकट केला व मग त्याच्याशी रासक्रीडा केली. त्यामुळे गोपी किंवा श्रीकृष्ण यापैकी कोणाकडेच (व्यभिचारासारखा) दोष येत नाही.*

गोपी या आध्यात्मिकदृष्ट्या सामान्य स्त्रिया नव्हत्या. भक्तीच्या क्षेत्रात त्यांचा अधिकार फार मोठा होता. त्याबद्दलची पुष्कळ गमके मिळतात.

१) भक्तीच्या क्षेत्रातील फार मोठे अधिकारी संत कबीर. लोक त्यांच्या भक्तीची स्तुती करू लागले तेव्हा कबीर त्यांना म्हणाले, 'क्या कहते है कबीर कबीर जावे जमुनातीर । एक एक गोपीके प्रेममें बह गये कोटि कबीर ॥' यात कबीरांचा विनय आहे हे मान्य करूनसुद्धा गोपींचा अधिकार सिद्ध होतो हे निःसंशय !

२) गोपींच्या अलौकिक प्रेमाचा किस्सा भक्त सूरदासांनीही वर्णन केला आहे. श्रीकृष्णांचा अर्जुनाप्रमाणेच उद्धव हाही एक फार अधिकारी शिष्य होता. परंतु त्याला आपण ज्ञानी असल्याचा अहंकार होता आणि भक्तीचे रहस्य कळले नव्हते. ते त्याला कळावे म्हणून श्रीकृष्णांनी स्वतः निजधामास जाण्याचे वेळी त्याला वृंदावनात जाऊन 'आपण निजधामास जात असलो तरी ते आपले खरे स्वरूप नसल्याने त्याच्या जाण्याने दुःखी न होता खरे अंतिम सत्य जे निर्गुण ब्रह्म त्याचे ध्यान-चिंतन करावे, असा गोपींना निरोप सांगावयास सांगितले. त्याप्रमाणे उद्धव वृंदावनात गेला व आपण श्रीकृष्णाचा निरोप घेऊन आल्याचे कळविले. श्रीकृष्णाकडून तो आल्याचे कळताच सर्व गोपी त्याच्याभोवती गोळा झाल्या व श्रीकृष्णाबद्दल त्याला विचारू लागल्या. तेव्हा त्याने श्रीकृष्ण निजधामाला जात असल्याचे सांगून त्याने सांगितलेला सर्व निरोप त्यांना सांगितला. तो ऐकून झाल्यावर मात्र त्या त्याला म्हणाल्या, 'उद्धवा, श्रीकृष्णाला आम्ही लहानपणापासून ओळखतो. तो प्रथमपासूनच अतिशय लबाड आहे. त्याने तुला निर्गुण ब्रह्माचे वगैरे ज्ञान दिले परंतु सर्व ज्ञानाचा गाभा असलेले भक्तीचे रहस्य मात्र तुला सांगितले नाही. त्याला जाऊन आमचा निरोप सांग की, तुला निजधामाला वगैरे कुठे जावयाचे असेल तिकडे जा. परंतु आम्ही त्याला आमच्या अंतःकरणात धरून ठेवला. त्याची ताकद असेल तर त्याने तेथून बाहेर निघून जाऊन दाखवावे.' (जनाबाईचे अशाच अर्थाचे उद्गार आहेत : हृदय बंदिखाना केला । त्यात विठ्ठल कोंडिला ॥) निर्गुण ब्रह्माचे ध्यान करण्याचे संदर्भात सूरदासांनी पुढील शब्द घातले आहेत. 'उधो, मन न भये दस बीस । एक जो हतो वो गये श्यामसंग । कई आराधई ईश ॥' भावार्थ : उद्धवा, मनें दहा वीस नाहीत (किंवा नसतात). एक (मन) जे (आमच्याजवळ) होते ते श्याम म्हणजे कृष्णाबरोबर गेले (आहे). म्हणजे कृष्णरूप झाले आहे. (आता) कुठल्या मनाने ईशाची (निर्गुण ब्रह्माची) आराधना (त्याचे चिंतन वा ध्यान) करायची ?'

नारदभक्तिसूत्रात भक्तीच्या लक्षणांविषयी विविध मते सांगून झाल्यावर आपले सर्व आचार भगवंताला अर्पण होणे व त्याच्या विस्मरणात मनाला व्याकुळता उत्पन्न होणे (म्हणजे भगवंताचे अखंड स्मरण राहणे) हे आपले मत म्हणून सांगितले आहे. (सूत्र १९) आणि ते तसेच म्हणजे बरोबर आहे असे सांगून (सूत्र २०) अशा भक्तीचे उदाहरण म्हणून ब्रजगोपिका होत (यथा ब्रजगोपिकानाम् - सूत्र २१) असे म्हटले आहे.

एकूण या सर्व गोष्टींवरून भक्तीच्या क्षेत्रात ब्रजगोपिकांचा केवढा मोठा अधिकार होता व त्यांचे किती उच्च स्थान होते हे स्पष्टपणे दिसून येते.

* (गिरगाव, मुंबई येथील दामोदर सांवळराम आणि मंडळी

यांनी सन १९२८ मध्ये सर्व भागवतपुराण भाषांतरासह छापून प्रसिद्ध केले. त्यातील दशम स्कंधाच्या पूर्वार्धात अध्याय ३३ मध्ये रासक्रीडेचे वर्णन आहे आणि उत्तरार्धाच्या 'कृष्णस्तु भगवान् साक्षात्' या नावाने लिहिलेल्या प्रस्तावनेत (हा शब्द आमचा आहे) त्या वेळचे सुप्रसिद्ध कीर्तनकार कीर्तनसार्वभौम ह. भ. प. श्री. नानाबुवा कृष्णबुवा बडोदेकर / सुपेकर यांनी रासक्रीडेच्या संदर्भातील श्रीकृष्णावरील आक्षेपांना अत्यंत समर्पक उत्तरे दिली आहेत - (पृ. ४,५) त्यांचे स्पष्टीकरण अधिकतर व्यवहाराच्या दृष्टीने आहे तर श्रीमहाराजांनी दिलेले स्पष्टीकरण अत्यंत आध्यात्मिक दृष्टीचे आहे.)

५) रामनामाचे माहात्म्य : लंकेवर स्वारी करण्याकरता समुद्र उल्लंघन करणे जरूर होते. त्याकरता सागराच्या सांगण्यावरून समुद्रावर दगडांचा सेतू बांधायचे ठरले. दगड समुद्रावर तरंगतील असे सागराने सांगितले होते. त्या वेळी प्रथम रामांनी व नंतर वानरांनी पाण्यात दगड टाकले परंतु ते तरंगले नाहीत. तेव्हा राम बाजूला जाऊन बसले. मग मारुतीने एका दगडावर 'रा' व दुसऱ्या दगडावर 'म' अशी अक्षरे लिहून ते जोडी-जोडीने समुद्रात टाकण्यास सांगितले. त्याप्रमाणे वानरांनी केल्यावर ते दगड पाण्यावर तरंगू लागले. तेव्हा बाजूला बसलेल्या रामांनी मारुतीला हाक मारून 'हे काय आहे' असे विचारले. तेव्हा मारुतीराय त्यांना म्हणाले, 'रामा, तुम्ही मोठे आहातच. पण तुम्हाला तुमच्या नामाचे मोठेपण माहीत नाही. तुम्ही स्वतः टाकलेले दगड पाण्यात तरंगले नाहीत. परंतु तुमच्या नामाने अंकित असे दगड तरले इतके तुमच्या नामाचे मोठेपण (माहात्म्य) आहे.' राम म्हणजे नामी (परमात्मा) व (त्याचे) नाम त्याच्याशी एकरूप असल्याने नामी नामाला वेगळेपणाने पाहूच शकत नाही. म्हणजे नाम व नामी (म्हणजे राम किंवा परमात्मा) दोन वेगळी नाहीतच, एकरूपच आहेत व म्हणून रामांना नामाचे महत्त्व कळणे शक्य नाही. कारण ते कळायला ते त्यापासून वेगळे असले पाहिजेत. परंतु तसे ते नाहीत. म्हणूनच श्रीसमर्थांनी 'नामापासोनीया जाता नये तुज ।' असे म्हटले आहे. अशा प्रकारे येथे रामापेक्षा त्याचे नाम मोठे आहे हे सांगून नामाचे माहात्म्य केवढे आहे हे सांगण्याकरता श्रीमहाराज ही गोष्ट सांगत असत.

श्रीमहाराजांचे म्हणणे असे होते की, रावण हा मूर्तिमंत अहंकार होता. त्याला मारण्याकरता रामांचा अवतार होता. आज प्रत्यक्ष राम नाहीत परंतु प्रत्येक जीव (माणूस) कमी-अधिक अहंकाराने भरलेला आहे. त्याचा नाश करून त्याला भगवंताची प्राप्ती करून द्यायला रामनाम हे एकच साधन आहे.

दशरथाचे बाबतीतसुद्धा श्रीमहाराज म्हणत की, राम प्रत्यक्ष जवळ असता तर दशरथाने त्याला पुत्रभावाने व पुत्रप्रेमाने पाहिले असते व तो त्यात आसक्तीने अडकून मरण पावला असता. पण तो जवळ नसल्याने त्याचे अखंड स्मरण करीत व हे राम, हे राम असे त्याचे नाम उच्चारीत त्याच्या अखंड अनुसंधानात मृत्यू पावला व परमपदवीला पोचला.

श्रीतुकारामांनीही हेच नामाचे नामाशी तादात्म्य सुचवून नामाचे महत्त्व वर्णन केले आहे. ते म्हणतात : कुमुदिनी काय जाणे परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ।। तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हीच तें प्रेमसुख जाणों ।।

श्रीकृष्णाच्या बाबतीत एक गोष्ट सांगितली जाते. तो अगदी लहानपणापासून दिसण्यात अत्यंत सुंदर व मोहक होता. (भागवत पुराणाच्या १० व्या स्कन्धाच्या पूर्वार्धात - अ. ३३ यासंबंधी सविस्तर वर्णन आले आहे.) एकदा तो अगदी लहान असताना यशोदा त्याला मांडीवर घेऊन बसली असता ती त्याच्याकडे पाहून मोहून गेली व त्याला म्हणाली, कृष्णा, तुझे सौंदर्य इतके मोहक आहे ! परंतु तुला त्याचा काय उपयोग आहे ? ते सौंदर्य पाहाण्याचे सुख व भाग्य फक्त आम्हालाच आहे, तुला नाही !

६) श्रीमहाराजांना एकदा पुढील प्रश्न विचारला गेला, 'राम सीतेच्या सांगण्यावरून सुवर्णमृगाच्या मागे गेले असता लक्ष्मण सीतेच्या रक्षणाकरता मागे राहिला होता. काही वेळानंतर अगदी रामाच्या आवाजात 'लक्ष्मणा धाव, लक्ष्मणा धाव' अशी मदतीकरता म्हणून आर्त हाक ऐकू आली. ती ऐकून राम संकटात आहेत असे वाटून सीतेने लक्ष्मणाला रामाच्या मदतीला जाण्यास सांगितले. परंतु 'ही मायावी राक्षसांची माया आहे. राम स्वतःचे संरक्षण करण्यास समर्थ आहे', वगैरे सांगून जाण्यास नकार दिला. सीतेने आग्रह करूनही तो गेला नाही तेव्हा ती म्हणाली, 'आता तुमचा आमच्या बरोबर येण्यामागचा उद्देश माझ्या ध्यानात आला. इकडे कोणत्यातरी रीतीने राम मारले गेल्यानंतर तुम्हाला माझी प्राप्ती होईल, या अपेक्षेने तुम्ही आमच्याबरोबर आलात. परंतु तुमचा तो उद्देश कधीही सफल होणार नाही.' मग मात्र लक्ष्मण तेथून निघून वनात गेला. येथे प्रश्न असा उभा राहतो की सीता ही आदिमाया आहे, असे मानले जाते. हे खरे असेल तर ती पूर्ण ज्ञानी असली पाहिजे. तसे असेल तर तिला लक्ष्मणाचे अंतरंग पूर्णपणे माहीत असले पाहिजे आणि हे खरे असेल तर आपण लक्ष्मणाला जे बोलतो आहोत ते पूर्णपणे सत्याला सोडून आहे, इतकेच नाही तर लक्ष्मणासारख्या अत्यंत शुद्ध चारित्र्याची अक्षम्य बदनामी करणारे व म्हणून अत्यंत अन्यायाचे आहे हे तिला कळत नव्हते का ? कळत नसेल तर ती ज्ञानी नसली पाहिजे आणि ज्ञानी असेल तर तिच्या बोलण्याचे स्पष्टीकरण काय ?' यावर श्रीमहाराज म्हणाले, 'सीता ज्ञानी होती हे खरेच परंतु त्यामुळेच रामजन्माचे प्रयोजन रावणाला मारणे हे होते हेही तिला माहीत होते. त्याकरता रावणाकडून तिचे अपहरण होणे अवश्य होते. जोपर्यंत लक्ष्मण सीतेजवळ होता तोपर्यंत रावणाला सीतेचे अपहरण करणे केवळ अशक्य होते. त्याकरता लक्ष्मणाला तेथून काढून लावणे व दूर घालवणे जरूर होते आणि सीता त्याला जे बोलली त्याशिवाय इतर कोणत्याही कारणास्तव तो तेथून निघून जाणे शक्य नव्हते. म्हणून ती तशा प्रकारे त्याला बोलली. रामजन्माचे प्रयोजन सिद्ध करणे हा त्या बोलण्यातला उद्देश होता आणि त्याकरता दुसरा कोणताही मार्ग नव्हता.

७) श्रीमहाराज एकदा दक्षिणेत बालाजीच्या मंदिरात गेले होते. तेथील बालाजीची मूर्ती अगदी लहान असून त्यावर कपडे, दागिने, हार, फुले वगैरेचा साज इतका मोठ्या प्रमाणावर की मूळची बालाजीची मूर्ती

अजिबात दिसतच नव्हती. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'परमेश्वराचे असेच आहे. तो अत्यंत लहान म्हणजे अत्यंत सूक्ष्म आहे. त्याच्यावर विश्वाच्या पसाऱ्याचे आवरण (पांघरूण) एवढे पडले आहे की त्यामुळे तेच फक्त दिसते आहे व परमात्मा त्याने झाकून गेला असल्याने तो दिसतच नाही. ते नाहीसे होण्याकरता त्याचीच कृपा पाहिजे.' (ईशावास्योपनिषदांतील 'हिरण्मयेन पात्रेण सत्यस्याऽपिहितं मुखम् ।' या पूर्वार्धात आवरणाची संकल्पना आणि 'तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ।' या उत्तरार्धात कृपेची संकल्पना सांगितली आहे.)

८) वायू / पवनसुत हनुमान / मारुती : एकदा गोंदावल्यास पूर्वीच्या बॉम्बे कॅम्पच्या वरच्या मजल्यावरील मोठ्या हॉलमध्ये प्रा. बेलसरे राहिले होते व त्या वेळी ते तेथे जवळ जवळ एकटेच होते. त्या वेळी आजुबाजुला तसे बांधकाम नसल्यामुळे आणि सर्व बाजूंनी भरपूर खिडक्या असल्यामुळे सर्व बाजूंनी फार जोराचा वारा हॉलमध्ये येत होता. त्या वाऱ्यामुळे प्रा. बेलसरे यांचे डोके जरा दुखू लागले. दुपारी ४ चे सुमारास ते श्री. तात्यासाहेब केतकरांचे खोलीत गेले असता श्रीमहाराजांची भेट झाली. त्यांनी प्रकृतीबद्दल विचारले तेव्हा प्रा. बेलसऱ्यांनी डोके दुखत असल्याचे सांगितले. तेव्हा 'वाऱ्यामुळे त्रास झाला आहे. बरे वाटेल.' असे म्हणून श्रीमहाराज पुढे म्हणाले, 'तसे पाहिले तर वारा म्हणजे शक्तीच नाही का ? त्याचा आघात झाला म्हणजे परिणाम होणारच ! मारुतीलाही पवनसूत किंवा वायुसूत म्हणतात ते याच अर्थाने. मारुती म्हणजे शक्तिच आहे व ती व्यक्त किंवा प्रकट झालेली आहे. म्हणून त्याला पवन / वायुसूत = वाऱ्याचा मुलगा म्हणतात. (मुलगा हा बापाचे व्यक्त किंवा प्रकट स्वरूपच असते - 'आत्मा वै पुत्रनामाऽसि' असे शास्त्रवचनच आहे. एरवी पवन किंवा वायू अशी कोणी व्यक्ती नाही. विश्वात शक्ती भरून राहिलेली आहे व ती सर्व घटना घडवून आणते. ती मारुतीरूपाने प्रकट झाली म्हणून मारुती म्हणतात. ('मारुती' हा शब्दही मरुत् = वारा - मरुतः अयं मारुतिः अशीच आहे.) (श्रीसमर्थांनीसुद्धा जगाच्या ह्म. विश्वाच्या मुळाशी वायू व जाणीव अशी दोन प्रकारची शक्ती आहे, असे म्हटले आहे आणि श्वेताश्वेतरोपनिषदांत परमेश्वराची शक्ती ज्ञान-क्रिया व बलक्रिया अशी अनेक प्रकारची आहे असे म्हटले आहे. 'पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञान बल क्रिया च ।। ६:८ उत्तरार्ध). आता शक्ती ही कशाच्या तरी आधारानेच राहते. तो आधार म्हणजे राम आहे आणि म्हणून राम आणि मारुती (शक्तिमान् आणि शक्ति) अलग राहूच शकत नाहीत. म्हणूनच जेथे रामाची मूर्ती किंवा रामाचे देऊळ आहे तेथे मारुतीची मूर्ति किंवा मारुतीचे देऊळ असायचेच अशी आपली परंपरा आहे.' हे अत्यंत अभिनव स्पष्टीकरण ऐकून प्रा. बेलसरे आश्चर्यचकित झाले व ते श्रीमहाराजांना म्हणाले, 'हे सर्व आपणास सुचते कसे ?' तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'त्यात काय आहे ? एखादी वस्तू (त्यांनी कपाटाचा उल्लेख केला असे वाटते) समोर असेल तर तिचे वर्णन करणे कठीण आहे का ? एक पेटी आहे व त्यात अनेक रत्ने भरलेली आहेत. परंतु त्या पेटीला कुलूप असल्यामुळे ती असून नसल्यासारखी आहेत. पण त्या कुलुपाची किल्ली मिळाली तर ती सर्व रत्ने आपल्या हातात येतील. माझ्या गुरुंनी ती नाम-रूपी किल्ली दिली व त्यामुळे सर्व प्रकारची ज्ञानरूपी रत्ने माझ्या हातात आली. तीच किल्ली मी तुम्हा (सर्वांस) दिली. पण तुम्ही ती (जशी वापरायला पाहिजे तशी) वापरीत नाही त्याला मी काय करू ?'

या शेवटच्या संदर्भात श्रीसमर्थांच्या ओव्या प्रकर्षाने आठवतात :

भांडारगृहें भरलीं । परी असती आडकलीं । हातास न येतां किल्ली । सर्वही अप्राप्य ।। सद्‌गुरुकृपा तेचि किल्ली । जेणें बुद्धि प्रकाशली । द्वैतकपाटें उघडलीं । एकसरां ।। (दासबोध - ७:२:११,१३).

९) श्री. भाऊराव आठवले, पुणे : (कै.) श्री. भाऊराव हे कंत्राटदार म्हणून काम करीत असत. ते आळंदीचे योगी श्री. गोडबोले महाराज यांचे शिष्य होते. त्यांना साधुसंतांकडे जाण्याची मोठी इच्छा असे. त्याप्रमाणे ते श्री. पाचलेगावकर महाराजांना भेटले होते. तसेच आळंदीचे श्रीनृसिंहसरस्वती स्वामी यांचेकडेही जात असत. (त्यांच्या देहावसानानंतर ते त्यांच्या तेथील मठाचे पंच म्हणून काम पाहात असत.) विशेषकरून त्यांच्या कामाच्या निमित्ताने ते सुमारे ७ वर्षे बंगलोर येथे राहत असताना तेथून जवळ असलेल्या तिरुवन्नमलई येथील भगवान् श्रीरमण महर्षींकडे पुष्कळ वेळा जात असत. पुढे त्यांची श्रीमहाराजाशी गाठ पडली व त्यांना त्यांचे बोलणे वगैरे सर्वच व्यवहार इतका आवडला की, ते एक दिवस श्रीमहाराजांना म्हणाले, 'मी इतके दिवस निरनिराळ्या लोकांकडे जात राहिलो तो वेळ व ते श्रम सर्व फुकट गेले. मला येथे जसे समाधान झाले तसे कोठेच झाले नाही.' तेव्हा श्रीमहाराज एकदम म्हणाले, 'छे छे ! असे म्हणू नये. तुम्ही इतक्या लोकांकडे गेलात म्हणूनच आपली गाठ पडली.' यात श्रीमहाराजांनी इतरांना (साधुसंतांना) कमीपणा येऊ दिला नाही.

एकदा श्री. भाऊराव आठवले श्रीमहाराजांना म्हणाले, 'माझे गुरु (ह्म. योगी गोडबोले महाराज) मला बाजारहाट करणे, इतर बाहेरची व्यवहाराची अनेक कामे करायला सांगतात. मला त्यांची जरासुद्धा आवड नाही. परंतु तरीही ती (गुरुआज्ञा म्हणून) करावी लागतात. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'तुम्हाला ती कामे करायला नकोत असे वाटते तोपर्यंत ते तुम्हाला ती करायला सांगतील. ती नको वाटेनाशी झाली म्हणजे ते ती सांगणार नाहीत.' (शिष्याचे संकल्प-विकल्प मोडणे हे सद्‌गुरुचे एक महत्त्वाचे कार्य असते. नाहीतर शिष्याने एखादी गोष्ट केली किंवा न केली यात सद्‌गुरुला काही स्वार्थ साधायचा नसल्याने त्यात त्याला काही स्वारस्य नसते. या अभिप्रायाने श्रीमहाराजांनी वरीलप्रमाणे श्री. भाऊरावांना सांगितले).

१०) एकदा श्रीमहाराजांकडे एक इसम आला. त्याच्या घरात काहीतरी अनिष्ट घटना घडली होती. तो श्रीमहाराजांना ते सांगून म्हणाला, 'आमचे (कोणाचे) हातून काही चूक वा पाप घडले का ज्यामुळे ही घटना घडली ? म्हणजे त्यामुळे आम्हाला परमेश्वराने ही शिक्षा म्हणून केली ?' त्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'छे छे ! असे काहीही नाही आणि आपल्या हातून चूक झाली म्हणून त्याने आपल्याला

त्याकरता शिक्षा करायची असे ठरवले तर त्याला आपल्याला पावलोपावली शिक्षाच करीत राहावे लागेल.' श्रीमहाराजांच्या म्हणण्याचा भावार्थ असा : खरे पाहता आपण ज्याला पाप (म्हणजेच दोष किंवा चूक किंवा अपराध) म्हणतो ते वेगवेगळ्या (पाच) प्रकारचे आहे. ज्ञानाच्या परिभाषेत माझ्या खऱ्या मीचे विस्मरण व भक्तीच्या भाषेत भगवंताचे विस्मरण हे तत्त्वज्ञानाचे दृष्टीने पाप (metaphysical Sin) आहे. आपला सर्वच व्यवहार - प्रत्येक पाऊल - भगवंताच्या विस्मरणातच चालू आहे. म्हणजेच आपले प्रत्येक पाऊल चुकीचे, सदोष किंवा पापात्मक आहे आणि अशाला शिक्षा करायची असे परमेश्वराने ठरवले तर त्याला आपल्याला प्रत्येक पावलाला - आपल्या प्रत्येक कृतीबद्दल शिक्षाच करीत राहावे लागेल.

११) भस्मासूर माणूस : माणसाने भगवंताच्या अखंड अनुसंधानांत - स्मरणात सर्व व्यवहार करावा असे श्रीमहाराज नेहमी सांगत. ते त्यांच्या सर्व शिकवणुकीचे सार होते आणि निरनिराळ्या पद्धतींनी ते ते लोकांना पटवायचा व त्यांच्या मनावर ठसवायचा प्रयत्न करीत राहिले. परंतु माणसांचा जवळ जवळ सर्व व्यवहार या उपदेशाच्या अगदी उलट म्हणजे भगवंताच्या विस्मरणातच चालतो. या संदर्भात श्रीमहाराज म्हणत की, माणूस हा भस्मासुरासारखा आहे. याबद्दलचे त्यांचे सांगणे असे असे : भगवान शंकराने भस्मासुर नावाच्या राक्षसाला तो ज्याच्या डोक्यावर हात ठेवील त्याचे तत्काल भस्म होईल, असा वर दिला. त्यानंतर एकदा त्याने शंकराकडे त्याची बायको पार्वती हिचीच मागणी केली. शंकराने त्याची मागणी नाकारली तेव्हा तो शंकराच्याच डोक्यावर हात ठेऊन त्याला भस्मसात करायला निघाला. तसे माणूस वागण्यात करतो असे श्रीमहाराजांचे म्हणणे होते. त्यांचे स्पष्टीकरण असे होते : परमेश्वराने माणसाला दोन देणग्या दिल्या - एक विस्मरण व दुसरी बुद्धी. विषयाच्या विस्मरणात माणसाने भगवंताचे अखंड स्मरण ठेवावे (आणि त्या स्मरणात सर्व व्यवहार करावा) हा पहिल्या देणगीचा उद्देश आणि भगवंताचे खरे स्वरूप जाणून घेण्याकरता बुद्धि दिली हा दुसरीचा उद्देश. परंतु माणसाने विषयांच्या अखंड स्मरणात त्यात रंगून जाऊन भगवंताचेच विस्मरण घडविले आणि जी बुद्धी भगवंत जाणून घेण्याकरता दिली तिने त्या भगवंताचे अस्तित्वच तो असिद्ध करू (disprove) करू लागला. अशा रीतीने भगवंताने दिलेले गुण त्याच्यावरच उलटविले. माणूस असा भस्मासुर आहे, असा श्रीमहाराजांचा अभिप्राय आहे.

डॉ. वा. रा. अंतरकर,
बी - ५, जयराम निवास,
११६ टिळक मंदिर रस्ता, विलेपार्ले (पू.),
मुंबई ४०० ०५७.

# व्यवहार्य परमार्थाची गंगोत्री


**डॉ. सुहास पेटे**

*एम. ए., पीएच. डी., (तत्त्वज्ञान) बँक अधिकारी. ७ पुस्तके प्रसिद्ध. हिन्दी-मराठी वाङ्मय अनुवाद. काव्य संग्रह प्रकाशित. श्रीमहाराजांवर 'अभंग साधना' व 'चैतन्य चिंतन' प्रकाशित.*


## श्रीमहाराज व त्यांची शिकवण

अत्यंत अल्प वयात ज्यांच्या ठायी प्रखर वैराग्य झळकत होतं, गुरुशोधासाठी तीव्र साधना, गुरुप्राप्ती, गुरुकृपा, भगवंताचं दर्शन - पूर्ण समाधान - हे सारे अवघड टप्पे ज्यांनी वयाच्या अवघ्या चौदा-पंधराव्या वर्षी पार केले - असे अलौकिक सत्पुरुष श्रीमहाराज. त्यांच्या या पूर्वायुष्यातला हा प्रवास नि गती पाहिली म्हणजे आपल्याला असं सहजच वाटेल की पंधराव्या वर्षापासून पुढे देह ठेवीपर्यंत म्हणजे एकूणसत्तराव्या वर्षापर्यंतच्या प्रदीर्घ काळात स्वाभाविकच त्यांनी लोकांसाठी जे काही केलं असेल, सांगितलं असेल ते स्वतःच्या या लोकविलक्षण गतीच्या-स्थितीच्या भूमिकेवरूनच असणार. अनेकदा असंच आढळतं की एखादी कठीणात कठीण साधना करणारा व तीत यशस्वी होणारा इतरांनाही तशाच कठीण साधनेचा उपदेश करतो, तशा साधनेचा आग्रह धरतो. आधी बहुधा इतकी मुक्त अवस्था अनुभवल्यावर ती सोडून इतरांच्यासाठी काही न करण्याकडेच त्याचा कल असतो. त्यातही काही उपदेश केलाच तर तो अशा स्वतः चोखाळलेल्या मार्गासारखाच कठीण व असाध्य साधनेचा असतो. ही गोष्ट एक प्रकारे स्वाभाविक म्हणावी लागेल.

पण याबाबतीत श्रीगोंदवलेकर महाराजांची आत्मदर्शनाची स्वतःची खडतर साधना पाहिली व त्यांनी आपल्या शिकवणुकीतून इतरांना सुचवलेली साधना पाहिली तर मात्र सामान्य माणसांना खरोखर एक सुखद धक्का बसेल अशी वस्तुस्थिती प्रथमदर्शनी समोर येते. त्यांनी कितीही खडतर, व्यवहाराला, कुवतीला आपल्या आटोक्याबाहेर असणारे साधन प्रकार अवलंबले असले तरी त्यांनी आपल्याला उपदेशिलेली साधना तिचे प्रकार कुठेही आपली व्यवहाराची, समाजव्यवस्थेची, नीतिनियमांची, धर्मविचाराची, तर्क-बुद्धी-विचार यांची सर्वसाधारण चौकट न मोडणारी आहे. या साऱ्या अर्थाने त्यांची शिकवण ही अत्यंत 'व्यवहार्य' स्वरूपाची वाटते. आपण अखंड आनंदाच्या आत्मस्थितीत सतत राहायचं आणि त्याच वेळी 'बुडते हे जन न देखवे डोळा' अशा आत्यंतिक तळमळीनं अक्षरशः अहोरात्र-पदोपदी चुकणाऱ्या, नाना प्रापंचिक अडचणीत अडकलेल्या, विकारवासनांनी सतत हेलकावे खाणाऱ्या, साधनेला - अगदी साध्या-सोप्या साधनेलाही सत्रा सबबी सांगणाऱ्या आपल्यासारख्या असंख्य सामान्य माणसांना - अविरत समजून घेत राहायचं. त्यांचे वेळोवेळी प्रापंचिक लाड पुरवायचे, चुचकारून पुन्हा परमार्थ मार्गावर त्यांना आणायचं, त्यांच्यातली परमार्थाची - ईश्वरदर्शनाची कुठे थोडीशी असलेली धुगधुगी जागृत ठेवायची, फुलवायची, तिचं धगधगीत अग्नीत रूपांतर करायचं - हा सारा श्रीमहाराजांनी आजन्म आपल्या उपदेशातून - जगण्यातून केलेला खटाटोप पाहिला म्हणजे 'संतहृदय' काय असेल, त्यातली करुणामयता कशी असेल, याची थोडीफार कल्पना येते. आपल्या याच वेळी हेही लक्षात येतं की त्यांच्या हृदयातल्या सामान्य माणसांच्या हिताबद्दलच्या तळमळीनंच त्यांच्या शिकवणीला ही व्यवहार्यता आणली आहे.

## श्रींच्या उपदेशामागची तळमळ

खरं सांगायचं तर श्रींनी म्हटल्याप्रमाणं संतांच्या तळमळीची खरी कल्पना आपल्याला येणं कठीणच. तरीही एक बौद्धिक आकलन म्हणून पाहिलं तर श्रीमहाराजांना असं वाटे की खरं म्हणजे प्रत्येक जीव जेव्हा माणूस म्हणून जन्माला येतो तेव्हाच तो परमार्थासाठी नि भगवंताच्या - अखंड आनंदाच्या प्राप्तीसाठी जन्माला आलेला असतो. किंबहुना कळत असो नकळत असो प्रत्येक जण या आनंदाचाच शोध घेतो आहे. माणूस शिकतो, नोकरीधंदा करतो, लग्न, मुलं-बाळं-माणसं सारा व्याप वाढवतो. घरंदारं-जमीनजुमला सारं उभं करतो - ते सारं नकळत या आनंदासाठीच. श्रींनी एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणं 'प्रत्येकाला आनंद किंवा समाधान हेच हवं आहे आणि त्यासाठी त्याची खटपट चालू आहे. इतकंच नव्हे तर नास्तिकसुद्धा आनंदमय होण्यासाठीच 'देव नको' असं म्हणतो.

असं असताना मग सत्पुरुषांना सामान्य माणसांकडे पाहून अंतःकरणात एवढी कालवाकालव व्हायचं कारण काय ? तर सामान्य माणूस ज्या बेसावधपणानं हा सारा आनंदाचा शोध अशाश्वत जगाच्या चौकटीत घेण्याचा प्रयत्न करतो आणि त्यात आयुष्य खर्चून 'मोकळा' होतो - अखेर खराच 'मोकळा' - राहतो ते सारं या 'याचि देही याचि डोळा' शाश्वत आनंद अखंडपणे भोगणाऱ्या संतांना अस्वस्थ करतं. ती हिताची तळमळ घेऊन असे सत्पुरुष जगतात - उपदेश करतात.

हे सारं पाहाण्याचं कारण असं की श्रीमहाराजांच्या उपदेशाला इतकी सार्वत्रिकता, इतकी व्यवहार्यता, सर्वसामान्याला परमार्थ पचेल-रुचेल-परवडेल इतका साधा-सरळ करण्याची धडपड व करुणामयता का लाभली असेल याची पार्श्वभूमी कळावी. वास्तविक अनेकांची आजही कल्पना असते की परमार्थ किंवा त्यासंबंधीचा विचार करायला लागणं म्हणजेच जणू प्रपंचाकडे दुर्लक्ष, त्याची हेळसांड याची सुरुवात

होणं. या उलट श्रीमहाराजांनी उपदेशिलेल्या परमार्थाचा अभ्यास केला तर त्यात याचा कुठं मागमूसही नाही. उलट त्यांनी सांगितलेल्या मार्गानं जाण्यात, विचार करण्यात, प्रपंच कर्तव्यात तर कसूर होत नाहीच उलट तोच अधिक व्यवस्थित होईल. नेटकेपणानं होईल, फक्त कमी आसक्तीनं होईल. या संदर्भात श्रीमहाराजांनी नम्रपणे पण ठामपणे काढलेले उद्‌गार अवश्य पाहण्यासारखे आहेत. ते म्हणतात, 'माझ्या सांगण्याप्रमाणं वागण्यानं आजपर्यंत व्यवहारात आणि प्रपंचात कोणाचं नुकसान झालं आहे त्यानं येऊन सांगावं !'

## श्रींचा परमार्थ आणि व्यवहार्यता

श्रीमहाराजांना अभिप्रेत असलेल्या परमार्थाची काही ठळक वैशिष्ट्यं आहेत :

१) त्यांच्या दृष्टीनं परमार्थ हा बाह्यांगाचा नाही. विशिष्ट वेशभूषेवर, परिस्थितीवर तो जसा अवलंबून नाही तसा बाह्यांगानं कोणता बदल घडण्यावरही तो अवलंबून नाही.

२) परमार्थ मुख्यत्वे अंतरंगाचा, मनाचा, वृत्ती सुधारण्याचा आहे. त्यामुळेच त्याचा संबंध अथपासून इतिपर्यंत यातला 'अथ' तर फार महत्त्वाचा - स्वतःशीच आहे.

३) म्हणूनच त्यांनी उपदेशिलेला परमार्थ हा उगीचच कोणत्याही प्रकारचे कष्ट करण्याचा नि दमून जाण्याचा नाही. त्याचा खरा नि मोठा भर समजूतीवर आहे. त्यामुळेच पारायणं, यात्रा, पूजा-अर्चा, योगयाग, उत्सव अशा कुठल्या गोष्टींचा उपयोग त्यात नाही असं नाही पण त्यावाचून त्यात कुठं अडणार तर नाहीच, किंबहुना यातली कुठलीही पारंपारिक साधनं करताना सावधतेनं - समजून घेऊन करण्याविषयी त्यांचा कटाक्ष आहे.

४) या परमार्थाच्या वृत्तीशी संबंध असल्यानं याचा वयाशी - व्यवसायाशी संबंध अर्थातच कमी आहे. वृत्तीनं परमार्थी होण्याची जी गरज लहान मुलाला आहे तीच वयोवृद्ध माणसाला आहे, जी गरज नोकराला आहे तीच गरज त्याच्या मालकालाही आहे, जी गरज गरीबाला तीच श्रीमंताला आहे.

५) एका बाजूनं आपली प्रत्येकाशी असलेली कर्तव्यं यथाशक्ती बरोबर करणं आणि दुसऱ्या बाजूला कोणत्याही परिस्थितीत आतून भगवंताचे अनुसंधान सांभाळणं यात त्याचं मर्म आहे.

या तऱ्हेच्या श्रींनी उपदेशिलेल्या परमार्थाच्या वैशिष्ट्यांमधून त्यांच्या व्यवहार्यतेचीही कल्पना आपल्याला येऊ लागते. त्या तपशिलात अधिक जाण्यापूर्वी व्यवहार्यतेसंबंधी थोडक्यात पाहू.

१) गोष्ट कितीही महत्त्वाची असली किंवा एखाद्यानं सुचवलेला किंवा मांडलेला विचार-योजना कितीही हितकर आकर्षक असली तरी ती ज्यांच्यासाठी आहे त्यांना त्यांच्या सध्याच्या स्थितीत ती अंमलात आणणं कितपत शक्य आहे हा विचार आपण अपरिहार्यपणे करतो. तीच बाब पारमार्थिक जीवनपद्धतीची आहे. ती जरी कितीही आदर्श-अनुकरणीय-विलोभनीय वाटली तरी ती जर 'व्यवहार्य' नसेल, प्रत्यक्ष अंमलात आणण्याजोगी नसेल तर ती कागदावरच राहाते, ना तिचा व्यक्तीला उपयोग ना समाजाला.

२) दुर्दैवानं अनेकदा काहींच्या परमार्थ विचाराला ती कळा येते. तो वैचारिक-काल्पनिक दृष्ट्या अत्यंत आकर्षक व हिताचा वाटतो. पण अंमलात आणणं मात्र शक्य नसतं. असेलच तर फक्त काहींनाच ते शक्य असतं. अशा वेळी तो एक तर 'व्यवहार्य' उरत नाही किंवा तो सर्वांचा उरत नाही.

३) काळानुसार परिस्थिती आणि परिस्थितीनुसार व्यवहार बदलतो. अशा वेळी एखाद्या वेळी 'व्यवहार्य' असणारी गोष्ट दुसऱ्या वेळी, दुसऱ्या काळी 'अव्यवहार्य' ठरू शकते. असं असलं तरीही 'खरा व्यवहार्य विचार' हा सर्व प्रकारच्या परिस्थितीत आणि काळात अंमलात आणण्याजोगा असू शकतो. असा 'व्यवहार्य' विचार अधिक लक्षणीय, अनुकरणीय व आदरणीय होय, हे स्पष्ट आहे.

४) एखादी गोष्ट 'व्यवहार्य' करण्याच्या प्रयत्नात मूळ गाभ्याला, व्यवहारासाठी कराव्या लागणाऱ्या तडजोडींमुळं, धक्का लागण्याचा धोका असतो. अशा वेळी मूळ तत्त्व गायब होऊन त्याच्या निमित्तानं उभा केलेला व्यवहार तेवढा उरण्याची शक्यता असते. म्हणून मूळ तत्त्वाचा गाभा कायम ठेवून जो 'व्यवहार्यता' आणू शकेल तो मोठाच कुशल असला पाहिजे.

श्रीमहाराजांच्या परमार्थाच्या व्यवहार्यतेच्या संदर्भात नेमकं हेच जाणवतं की त्यांनी परमार्थ विचार तर शुद्ध ठेवलाच पण व्यवहार करणारा केवढाही, कोणत्याही भूमिकेवरचा, कसाही असला तरी त्याला तो अंमलात आणता येण्याजोगा कसा आहे हे दाखवून देऊन त्याची 'व्यवहार्यता' ही त्यांनी जपली. हे कौशल्य मोठं अलौकिक म्हणावं लागेल. म्हणूनच त्यांच्या उपदेशाला वा शिकवणुकीला 'व्यवहार्य परमार्थाची गंगोत्री' असं सार्थपणे पण विनयानं म्हणावंसं वाटतं.

## काही आगळी व्यावहारिक परमार्थ तत्त्वे

१) श्रीमहाराजांनी सांगितलेल्या परमार्थातलं एक महत्त्वाचं व या संदर्भात प्रधान वाटणारं तत्त्व असं की ते म्हणत माझा नियम असा आहे की, परमार्थाची एकही गोष्ट अशी असता कामा नये की जी व्यवहाराच्या आड येईल.

२) व्यवहाराच्या दृष्टीनं अनेकांना अनेक अनुकूलता नसतात. कुणाला पैशाची नड असते, कुणाकडं मनुष्यबळ कमी असतं, कुणाला जागापाण्याची अडचण असते, कुणाला तीक्ष्ण बुद्धीची उणीव असते, कुणी शारीरिक ताकतीत उणा पडतो, कुणाच्या घरची माणसं परमार्थाला अनुकूल नसतात अशा परिस्थितीत ज्याला हे सर्व असणं आवश्यक आहे असं एखादं साधन करायला सांगणं म्हणजे त्या त्या माणसाला नाउमेद करणं आणि वेगळ्या शब्दात त्याला परमार्थ साधणार नाही म्हणणंच होय. श्रींनी हा सारा 'उणीवांचा, अडचणीं' चा मामला पुरेपूर लक्षात घेतला आहे. ते म्हणत, परमार्थालाच मुळात दुसऱ्या कशाचीच (पैसा, माणूस, बुद्धी, शक्ती इ.) गरज नाही. मग असली एखादी गोष्ट

नसली तर आपलं कसं बिघडू शकेल ? या त्यांच्या नुसत्या विचारानंसुद्धा सामान्य साधकाला किती दिलासा मिळेल हे सांगायची गरज नाही.

३) परमार्थ हातून न घडण्यासाठी साधारणपणे पुढे केल्या जाणाऱ्या कारणात 'परिस्थितीची प्रतिकूलता' हे एक मोठं कारण असतं. श्रीमहाराजांचं याबद्दलचं म्हणणं सतत मनन करण्यासारखं आहे. ते म्हणाले, मला अशी परिस्थिती दाखवा ज्यात परमार्थ करणं अशक्य आहे. अभिप्राय स्पष्ट आहे.

श्रींनी उपदेश केलेल्या या परमार्थमार्गाचा व्यवहार त्यांनी आजन्म केला. इतरांना करण्यात मदत केली, स्थलाभावी थोडक्यात अशा काही प्रसंगांचाही आपण विचार केला तर त्यांच्या या 'व्यवहार्य परमार्था' वर अधिकच प्रकाश पडेल.

## परमार्थ-तत्त्वांचा व्यवहार

१) बाह्य अवडंबरांपासून सुटका : श्रीमहाराजांनी एकदा एकाला 'रामाचा प्रसाद' घेऊन जाण्याबद्दल सुचवलं. त्यावर तो नकार देऊन म्हणाला मी चातुर्मासात परान्न घेत नाही. श्रींच्या लक्षात वस्तुस्थिती आली. पण त्यांनी विचारलं, 'एरवी घरात जेवताना कोणत्या भावनेनं अन्न घेता ?' त्यावर आपण स्वतः कमवून खातो अशी भावना असल्याचं त्यानं सांगितलं. त्यावर श्रींनी सुचवलं, 'मी माझ्या कमाईचं खातो, त्यात भगवंताच्या कृपेचं काही नाही, ही भावना अपायकारक नाही का? वास्तविक ही भावना निर्माण करण्यासाठी हे नियम आहेत. ते असे नुसतेच अवडंबरासाठी पाळले तर मूळ तत्त्वालाच धक्का पोचेल. इतर अन्नाचा वासनेवरचा परिणाम टाळण्याचा उद्देश आहे. पण हे प्रसादाचं अन्न असल्यानं त्यात तोही धोका नाही. म्हणून नेमनियम समजून आचरणात आणले तर व्यवहार तर सांभाळला जातोच पण ते ज्यासाठी बनवले ती तत्त्वं अंमलात येऊन त्या नेमनियमांपासून खरा पारमार्थिक फायदा घडतो, आणि तिकडं दृष्टी असावी.

२) प्रतिकूल वाटणारी परिस्थितीही परमार्थाला अनुकूल बनवण्याची दृष्टी : एकदा गोंदवल्याला पुष्कळ मंडळी मुक्कामाला होती. रात्री खूप पाऊस होऊन कुणालाच कोरडी जागा झोपायला उरली नाही, इतकं पाणीच पाणी चहूकडं झालं. त्यावर श्रीमहाराजांनी सर्वांना सुचवलं, 'प्रत्येकानं दुसरा झोपला आहे का पाहिल्याशिवाय झोपू नये. तसंच एवीतेवी जागण्याची संधी आलीच आहे तर रात्रभर नामस्मरण व भजनाचा आनंद मनमुराद लुटावा. झोपायचं एरवी रोजचंच आहे. उलट आजच भगवंताची कृपा झाली म्हणून पाऊस येऊन हरिजागराची संधी आली आहे.' त्याच घटनेचं परिमाण बदललं आणि एक मोठं तत्त्व अंमलात कसं आणावं याचा वस्तुपाठ मिळाला.

३) प्रपंचापासूनसुद्धा परमार्थदृष्टी शिकण्याचा अभ्यास करावा : एका माणसाचं उदाहरण देऊन श्रीमहाराज म्हणतात, त्यानं मनापासून प्रामाणिकपणानं तीस वर्षं नोकरी केली. त्याचा त्याच्यावर विपरीत परिणाम न होता उलट त्याची तशी दृष्टी असल्यामुळं त्यानं त्यातूनही परमार्थासाठी उपयुक्त कला शिकली. भगवंताची भक्ती कशी करावी याचं मर्म तो त्या प्रदीर्घ नोकरीतून शिकला. वरिष्ठाच्या मर्जीनुसार काम, बदली, अलिप्तपणे व्यवहार सारं त्यातून कसं करावं हे कळलं. आता फक्त वरिष्ठाच्या जागी भगवंत ठेवल्याबरोबर परमार्थाची वाटचाल सुगम झाली.

४) परमार्थासाठीसुद्धा अधिकाधिक व्यवहार्य मार्ग : परमार्थासाठी गुरुची गरज अपरिहार्य आहेच. पण आजच्या फसवणुकीच्या युगात बुवाबाजांकडून फसण्याची शक्यताही खूपच आहे. अशा वेळी श्रीमहाराजांनी सांगताना स्पष्ट केलेला मार्ग व्यवहार न मोडता पुढे कसं जावं हे सुचवणारा आहे. आपल्या आवडत्या देवतेची तसबीर पुढं ठेवून तिचं नामस्मरण करीत असावं. आपल्याला नामानं निर्माण होणारी तळमळच गुरुला आपल्याकडे खेचून आणील. त्यातूनही कुणा देहधारी गुरुबद्दल कळलं तर ती व्यक्ती स्त्री वा पैसा यांच्या लोभापासून अलिप्त आहे का इ. कसून पाहावं. शिवाय त्याच्या सहवासातून आपल्या वृत्तीवर काही चांगला फरक पडतो का ते पाहावं. व्यवहाराविरुद्ध तो काही चमत्कारिक गोष्टी करीत नाही ना ते पाहावं इ. इ. या साऱ्यांतून गेल्यावर मग त्यावर गुरु म्हणून विश्वास टाकावा की नाही याचा निर्णय घ्यावा म्हणजे भोंदूंपासून सुटका होईल आणि सत्संगाला मुकल्यानं घडणारं अपरिमित नुकसानही टळेल.

५) कोणत्याही परिस्थितीत भक्ती कशी साधता येईल : अनेकांना आपल्या गुरुंच्या किंवा साधकांच्या सहवासाची मोठी ओढ असते. त्या सत्संगातून त्यांना लाभही घडत असतो हे खरंच. पण देहानं सहवास घडण्याला मर्यादा असतातच. अशा वेळी कारणपरत्वानं आपापल्या नोकरी-धंदा-प्रपंच या कारणानं दूर जावं लागलं, राहावं लागलं की अनेकांना अस्वस्थता येते, मानसिकदृष्ट्या नुकसान घडतं. अशा वेळी संयोगानं मिळवलेलं वियोगानं झाकळून जातं. याबद्दल श्रीमहाराजांनी रामकथेतलं मार्मिक उदाहरण दिलं आहे. त्यांनी सांगितलं की लक्ष्मण हा जसा रामभक्त तसा भरतही जाज्वल्य रामभक्त. एकानं सतत त्याच्या सहवासात राहून संयोगभक्तीनं त्याला आपलासा करून घेतला तसा दुसऱ्यानं दूर व रामाज्ञेनं प्राप्त कर्तव्यात राहून वियोगभक्तीनं त्याला आपलासा करून घेतला. तसं जेव्हा उत्सवादी निमित्तानं आपल्याला संयोगभक्तीनं साधता येते तेव्हा तसं साधावं पण व्यवहारानं - प्रपंचामुळं दूर राहावं लागेल तेव्हा तेच वियोगभक्तीनं साधण्याची दृष्टी ठेवली तर यातली कुठलीही अवस्था भक्तिमयच होऊ शकेल.

६) नामस्मरणाला वेळ कसा काढता येईल : एक व्यापारी श्रीमहाराजांकडं आले. व्यापाराचा त्यांचा व्याप इतका मोठा होता की, नामाला वेळ काढणं त्यांना कसं खरोखरच मुश्किल होतं हे त्यांनी पटवून दिलं. श्रींनी ते शांतपणे ऐकून घेऊन मान्य केलं व म्हणाले, 'ते ठीक आहे. पण मी तुम्हाला तुमच्या या खूप व्यग्र व्यवहारातला वेळ दाखवला-सुचवला तर तुम्ही त्या वेळात नामस्मरण कराल काय.' ते मोठ्या आश्चर्यानं व उत्सुकतेनं 'हो' म्हणाले. त्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'आपण रोज सकाळी आंघोळ करता ना ?' ते म्हणाले, 'हो!' 'त्या वेळी तरी आपण इतर काही काम करीत नसाल ?' त्यावर ते म्हणाले 'नाही' तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'मग आंघोळीचा पहिला तांब्या घेतल्यापासून

शेवटचा तांब्या घेईपर्यंत तरी नाम घ्यायला वेळ मोकळा आहे, कुणाची आडकाठी नाही !'

अशा तऱ्हेनं असंख्य मार्गांनी असंख्य माणसांना हा परमार्थ कसा आचरणात आणता येईल याचा उहापोह करण्यात श्रीमहाराजांनी आजन्म प्रयत्न केले. ज्या 'नामसाधने' चा त्यांनी 'स्वतःचा प्राण' म्हणून आग्रह धरला ती साधनासुद्धा सामान्य माणसांसाठी परमार्थाची व्यवहार्यता सिद्ध करणारी साधना म्हणून महत्त्वाची आहे, हे वेगळे सांगण्याची गरज नाही.

त्यांनी तसा मुळात 'सूक्ष्म' असलेला परमार्थ व्यवहारात आणण्यासाठी केलेला तळमळीचा खटाटोप पाहिला आणि आपल्यासारख्या सामान्य माणसांना अखंड समाधान रूप परमेश्वर सुगम व्हावा म्हणून केलेला कळकळीचा उपदेश पाहिला की मन त्यांच्याविषयीच्या कृतज्ञतेनं भरून येतं आणि त्यांना परमप्रिय असलेल्या नामाचे मणी मन नकळत ओढू लागतं.

॥ श्रीराम ॥

डॉ. सुहास पेठे,
८, शिवनेरी अपार्टमेंट, १० भवानी पेठ,
सातारा - ४१५ ००२.



# सद्‌गुरु श्रीब्रह्मचैतन्य महाराज पादुकास्तवन

जया मंदिरी, पादुका सद्‌गुरुच्या
तिथे वास श्री, ब्रह्मचैतन्य यांचा
गृही वर्षते, वैभवारोग्य शांती
नमस्कार त्या ब्रह्मचैतन्य मूर्ती ॥

मनी पूजणे, पादुका सद्‌गुरुच्या
घडे योग हा, श्री गुरु दर्शनाचा
मनोकामना, होय साफल्य मूर्ती
नमस्कार त्या, ब्रह्मचैतन्य मूर्ती ॥

अशा पादुका, रूप साचे सगुण
तिथे शोभते, ब्रह्म जैसे निर्गुण
तया सेविता, होय अध्यात्म स्फूर्ती
नमस्कार त्या, ब्रह्मचैतन्य मूर्ती ॥

मनी चिंतिता, मंत्र हा राघवाचा
घडे संग श्री, सद्‌गुरु पादुकांचा
अनिर्वाच्य जी, ब्रह्मचैतन्य शक्ती
नमस्कार त्या ब्रह्मचैतन्य मूर्ती ॥

मनी मानसी, पादुका या वसू दे
तयावीण काही, मना नावडू दे
जगी गर्जु दे, ही तुझी नाम कीर्ती
नमस्कार त्या ब्रह्मचैतन्य मूर्ती ॥

**श्री. जी. जी. कुलकर्णी**

# ब्रह्मचैतन्य योग

**डॉ. माधव नगरकर**

*एम. एससी., मायकॉलॉजीत पीएच. डी. आघारकर रिसर्च इन्स्टिट्यूट शास्त्र संशोधक पदावरून निवृत्त. १९८७ त वॉशिंग्टनच्या स्मिथसोनियन इन्स्टिट्यूटची फेलोशिप, लंडन येथील नॅचरल हिस्ट्री म्युझियम, जर्मनीतील म्युनिक बोटॅनिकल गार्डन येथे संशोधन अभ्यास. संशोधन देश व परदेशातील जर्नल्समध्ये प्रसिद्ध. पू. स्वामी माधवनाथांचे शिष्यत्व १९७४. ज्ञानेश्वरी, दासबोध, योगसूत्र या ग्रंथांचा अभ्यास व प्रवचन. स्वामी माधवानंद असे नामकरण, ध्यानधारणा समाधी-अंतरंग समजावणे, निरनिराळ्या ठिकाणी ध्यानकेंद्रे*

'वेद, उपनिषदे, भगवद् गीता यांनी निर्गुण परमात्म्याचे रेखाचित्र निर्माण केले. संतांनी त्यात आपल्या आवडीचा रंग भरला, ही सगुण भक्ती होय.' असे सगुण आणि निर्गुणाचे सुंदर प्रतिपादन करणारे प. पू. श्रीगोंदवलेकर महाराज अध्यात्म सागरातील दीपस्तंभच होत. आपल्या जीवनातले काव्य गद्य वाङ्मयातून विलक्षण प्रतिभेने सादर करणारे श्रीमहाराज हे युगपुरुषच होऊन राहिले आहेत. 'सगुणाचेनि आधारे । निर्गुण पाविजे निर्धारे । सारासार विचारे । संतसंगे ।' असे समर्थांनी सांगितले आहे. निर्गुणासाठी सगुणाचा आधार कसा याचे प्रतिपादन करताना श्रीमहाराज म्हणतात की इमारत बांधायची असली की, तिचा आराखडा (प्लॅन) कागदावर काढतात. पण आराखडा म्हणजे प्रत्यक्ष इमारत नाही असे जरी असले तरी आराखड्यामुळेच इमारत बांधणे सोपे जाते. हा आराखडा म्हणजे सगुण भक्ती होय. आता हा आराखडा व प्रत्यक्ष इमारत बांधणे यामधील अंतर कसं साधलं जाईल ? तर श्रीमहाराज म्हणतात, 'नाम हा सगुण व निर्गुण यांना जोडणारा दुवा आहे.' भक्त म्हणजे विभक्त नव्हे । विभक्त म्हणजे भक्त नव्हे । विचारेविण काहीच नव्हे । समाधान ।।'

'तस्मात विचार करावा । देव कोण तो ओळखावा ।
आपला आपण शोध घ्यावा । अंतर्यामी ।।

भक्ती म्हणजे ईश्वराशी एकरूपतेची अनुभूती. ती अनुभूती घेण्याचा मार्ग म्हणजे भक्तिमार्ग. म्हणजे नक्की काय ?

'सदा स्वरूपानुसंधान हेचि भक्ति हेचि ज्ञान ।
तेणे तुटोनि कर्मबंधन शाश्वत समाधान प्राप्त होय ।'

स्वरूपानुसंधान म्हणजे आपल्या चैतन्य स्वरूपाचा आंतरिक वेध घेणे. तो नाममंत्राच्या सहाय्याने घेणे हा सर्वात सोयिस्कर असा मार्ग आहे. शांतपणे निवांत जागी डोळे मिटून बसून, भ्रूमध्यापाशी लक्ष केंद्रित करून नाममंत्राचे आलंबन घेत राहिल्याने मनावरील इतर वृत्ती हळूहळू कमी होऊन शेवटी नाममंत्राशिवाय दुसरी वृत्ती नाही अशी अवस्था प्राप्त होते. ईश्वराच्या अस्तित्त्वाची शुद्ध, जाणीव शरीर संसारापासून विलग होते. शांत स्थितीत आपल्या चैतन्य स्वरूपाचा, आत्मस्वरूपाचा प्रत्यय येतो. अशा रीतीने नाममंत्राने चित्त केवळ ईश्वरीय अस्तित्वाच्या जाणीवेच्या स्वरूपात रहाते आणि अखेर ही जाणीवही चैतन्यात विलीन होते. सगुण मूर्ती, सगुण शरीर यांच्या आधाराने उपासना करीत करीत नामाच्या साहाय्याने चित्त निर्वृत्तिक होऊन आत्मस्वरूपाचा प्रत्यय घेणं म्हणजेच सगुण आणि निर्गुण यांना जोडणं होय. हा जोडणारा दुवा श्रीमहाराज म्हणतात त्याप्रमाणे नाममंत्राचे आलंबन हाच आहे.

संसारी माणसांसाठी निश्चितपणाने परमेश्वर प्राप्त करून घेण्यास सोपा असा हा अष्टांगयोगाचा मार्ग आहे. श्रीगोंदवलेकर महाराजांनी आपल्या विशेष सुंदर शैलीमध्ये, नामप्रक्रिया, नामाचे महत्त्व, त्याचे जीवनावर होणारे परिणाम, त्या उपासनेची अनुभूती आणि त्यासाठी पाळायची पथ्ये हे सर्व सांगितले आहे. हे सांगत असताना, मुद्दाम नाही तरी विवेचनाच्या ओघात सहजासहजी योगाच्या विविध अंगांचे स्पष्टीकरण केले गेलेले आहे. श्रीमहाराजांच्या वाङ्मयात एक विलक्षण भरीवता जाणवते. त्याचे कारण त्याला त्यांच्या भक्तीभावनेचा आणि योगसाधनेचा आधार आहे.

'शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ।' या भगवद्गीतेच्या वचनानुसार योगाची परिपूर्णता जीवनात लवकर अनुभवून ती जगाला प्रदान करण्यासाठी श्रीमहाराजांसारखे माहात्मे पावित्र्य आणि संपन्नता असलेल्या कुळामध्ये जन्म घेतात. त्याहीपेक्षा अधिक भाग्याचे म्हणजे त्या कुळामध्ये अध्यात्माची परंपरा असणे आणि त्याहीपेक्षा दुर्लभ म्हणजे अशा आध्यात्मिक व्यक्तींच्या छायेमध्ये बालपण जाणे आणि बालपणापासूनच अध्यात्मयोगाला अनुकूल वातावरण असणे हे सर्व भाग्य श्रीमहाराजांना लाभलेच होते. भगवद्भक्त अशा आजोबांच्या मार्गदर्शनाखाली त्यांची जीवनकलिका उमलली होती. त्यांचं देवाबद्दलचं विशेष प्रेम अगदी लहानपणापासून आश्चर्यकारक रीतीने त्यांच्या कृतीतून प्रकट होत असे. आजोबा भगवद्गीता म्हणू लागले की, श्रीमहाराज चौथ्या वर्षापासूनच ती म्हणू लागले. ते जप करू लागले की, श्रीमहाराज डोळे मिटून शांत बसत असत. पाचव्या वर्षापासून हे मूल रात्रीचे भजन झाल्याशिवाय व त्यात आजोबांबरोबर नाचल्याशिवाय कधीही झोपत नसे. त्यांच्या वयाच्या सहाव्या वर्षी एकदा रात्री १-१।। वाजता श्रीमहाराज घरात नाहीत हे पाहून घरातल्या मंडळींनी खूप शोधाशोध केली. शेवटी ते नदीकाठी स्मशानाच्या शेजारच्या गुहेत ध्यानमग्न अवस्थेत सापडले. श्वापदांची अथवा भुता-खेतांची या लहान मुलाला किंचितही भीती वाटत नसे. यानंतर कित्येकदा 'नदीकाठी एकांत असतो आणि तेथील शांत वातावरण साधनेसाठी योग्य असते' म्हणून ते एकटेच तिकडे जात असत. त्यांची मुंज झाल्यानंतर सर्व ब्रह्मकर्म अत्यंत वेगाने त्यांनी

आकलन करून घेतले होते. संध्या, गायत्रीवर त्यांचे विलक्षण प्रेम होते. ते एकपाठी होते. वयाच्या चौथ्या वर्षी 'अनन्याश्चिन्तयन्तो माम्...' हा श्लोक त्यांनी आजोबांच्या म्हणण्या पाठोपाठ पहिल्यांदाच ऐकल्या ऐकल्या म्हटला होता. तेव्हाच हे लक्षात आले होते. अध्यात्मातील सूक्ष्म गोष्टींचे आकलन त्यांना ताबडतोब होत असे. त्याबाबतीतील त्यांच्या संवेदना अतिशय तीव्र होत्या. त्यामुळेच एका वृद्ध रामदासी गृहस्थाच्या, 'गुरुशिवाय ज्ञान होत नाही' या कळवळून काढलेल्या उद्‌गारांचा परिणाम होऊन त्यांनी गुरु शोधण्यासाठी प्रचंड प्रयत्न केले. भ्रमण केले. ते करत असतानादेखील त्यांची योगसाधना चालूच होती व त्यासाठी योग्य असे मार्गदर्शन त्यांना ईश्वरी योजनेनुसार मिळत गेले.

घरी असतानादेखील एकादशीच्या पूजेनंतर ते जेव्हा ध्यानाला बसत तेव्हा तासन् तास निघून जात. शेवटी त्यांच्या आईला त्यांना हालवून जागे करावे लागे. प्रत्यक्ष गुरुंची प्राप्ती होण्याअगोदर श्रीमहाराजांची योगभूमिका बरीचशी तयार झालेली होती. योगायोगाने त्यांना जे गुरु भेटले ते आदिनाथ, मच्छिंद्रनाथ, गोरक्षनाथ, मुक्तावटेश्वर, चक्रपाणी, विमला चांगदेव ह्यापासून पुढे अनेक योगसिद्धांच्या माध्यमातून परंपरेने चालत आलेला आणि महाराजांच्या काळात विठ्ठल किंकर, चिन्मयानंद आणि श्रीमहाराजांचे गुरु श्रीतुकाराम चैतन्य यांच्यापर्यंत ओघाने आलेल्या योगिक परंपरेतील सिद्धपुरुष होते. श्रीतुकाराम चैतन्यांकडून त्यांना समंत्रक योगदीक्षा प्राप्त झाली होती. या नाथ संप्रदायातील योगमार्गामध्ये ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे 'पिंडाचेनि मिसे । पदी पदप्रवेशे ।' या रीतीने शरीराच्या आधाराने आत्मचैतन्य आणि ब्रह्मचैतन्य हे एकरूप आहे अशी अनुभूती घेतलेल्या आपल्या या लाडक्या शिष्याचे तुकारामचैतन्यांनी 'ब्रह्मचैतन्य' असे नाव ठेविले. योगिक परिपूर्णतेसहित रामदासी दीक्षा, 'श्रीराम जयराम जयजयराम' हा मंत्र आणि अनुग्रह देण्याचे अधिकार रामनवमीच्या दिवशी प्रदान केले. योग प्राप्त झाला तरी तो स्थिर होण्यासाठी एकांतात साधना करावी लागते. त्यासाठी योगारुढालादेखील ती अवस्था स्थिर करून घेणं आवश्यक असते.

'योगारुढस्य तस्यैव शम कारणमुच्यते ।' गीतेचा हा श्लोकार्थ याचेच प्रतिपादन करतो. त्यानुसार पुढे महाराज लगेच प्रगट झाले नाहीत किंवा त्यांनी कार्य सुरू केले नाही तर त्यांनी गुरुआज्ञेनुसार आत्मज्ञान जिरवण्यासाठी उज्जैनजवळील एका मोठ्या अरण्यात कित्येक दिवस आत्मचिंतन केले. त्यानंतर, गुरुशोधार्थाच्या काळामध्ये भ्रमण करीत असताना नैमिषारण्यामधल्या ज्या गुहेत त्यांनी योगसाधना केली होती त्याच गुहेत इतर सहा योग्यांच्या बरोबर दोन वर्षे ते साधना करीत राहिले. या सहा योग्यांमधील एक योगी महाराष्ट्रातील अध्यात्मप्रेमी व्यक्तींना माहीत असलेले व सर्वांना आदराचे स्थान असलेले आळंदीचे श्रीनृसिंहसरस्वती महाराज होते. योगसाधना पूर्ण करून अनेक सिद्धी, त्यांना न वापरता जवळ बाळगून, महाराज अगदी साध्या सामान्य साधक व्यक्तीसारखे बाह्यतः रहात असत. आपले अलौकिकत्व झाकून ठेवत असत. हेच त्यांचे मोठेपण होते. प्रत्यक्ष कार्य सुरू करण्यापूर्वी योगाची परिपूर्ण अवस्था भोगून अंतर्यामी पूर्ण शांत होऊन मगच एखाद्या भक्तीच्या आचार्याप्रमाणे त्यांनी समाजात कार्य करण्यास सुरवात केली. 'योग' असे म्हटल्यावर लोकांना नेहमी दाढी-जटा वाढविलेले, संसारापासून फारकत घेतलेले कुठेतरी गिरीकंदरी गुहेत राहणारे योगी समाजाच्या डोळ्यांसमोर येतात. त्यांच्या शरीराला आत्यंतिक ताण देण्याच्या अनेक चमत्कारिक कथा, त्यांची ती विभिन्न, विस्मयकारी दर्शनांची वर्णने यामुळे ईश्वरप्राप्तीची खरी इच्छा असली तरी संसारी साधक असल्या योग्याला बिचकूनच असतो. हा मार्ग आपल्यासाठी नाही असे त्याला वाटते. या सगळ्या गोंधळामध्ये भगवद्‌गीतेत सांगितलेला मध्यवर्ती ध्यानयोगाचा मार्ग जणू काही पूर्वापार लुप्तच होऊन गेला आहे. लोकांची भक्तीभावना, ईश्वराकडे जाण्याची नैसर्गिक ओढ लक्षात घेऊन, त्यांचा हात धरून त्यांना हळूहळू नामसाधनेच्या माध्यमातून ईश्वरप्राप्तीचा मार्ग श्रीमहाराजांनी मोठ्या कौशल्याने त्यांच्यामध्ये प्रसृत केला. योगशास्त्र आणि श्रीमहाराजांचे वाङ्‌मय हे तौलनिक दृष्टीने पाहिले असता एका सुंदर रीतीने सोपेपणाने हा योगमार्ग त्यात आला आहे असे दिसते.

यम - नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही योगाची आठ अंगे आहेत. त्यात यम-नियम हे व्यवहारात वागताना योगाला अनुकूल अशी जीवनपद्धती या स्वरूपात आहेत. बाह्य जीवन, आचरण, नीती आणि सत्याला धरून असणे, कुणाला न दुखवणे, शुचित्वाने राहणे आणि त्याचप्रमाणे तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान यांच्यासह राहणे हेच यम-नियमामध्ये सांगितलेले आहेत. हा जीवनाच्या आचरणाचा मार्ग महाराजांच्या वाङ्‌मयात प्रगट झालेला आहे. 'सदाचरण, नीतीमत्ता हा परमार्थाचा पाया आहे. पाया म्हणजे संपूर्ण इमारत नव्हे. पण पायाशिवाय इमारत नव्हेच नव्हे.' हे महाराजांच्या प्रतिपादनातून सुंदर रीतीने प्रगट होते. कित्येक व्यक्ती खूप चांगले जीवन जगत असतात. पण नीतीमत्तेवर आधारीत जीवन ईश्वरप्रणिधानाशिवाय असणं म्हणजे सुवासिनीने सौभाग्यतिलकाशिवाय वावरणं होय. एकांतात नाम घ्यावंच घ्यावं, पण प्रत्येक व्यवहारात ते नाम गुंफावं हेच व्यवहारातले ईश्वरप्रणिधान होय. पुढे नाम सहज आणि सतत राहते. जसे रक्त विनासायास शरीरभर अभिसरण पावते तसा अजपाजप चालतो 'संत अजपाजपात असतात' असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे.

योगामध्ये आसनाचे वर्णन 'स्थिरसुखमासनम्' असे केलेले आहे. ते अमूक पद्धतीने घालावे असे सांगितलेले नाही. श्रीमहाराजांनी याबद्दल एका व्यक्तीला सांगितले की, पद्मासन घालून नासिकाग्री दृष्टी ठेऊन नाम घेण्याचा आग्रह धरू नये. त्यामुळे लक्ष उगीचच शरीराकडे जाते. आसन कसे असावे तर नाम अखंड कसे चालेल हे ध्येय ठेवून त्याला अनुकूल अशी व व्यत्यय येणार नाही, अशी कोणतीही बैठक ठेवावी. हे श्रीमहाराजांचे शब्द 'स्थिरसुखकर' आसनाचा मुख्य उद्देश म्हणजे अनुसंधान चालावे हे सांगणारे आहे. अष्टांगयोगामध्ये प्राणायामाचा उपयोग सुरवातीची मनाची चंचलता कमी करण्यासाठी केला जातो.

अष्टांगयोगाची साधना ही हठयोगासारखी प्राणायामाला विशेष महत्त्व देत नाही. श्रीमहाराजांनीही त्यानुसारच कायम अनुसंधानावर भर दिला. प्राणायामावर दिला नाही.

ध्यान सुरू करत असताना आस्थेने म्हणजे श्रद्धेने रूपासहित साधना सुरू करावी म्हणजे त्याने अंतःकरणाची शुद्धी होते. रूप समोर आणावं पण धरून ठेवू नये. नामच धरून ठेवावं. मन स्थिर होण्यासाठी सुंदर, पवित्र असं दृश्य डोळ्यांसमोर आणावं. ते भगवंताचं किंवा आपल्या गुरुंचं रूप असेल. त्याची आपल्याला आवडपण असते. या आवडीत राहून आपण नाम घ्यावे हे श्रीमहाराजांचे सांगणे 'विषयवती वा प्रवृत्तिरूत्पन्ना । मनसः स्थितिनिबन्धनि ।' या योगसूत्राला अत्यंत सुसंगत असेच आहे. केवळ स्थूल साधनांचा परमार्थ करत राहणे हे श्रीमहाराजांना अभिप्रेत नव्हते.

एकजण श्रीमहाराजांना असे म्हणाला की, 'मी स्नान झाल्यावर रोज दोन स्तोत्रे म्हणतो. मग आणखी नाम कशाला हवे ?' त्याला श्रीमहाराजांनी सांगितले 'स्तोत्र म्हणणे हे पत्राने भगवंताची भेट घेण्यासारखे आहे. नाम घेणे हे भगवंताला प्रत्यक्ष भेटण्यासारखे आहे. म्हणून नाम हवेच.' परमेश्वराकडे पर्यायाने न जाता, आलंबनाने प्रत्यक्ष अनुभूतीचा मार्ग श्रीमहाराजांनी मोठा आवर्जून सांगितला आहे. साधनेच्या बाबतीत अनादराने बोललेलं श्रीमहाराजांना अजिबात आवडत नसे. कारवारचे एक गृहस्थ त्यांना भेटायला आले आणि म्हणाले, 'मी रिकाम्या वेळात नामस्मरण करतो.' त्यावर ते म्हणाले, 'साऱ्या जन्मात महत्त्वाचा आणि सार्थकी लागलेला वेळ असेल तो हाच. असे असताना त्याला तुम्ही रिकामा वेळ कसा म्हणता ?'

श्रीमहाराजांना संकल्पशक्तीने समाधी लावून देणे शक्य होते. परंतु त्यासाठी शिष्य तयारीचा असणे आवश्यक असते. डॉ. कूर्तकोटिंना याची अनुभूती देताना त्यांनी कूर्तकोटींच्या डोक्यावर नुसता हात ठेवला. त्याबरोबर ते देहभान विसरले. दहा मिनिटांनी देहभानावर आले तेव्हा श्रीमहाराजांनी विचारले, 'काय वाटले ?' ते म्हणाले, 'मी अतिशय आनंदात होतो.' यावर श्रीमहाराज म्हणाले, 'ही अवस्था येणे कठीण नाही. पण ती टिकविणे फार कठीण असते. त्यासाठी दीर्घकाळ सतत प्रयत्न करणे आवश्यक आहे.' या प्रयत्नालाच अभ्यासयोग म्हणतात.

भगवंताची 'आठवण' कशी ठेवावी असे विचारता श्रीमहाराज म्हणाले, 'भगवंत स्वतः आठवा होता. त्याने भ. गीतेच्या 'आठव्या' अध्यायात 'आठव्या' श्लोकात त्याला कसे 'आठवावे' ते सांगितले आहे.

'अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥'

हे पार्था ! चित्ताला दुसरीकडे जाऊ न देता त्याला अभ्यासाच्या योगाने स्थिर करून दिव्य परमपुरुषाचे ध्यान करणारा साधक त्या परमपुरुषाप्रत जाऊन पोचतो.

हे आपण लक्षात ठेवावे. हा सरळ सरळ ध्यानयोगाचा मार्ग आहे. हेच तुकाराममहाराजांनी 'ठायीच बैसोनि करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ।' या शब्दांत मांडले आहे.

शांत बसण्यासाठी नामाचे आलंबन हा मार्ग आहे म्हणजे डोळे मिटून शांतपणे नाम घेत राहणे. हा आत्मस्वरूपाची प्राप्ती करून घेण्याचा मार्ग आहे. श्रीमहाराजांनी म्हटले आहे की 'पंढरपूरला जाण्यास अनेक मार्ग असले तरी सर्वांना शेवटी 'बारीतून'च जाऊन दर्शन घ्यावे लागते. त्याप्रमाणे इतर साधने केली तरी नामसाधन केल्यावरच आत्मस्वरूपाची प्राप्ती होते.'

'ओंकाराला शब्दब्रह्म म्हणतात. त्याचे स्फुरण ही परावाणी असून संतांचे ते नाम होय.' हे सांगताना श्रीमहाराजांनी असे सूचित केले आहे की, सर्व नामे ॐकारातूनच निर्माण झालेली आहेत. त्यामुळे ॐकाराचे स्मरण अगर कोणत्याही नामाचे स्मरण करणे यातून परमात्म स्वरूपाची प्राप्ती होते. आपले स्वरूप म्हणजेच ईश्वरस्वरूप, स्वतःबद्दल बोलताना श्रीमहाराज एकदा म्हणाले होते, 'ॐकार, ॐकार म्हणतात तो मीच आहे. जो नामामध्ये स्वतःला विसरेल तोच मला समजू शकेल.' पण ही अनुभूती येण्यासाठी अत्यंत एकाग्रतेने नाम घेणे आवश्यक आहे. वेगवेगळ्या ठिकाणी श्रीमहाराजांनी याचेवरील उपाय सुचविलेले आहेत. ही एकाग्रता साध्य होण्यासाठी संसारातील इतर विचार जायला हवेत. विचार आले तरी त्यांना फाटे फोडून वाढवू नयेत. विचार येतील आणि जातील. त्यांच्याकडे लक्ष देऊ नये. आपण रस्त्याने चाललो असता नको ती माणसे रस्त्यावरून चालायचीच तसे विकल्प आले तरी आपण आपले नाम सोडू नये.

विषय कसे सुटतील आणि मन एकाग्र कसे होईल ? यावर श्रीमहाराज नेहमी म्हणत की, 'तुम्ही सोडण्याच्या गोष्टींवर जास्त लक्ष न देता धरण्याच्या गोष्टींवर द्यावे म्हणजेच नाम पक्के धरावे. त्याने नको त्या गोष्टी सुटून एकाग्रता येईल.'

असे नाम घेता घेता, एकांत अवस्था प्राप्त होते. म्हणजे श्रीमहाराजांच्या भाषेत, 'नाम घेणारा मी ह्या एकाचाही अंत होणे म्हणजेच देहबुद्धीचा विसर पडणे, तिच्यापलीकडे जाणे असे होता होता बाहेरील सर्व विचार निघून जाऊन निर्वृत्तिक अवस्थेमध्ये आत्मदर्शन होते.

एका साधकाला श्रीमहाराजांच्या संकल्प शक्तीने अयोध्येला असताना मारुतीचे भव्य दर्शन झाले पण ते त्यांना सहन झाले नाही व ते रूप जाऊन श्रीमहाराजांचे सौम्य रूप दिसू लागले. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'शास्त्रीबुवा, हे बाहेरचे दर्शन कामाला येत नाही. अखेर खरे दर्शन आतच होत असते.' स्वस्वरूपाचे दर्शन हेच 'खरे दर्शन' हा श्रीमहाराजांच्या सांगण्याचा मतितार्थ होय. श्रीमहाराज म्हणत, ' 'मी' 'तो' आहे (म्हणजेच सोऽ हं) या अनुभूतीला येण्यासाठी प्रथम मी त्याचा आहे अशी भावनात्मक जाणीव धरून साधना करता करता 'मी तोच आहे' या अवस्थेला येणे म्हणजेच स्मरण होय. या स्मरणाला भगवंताचे नाम हे उत्तम साधन आहे. हा सगळा अनुभूतीचा मार्ग श्रीमहाराजांनी वारंवार प्रगट केला असून त्या अनुभूतीवर लक्ष न देता केवळ साधनेच्या प्रक्रियेलाच महत्त्व देणं म्हणजे गच्चीवर चढण्यासाठी

शिडी लावली असताना चढण्यासाठी प्रयत्न न करता नुसतंच शिडीला घट्ट धरून ठेवण्यासारखं आहे. कल्पनेतील देवाच्या पाठी न लागता आत्मस्फुरणाशी नाम संलग्न करून आत्मस्वरूपाचा प्रत्यय घेण्याचा हा मार्ग आहे. शेवटी याच मार्गातून जायचे आहे तर पहिल्यापासूनच या मार्गाचा अवलंब का करू नये ? पण माणसाला सूक्ष्मात शिरावे असे वाटत नाही हेच खरे.

परदेशाहून आलेल्या एका मुलाने मी तीन, चार आश्चर्ये पाहिली असे सांगितले. त्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'अरे ही आश्चर्ये पाहण्यासाठी तुला परदेशी जावे लागले. मी येथेच तीन आश्चर्ये पाहिली. प्रत्येकाचा 'मी' त्याचा सर्वात परिचयाचा आहे. जन्मभर त्याच्याबरोबर राहतो. पण त्या 'मी' चे स्वरूप कळत नाही हे पहिले आश्चर्य. प्रत्येकजण जीवनाचे सारे व्यवहार मनाच्या द्वारा करतो. सुख काय आणि दुःख काय, माणूस मनाने भोगतो. असे असून ते मन कोणाच्या ताब्यात नाही हे दुसरे आश्चर्य आणि प्रपंचात सुख नाही अशी सर्वजण तक्रार क्षणोक्षणी करतात. पण तो सोडायला तयार नाही, हे तिसरे आश्चर्य. तो सोडण्याचीही आवश्यकता नाही. पण तो बाजूला ठेवता आला पाहिजे. ईश्वराशी असलेली एकरूपता स्थिर बसून, स्वतःचा विसर पडून अनुभवता आली पाहिजे. श्रीमहाराजांची कोणतीही प्रतिमा घ्या, त्यात प्रकर्षाने काय जाणवत असेल तर यौगिक आसन आणि मुद्रा त्यात स्पष्ट असते. ईश्वरप्राप्तीचा योग या साधनेद्वारे आपल्या जीवनात यावा यासाठी अतिशय सरळ व स्पष्ट अशा अष्टांग योगाचा मार्ग आहे. स्वरूपाचे दर्शन हे त्याचे उद्दिष्ट आहे आणि नाम हे त्याचे आलंबन आहे.

देह ठेवण्याअगोदर चार, साडेचार तासपर्यंत श्रीमहाराज भजन, निरूपण, करीत होते. 'मुखे रामनाम बोला' यापासून सुरवात करून 'आत्मसुखामाजि डोला' या अनुभूतीपर्यंत यायला श्रीमहाराजांनी त्यांना त्या रात्री स्फुरलेल्या अखेरच्या भजनात म्हटले आहे. देह ठेवण्यापूर्वी तास-दीड तास ते समाधीत होते. 'जेथे नाम तेथे माझे प्राण । ही सांभाळावी खूण ।।' हे त्यांचे अखेरचे वचन होते. नाम घेता घेता मनाचा लय होऊन चैतन्याची अनुभूती आपण घेतली तर ब्रह्मचैतन्यांच्या सांगण्याचे सार्थक झाले असे म्हणता येईल ! हा 'ब्रह्मचैतन्य योग' आपल्या जीवनात यावा ही श्रीमहाराजांच्या चरणी प्रार्थना.

। श्रीराम ।

डॉ. माधव नगरकर,
८८५/३, भांडारकर इन्स्टिट्यूट रोड,
लेन क्र. ६, पुणे ४.

# समकालीन संत व श्रीगोंदवलेकर महाराजांचे कार्य

**सौ. आशाताई परांजपे**

*एम. ए. एल. एल. बी., चिन्मयमिशन हाँगकाँग येथे ६-७ वर्षे मिशनचे काम केले. पूजा मासिकात गेले ६-७ वर्षे नियमित लेखन. भक्तिमहिमा हे इंग्रजी गोष्टीरूप पुस्तक लहान मुलांसाठी प्रसिद्ध. सध्या नामदेव अध्यासनात श्री. गोंदवलेकर महाराज यांचेवर संशोधनपर लेखन सुरू आहे.*

संत हा शब्द सामान्यपणाने आध्यात्मिक क्षेत्रात अलौकिक कार्य करणाऱ्या व्यक्तीस वापरला जातो. संत म्हणजे परमात्म्याशी किंवा ब्रह्मरूपाशी एकरूप झालेली व्यक्ती असे म्हटले तर योग्य होईल. अशा संतांना ब्रह्मज्ञानी, भगवान, परमहंस या उपाधींनीही ओळखले जाते. डॉ. वा. रा. अंतरकर यांनी 'संत कोणास म्हणावे ?' या पुस्तकात संत, साधु व सत्पुरुष यातील भेद उत्तम प्रकाराने सांगितले आहे. ते म्हणतात-

'साधूने समाधान साधलेले असते. पण तो सविकल्प समाधीत स्थिर झालेला नसतो. जो तुर्येत जाऊन स्थिर होतो व अखंड नाम साधतो तो सत्पुरुष तुर्येच्या पलीकडे जाऊन तो ईश्वराशी संपूर्ण तादात्म्य पावतो व ज्याचा अजापजप स्थिर झालेला असतो व जो तुर्यातीत अवस्थेत सहजपणाने राहतो तो संत होय. यातील काही संत अवतारी असतात व काही साधनेमुळे संतपदाला पोचतात.' [१]

संतांचा व समाजाचा अत्यंत जवळचा संबंध असतो. काही मोजकेच संत समाजापासून दूर राहिले असे दिसते. लोकसंग्रह हा त्यांचा एक अविभाज्य भाग असतो. सामान्यजनांच्या उद्धारासाठीच त्यांचा अवतार असतो. त्यांचे मागणे हे विश्वाच्या कल्याणासाठीच असते. हे माऊलीच्या, तुकारामांच्या, समर्थांच्या किंवा अन्य संतांच्या मागणीवरून दिसते. संतांना विश्वधर्म वाढवायचा असतो. प्राणीमात्राबरोबर स्नेह निर्माण करावयाचा असतो व त्याच वेळी त्यांच्या सांनिध्यात येणाऱ्या लोकांना मार्गदर्शन करून त्यांची व्यक्तिगत प्रगती करावयाची असते. जेव्हा संतांच्या सांनिध्यात आलेल्या मंडळींचे आयुष्य न कळत बदलते, लोकांची व्यसने सुटतात, अनेक संसार सुधारतात तेव्हा लोक त्याला चमत्कार म्हणतात. पण संत याला चमत्कार मानीत नाहीत. किंबहुना ज्याला हा चमत्कार वाटतो तो संतच नव्हे. संतांच्याकडे असलेल्या अतीन्द्रिय शक्तीचा आविष्कार म्हणजे चमत्कार होय.

संतांच्या ह्या वर्णनावरून संतांचे कार्य केवळ आध्यात्मिक व लोकोद्धारासाठीच असते हे स्पष्ट होते. बाह्यागांने जरी ते वेगवेगळ्या धर्मांचे, पंथाचे दिसत असले तरी अंतर्यामी ते एकच असतात. म्हणून समर्थ म्हणतात -

साधु दिसती वेगळाले । परि ते स्वरूपी मिळाले ।
अवघे मिळोनी एकची झाले । देहातीत वस्तू ।।

संतांचे अंतरंग एकच असले तरी बाह्य रूपाने त्यांचे कार्य वेगळे असू शकते. कोणी कुठल्या क्षेत्रात, कशा प्रकाराचे, कशा तऱ्हेने व केव्हा कार्य करावयाचे याबाबत कुठलेही नियम लागू होत नाहीत. प्रत्येकजण आपल्या गुरूच्या आज्ञेने, आपल्या पिंडानुसार कार्य करीत असतो. हे जरी सत्य असले तरी संतांचे कार्य काही प्रमाणात काळाशी निगडित असते. कालमानाप्रमाणे कार्याचे स्वरूप बदलते हे आपल्याला प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन काळातील संतांच्या वाङ्मयाचा व संत कार्याचा आढावा घेताना दिसते. त्या त्या काळातील समाज जीवन , चालीरीती, सांस्कृतिक जडण-घडण, परंपरा, अंधश्रद्धा यांचे पडसाद संतवाङ्मयात पडतात का याचा मागोवा घेणे अत्यंत जरुरीचे असते. यादव काळापासून चारशे वर्षांपेक्षा जास्त काळ संतांनी महाराष्ट्रात विचारमंथनाचे कार्य केले आहे. त्यांनी बांधलेल्या भक्तीच्या एका धाग्याने सर्व समाज एकत्रित झालेला दिसतो. या पार्श्वभूमीवर श्रीगोंदवलेकर महाराजांच्या समकालीन संतांचे व श्रीमहाराजांचे कार्य कशा प्रकाराचे होते हा विचार प्रस्तुत लेखात करावयाचा आहे.

श्रीगोंदवलेकर महाराजांचा काळ १८४५ ते १९१३ हा आहे. ह्या काळात महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून अनेक संत आपल्या गुरूच्या आदेशाप्रमाणे कार्यरत होते. त्या सर्वांची माहिती मिळणे केवळ अशक्य आहे. तरी पण महाराष्ट्रातील ज्या प्रमुख संतांनी वाङ्मयात भर घातली, लोकोद्धाराचे काम मोठ्या प्रमाणावर केले अशा संतांचा विचार इथे केला आहे.

## श्रीगुलाबराव महाराज १८८१ ते १९१५

विदर्भात अमरावतीजवळ लोणी टाकळी नावाचे छोटे खेडे आहे. येथे गुलाबराव महाराजांचा जन्म झाला. आलोकाबाई व गोंदुजी महाड हे महाराजांचे माता-पिता. ते मोढ वंशीय क्षत्रीय. लहानपणीच डोळ्यांचा त्रास होऊन त्यांना कायमचे अंधत्व आले. १८८५ साली त्यांची आई निवर्तली. त्यामुळे त्यांचे लहानपण आजोळीच गेले. बाह्य दृष्टी नसली तरी या छोट्या मुलाला अंतर्दृष्टीने सर्व काही समजत असे. क्वचित कधीतरी ते शाळेत जाऊन बसत असत. तेव्हा जे काही कानावर पडत असे त्यातून त्यांना पाढे, हिशोब, स्तोत्रे पाठ येऊ लागले. ते एकपाठी होते.

वयाच्या १२ व्या वर्षी त्यांचा विवाह मनकर्णिकेबरोबर झाला.

**१. डॉ. वा. रा. अंतरकर 'संत स्वरूप आणि कार्य' त्रिदल प्रका. मुंबई, १९९२, पृ. २३**

ज्ञान मिळविण्याच्या तीव्र इच्छेने ते दुसऱ्या लोकांच्याकडून शास्त्रग्रंथ पुराणे वाचून घेत असत व त्याचा मोबदला म्हणून स्वतःच्या वस्तू ते देत असत. वेदांतापासून संगीत, वैद्यक, साहित्य, थिऑसॉफी, आधुनिक शास्त्रे या सर्व प्रांतातील ज्ञान घेण्याची त्यांची तीव्र इच्छा होती. लहानपणापासूनच त्यांना उपजत योगविद्या ज्ञात होती. वयाप्रमाणे त्यांनी आपली योगसाधनाही वाढविली. घरच्या कटकटीमुळे त्यांनी घर सोडले. या सर्व प्रसंगात मनकर्णिकाबाईंनी त्यांना उत्तम साथ दिली. १९०१ मध्ये त्यांना ज्ञानेश्वर माऊलीचा साक्षात्कार झाला व ते स्वतःला ज्ञानेश्वरकन्या मानू लागले. १९०३ मध्ये त्यांनी कृष्णपत्नीत्वाचा अधिकार मिळावा म्हणून भागवतातील कात्यायनी व्रत केले व कात्यायनी मंत्राची दीक्षा घेतली. स्वतःला प्राप्त झालेली मधुरा भक्ती आपल्या शिष्यांनाही प्राप्त व्हावी या इच्छेने त्यांनी हे व्रत केले.

१९०४ पर्यंत त्यांचा शिष्यगणही बराच वाढला होता. त्यांच्या वाणीला इतका ओघ असे की ते जेव्हा लिहून घ्यायला सांगत तेव्हा ३-४ लेखनिक पुरे पडत नसत. मनकर्णिकाबाई त्यांच्या शिष्या होत्या. त्यांनी महाराजांची खूप काळजी घेतली. १९०७ मध्ये मनकर्णिकाबाईंचे देहावसान झाले. याचा फार मोठा आघात गुलाबराव महाराजांचेवर झाला. ते आपले जास्तीत जास्त लक्ष लेखनात घालू लागले.

आपल्या लेखनातून त्यांनी अनेक प्रकारचे सिद्धांत मांडले, सूत्र रचना केली व शंकराचार्यांप्रमाणे खंडन-मंडनात्मक भाष्ये लिहिली. योग, संगीत, वैद्यक, व्याकरण, साहित्य, सांख्ययोग, भौतिक शास्त्र, इत्यादी विषय त्यांनी समर्थपणाने मांडले आहेत. त्यांच्या लिखित ग्रंथांची संख्या १५० पेक्षा जास्त आहे. हे लिखाण हिंदी, मराठी, इंग्रजी या भाषांमधून अस्खलितपणाने साकारले आहे. यावरून त्यांच्या प्रतिभेच्या भरारीची कल्पना सहजपणाने येते. येवढे मोठे कार्य त्यांनी केवळ वयाच्या ३५ व्या वर्षी संपविले. इ.स. १९१५ साली २० सप्टेंबर रोजी त्यांचे देहावसान झाले. त्यांचे वाङ्मय, काव्यदृष्टीने उच्च प्रतीचे आहे. भाषाशैली प्रासादिक आहे.

## गोदामाऊली कीर्तने १८३३ ते १९१०

करवीर संस्थानातील अधिकारी नारायणराव व सौ. लक्ष्मीबाई कीर्तने यांची कन्या गोदावरी. मातापिता दोघेही विठ्ठल भक्त. तीच भक्ती छोट्या बालिकेत होती. पाचव्या वर्षी विवाह होऊन लगेचच तिच्या वाट्याला वैधव्य आले. त्या वेळी मथुरास्वामींनी तिला नामस्मरणाची गोडी लावली. पुढे रामचंद्रबुवा तिकोटकर या महान सत्पुरुषाच्या सहवासात आल्यावर शक्तिपाताने गोदावरीबाईंना ब्रह्मानुभव प्राप्त झाला व चैतन्याचा प्रकाश दिसला.

गुरूच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी आपले जीवन लोकसेवा करून त्यांना उपदेश करण्यात घालविले. स्वात्मबोध, स्वात्मानुभुती या ग्रंथातून गोदामाऊलींना आलेली आध्यात्मिक अनुभूति, त्यांना प्राप्त झालेले योग-ज्ञान व वेदांतांचे सखोल दर्शन होते.

## श्रीकृष्ण सरस्वती १८३५ ते १९००

यांचे मूळचे नाव अप्पाशास्त्री जोशी. दत्तभक्तीकडे लहानपणापासून ओढा होता. वयाच्या १७-१८ व्या वर्षी श्रीअक्कलकोटचे स्वामी समर्थांची भेट झाली. स्वामींनी त्यांना 'माझे काम तू पुढे कर' असे सांगितले. स्वामींनी त्यांना स्वतःचे आत्मलिंग देऊन त्यांचे नाव कृष्ण सरस्वती ठेवले व त्यांना कोल्हापूरला जाण्याची आज्ञा केली. भक्तिमार्गाचा प्रसार करण्यासाठी त्यांनी आपले उर्वरित आयुष्य वेचले. हल्लीचे नामदेव महाराज हे त्यांचे शिष्य होत.

## वासुदेवानंद सरस्वती उर्फ टेंबे स्वामी १८५४ ते १९१४

वासुदेवानंदांचे मूळ नाव वासुदेव गणेश टेंबे. त्यांचे वडील गणेशभट, कऱ्हाडचे अग्निहोत्री ब्राह्मण. दत्तात्रेयाचे उपासक होते. वैराग्यामुळे संन्यास घेण्याच्या विचारात असताना त्यांना दत्तात्रेयाचा साक्षात्कार झाला व त्यानंतर त्यांनी आज्ञेनुसार गृहस्थाश्रम स्वीकारला.

वासुदेवांचा जन्म सावंतवाडी जिल्ह्यात माणगावी झाला. लहानपणापासून वेदाध्यायनाकडे ओढ होती. वयाच्या २१ व्या वर्षी त्यांचा विवाह झाला. वासुदेवानंद नरसोबाचे वाडीस नेहमी दत्तात्रेयांच्या दर्शनास जात असत. तिथे गोविंदस्वामी नावाच्या यतीच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी दत्तोपासनेला सुरुवात केली. तिथे योगाचा अभ्यास व कठोर साधना केली. दत्तात्रेयांचा साक्षात्कार झाल्यावरच ते माणगावी आले व तिथे साधना सुरू केली. त्यांच्या पत्नी अन्नपूर्णा बाईंच्या निधनानंतर वासुदेवांनी चतुर्थ आश्रमाची संन्यासदीक्षा घेतली. संन्यासानंतर ते सतत २४ वर्षे चातुर्मासात भारतभर तीर्थयात्रा करीत हिंडत होते. या काळात त्यांनी दत्तसंप्रदायाचा प्रसार केला. प्रवचनाद्वारे त्यांनी आचारधर्म, उपासना, नीतिधर्म या गोष्टींचा प्रसार केला.

त्यांनी विपुल ग्रंथलेखन केले. त्यातील बरेचसे लेखन दत्त संप्रदायावरच आहे. दत्तपुराण, दत्तमाहात्म्य, सप्तशती, गुरुचरित्रसार, योगरहस्य, बोधरहस्य, हे त्यांचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत. याशिवाय अनेक भजने, अष्टके, गुरुस्तुतीपर पदे, स्तोत्रे व अनेक स्फुट काव्येही त्यांनी रचली आहेत. स्वामींचे तीव्र वैराग्य, सदाचरण, मंत्रसिद्धी, ज्योतिषाचे उत्तम ज्ञान यामुळे त्यांचा लोकसंग्रह खूप मोठा होता. अलिकडच्या काळातील गुळवणी महाराज हे त्यांचे निकटचे शिष्य होत.

## साईबाबा १८३६ ते १९१७

यांचे चरित्र तसे अज्ञातच आहे. जन्मकाळाबाबतही निश्चित तपशील मिळत नाही. लहानपणीच आई-वडिलांचे छत्र नाहीसे झाल्याने एका फकीराने त्यांचा सांभाळ केला असे मानले जाते. त्या काळात बाबांचा सहवास एका आत्मज्ञानी योग्याशी आला व त्या योग्याकडून बाबांना ज्ञान प्राप्त झाले. श्रीमाणिकप्रभूंच्या आर्शीवादानंतर त्यांनी शिर्डी इथे वास्तव्य केले, असे मानले जाते. हजारो दुःखी, कष्टी जीवांना श्रद्धेचा व विवेकाच्या मार्गाचा उपदेश करून जीवनात दिलासा देण्याचे महत्त्वाचे कार्य त्यांनी केले. परमेश्वरावर अढळ श्रद्धा ठेवा, तोच तुमचा उद्धार करील असे त्यांचे महत्त्वाचे सांगणे होते.

## सिद्धारुढ स्वामी १८३६ ते १९२९

यांचे मूळ नाव सिद्धाप्पा. लहानपणापासून भगवद्‌भक्तीची आवड होती. वयाच्या १४ व्या वर्षी वैराग्य प्राप्त झाल्यामुळेच घर सोडले ते

परत घरी गेलेच नाहीत. औंढ्या नागनाथ येथे सिद्ध पुरुषाच्या संगतीत राहून त्यांची खूप आध्यात्मिक प्रगती झाली. त्यानंतर नाना ठिकाणी फिरून हुबळीस स्थायिक झाले. त्यांचे वर्तन व राहणी अत्यंत साधी, वैराग्यशील व निरपेक्ष होती. त्यांना कानडी, तेलगु, अरबी, मराठी व हिंदी भाषा उत्तम बोलता येत असत. अद्वैतवादाचा त्यांनी पुरस्कार केला. चमत्काराच्या ते अगदी विरोधी होते. विषयासक्तीचा त्याग हेच वैराग्य व वासनेशी आपले असंगत्व समजणे हाच अहंकाराचा त्याग होय, असे त्यांचे स्पष्ट मत होते. नामसप्ताहाला ते विशेष महत्त्व देत असत. त्यांनी ईश्वर भक्तीपर बरीच पदरचना केली.

श्रीगोंदवलेकर महाराजांची व सिद्धारुढ स्वामींची भेट झाल्याचा उल्लेख सिद्धारुढ स्वामींचे पोथीत आढळतो. त्या भेटीसंबंधीचा एक संपूर्ण अध्यायच आहे. श्रीमहाराजांचे शिष्य तम्मणा उर्फ सच्चिदानंद त्यांच्या बरोबरच होते. श्रीमहाराजांना पाहून श्रीस्वामींना अत्यंत आनंद झाला. श्रीमहाराजांच्या नामसाधनेचा स्वामींनी मोठ्या गौरवाने उल्लेख केला. महाराजांना श्रीस्वामींनी समर्थ रामदासांचा अवतार आहे असे म्हटले आहे. श्रीस्वामींनी महाराजांना स्वहस्ते फलाहार दिला व त्यांचा उत्तम आदरसत्कार केला. श्रीमहाराजांना पण स्वामींना भेटून कृतार्थ वाटले. (अध्याय ४३ पृ. ३३०)

## श्री. अण्णासाहेब पटवर्धन १८४७ ते १९१३

श्री. अण्णासाहेब पटवर्धन व्यवसायाने वकील व डॉक्टर होते. देश स्वतंत्र करण्याच्या कल्पनेने प्रेरीत झाले होते. पण दुर्दैवाने ते त्यात यशस्वी झाले नाहीत. आळंदीच्या नृसिंह सरस्वतींना गुरु मानीत असत. गुरुचरित्राचे नित्य वाचन व सदैव नामस्मरण सुरू असे. लोकमान्य टिळक श्री. अण्णासाहेबांना गुरुस्थानी मानत असत.

## श्रीपंत महाराज बाळेकुन्द्रीकर १८५५ ते १९०५

कर्नाटकातील बाळेकुन्द्री हे पंतमहाराजांचे मूळ गाव. गोदाबाई व रामपा हे पंतांचे माता-पिता. त्यांचे मूळ नाव बाळकृष्ण. पंतांच्या घराण्यात दत्तभक्ती पूर्वापार चालू होती. त्यामुळे पंतांचा दत्तभक्तीकडे ओढा होता. बेळगाव इथे त्यांचे शालेय व पुढचे शिक्षण झाले. त्याच काळात पंतांची व त्यांचे गुरु बाळप्पा यांची भेट झाली. गुरुच्या योग्य मार्गदर्शनाने पंतांची अध्यात्म मार्गात प्रगती होत राहिली. गुरु आज्ञेप्रमाणे त्यांनी आपल्या संप्रदायाचा प्रसार सुरू केला. आपल्या गुरुची पदे व भजने ते मोठ्या प्रेमाने लोकांना सांगू लागले. १८८२ ते १८८५ या काळात पंत पारमार्थिक क्षेत्रात फार पुढे गेले. ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव व अवधूत गीता हे त्यांचे अतिशय आवडीचे ग्रंथ. या दोन्ही ग्रंथांचा त्यांच्या लेखनावर परिणाम झालेला दिसून येतो. १९०४ मधे त्यांच्या पत्नीचे निधन झाल्यानंतर त्यांच्या आयुष्यात खूप उदासीनता आली. त्या नंतर लगेचच त्यांनीही आपला अवतार संपविला.

पंतांनी विपुल व विविध प्रकारचे लेखन केले. दत्तप्रेम लहरी, नित्य भजनमाला, प्रेमतरंग, बोधानंद गुटीका, परमानुभव प्रकाश, सहजानुभव, गीतासार हे त्यांचे प्रमुख ग्रंथ आहेत. याशिवाय पत्रे, भजने, पदे, स्फुट प्रकरणेही आहेत. त्यांचे लेखन सुलभ, सहज, सोपे आहे. त्यात बोजडपणा नाही. सर्व लेखन भगवत प्रेमाने ओथंबलेले आहे. साधकाने परमार्थ संपन्न प्रपंच कसा करावा याबद्दल त्यांनी उपदेश केला आहे. त्यांना योगशास्त्राची उत्तम जाण होती तरीही त्यांनी ज्ञान व भक्तीलाच महत्त्व दिले.

## माधवनाथ महाराज १८५७ ते १९३६

माधवनाथांचा जन्म चित्रकुट करवी इथे झाला. ते लहानपणापासूनच कुशाग्र बुद्धीचे होते. बालपणीच घर सोडून ते अज्ञातवासात गेले. १५-२० वर्षांनंतर अज्ञातवासातून परत आल्यावर बराच काळ महाराष्ट्रातच घालविला. ते चित्रकुट येथील करवी गादीचे उत्तराधिकारी होते.

माधवनाथ महाराजांनीही सहा तपे नाथपंथाचा प्रसार केला. त्यांनी लोकसेवा, ईश्वर भक्ती, गरीबांचा उद्धार करणे महत्त्वाचे मानले. परमेश्वर प्राप्तीसाठी विवेक, वैराग्य व आत्मशुद्धीची गरज असते व त्यानंतरच शाश्वत शांती व आनंद मिळतो हे त्यांचे सांगणे असे. योगशास्त्र, संगीत, चित्रकला व ज्योतिष ह्या विषयांचा त्यांचा गाढा व्यासंग होता.

वर उल्लेखलेल्या व इतर अनेक अर्वाचीन संतांनी धार्मिक म्हणजे केवळ यज्ञयाग किंवा कर्मकांड नव्हे तर ज्याच्या मनात परमेश्वराचे सतत अनुसंधान आहे तोच खरा धार्मिक या विचारांचा पुरस्कार केला. मध्ययुगीन संतांप्रमाणे अर्वाचीन संतांनीदेखील नामस्मरणाची व नाम संकीर्तनाची सहज, सुलभ साधना पुरस्कारली. त्यामुळे लोकांमध्ये अन्य धर्माच्या प्रसाराला तोंड देण्याची शक्ती काही प्रमाणात आली. श्रीगोंदवलेकर महाराजांचा काळ हा इंग्रजी सत्तेच्या ऐश्वर्याचा भरभराटीचा काळ होता. तसाच तो स्वातंत्र्यपूर्व वादळाच्या निर्मितीचाही काळ होता. त्यामुळे दया, शांती, करुणा याबरोबर स्वाभिमान व स्वधर्म पालन ह्या दोन महत्त्वाच्या गोष्टींची जाणीव महाराष्ट्रात काही संतांनी उघडपणे तर काही संतांनी आडवळणाने करून दिली.

या सुमारे ७० वर्षांच्या कालावधीत १८५७ चे बंड, १८७६ चा दुष्काळ, टिळक-आगरकरांचा उदय, फुले-गोखले यांचे सामाजिक कार्य, राममोहन रॉय, दयानंद सरस्वती यांच्या धार्मिक चळवळी, हिंदू धर्माच्या पुनरुज्जीवनाची वाटचाल व स्वातंत्र्याकडे झेपावणारी राष्ट्रीय चळवळ या महत्त्वाच्या घटना घडल्या. इंग्रजी संस्कृतीच्या जबरदस्त लाटेने भारतीय संस्कृतीची पाळेमुळे हालतील का, अशी परिस्थिती निर्माण झाली होती. महाराजांसारख्या संतांनी जर भारतीय संस्कृतीची जपणूक आपल्या कार्याने केली नसती तर धर्मांतराचे लोण आटोक्याबाहेर गेले असते.

या काळातील संतांनी केलेले कार्य अपूर्वच होते. प्रत्येकाचा आपला स्वतःचा असा खास मार्ग होता. साईबाबा, गजानन महाराज यासारखे संत शिरडीत किंवा शेगाव सोडून फारसे बाहेर गेले नाहीत. या उलट वासुदेवानंद सरस्वती, गोंदवलेकर महाराज या संतांनी अफाट भ्रमण, तीर्थाटन केले. माधवनाथ महाराज अज्ञातवासात कुठे होते याचा ठिकाणा सापडत नाही. वासुदेवानंद सरस्वती, पंत महाराज, गुलाबराव महाराज यांची वाङ्मय निर्मिती विपुल आहे, तर साईबाबा, श्रीअक्कलकोट स्वामी

यांनी एक ओळही लिहिली नाही व काही लिहिले असेल तर ते उपलब्ध नाही, असे जरी असले तरी त्यांचे आध्यात्मिक कार्यही उच्चस्तराचे होते, त्यांचा शिष्यगण फार मोठ्या संख्येत होता व आहे.

वर निर्देशिलेल्या संतांत वारकरी, दत्तनाथ, रामदासी असे अनेक पंथ दिसतात. अनेक पंथांचे, एका ठराविक काळातील हे संत एकमेकांना भेटले असतीच असे नाही. साईबाबा गोंदवलेकरांना कधी भेटल्याचा उल्लेख नाही पण एक गांजेकस माणूस सुधारण्यासाठी त्यांनी गोंदवल्यास महाराजांकडे पाठविला होता. गोंदवलेकर महाराजांची व अक्कलकोट स्वामींची, गुलाबराव महाराजांची, माणिक प्रभूंची, सिद्धारुढ स्वामींची भेट झाल्याचा उल्लेख सापडतो पण काळाचा तपशील मिळू शकत नाही. समकालीन संतांच्या भेटी झाल्या नसल्या तरी आंतरिक दृष्टीने ते एकच होते. लोककल्याणाचा धागा हा त्यांच्यातील महत्त्वाचा दुवा होता.

समकालीन संतांच्या बरोबर काळाच्या अनुरोधाने श्रीगोंदवलेकर महाराजांच्या कार्याचा मागोवा घेणे जरूरीचे वाटते. प्रस्तुत काळ राजकीय, सामाजिक व धार्मिक परिवर्तनाच्या दृष्टीने अत्यंत संवेदनाक्षम होता व त्या नुसारच कार्य करणे आवश्यक होते. राजकीय व धार्मिक गोष्टीत उघडपणाने ढवळाढवळ करणे म्हणजे ब्रिटीश सरकारचा रोष ओढवून घेण्यासारखे होते. असे महाराजांना वाटले असावे म्हणून त्यांनी केलेले सामाजिक, धार्मिक परिवर्तन थोड्या वेगळ्या वाटेचे होते. महाराजांनी राममंदिरे, हनुमान मंदिरे स्थापून मंदिरांच्या माध्यमातून सांस्कृतिक जपणूक केली. सामान्य माणसांच्या मनात आलेली मरगळ मंदिरातून चालणाऱ्या कार्यक्रमांतून, नित्यनेमातून दूर केली. आचार-विचार कसे असावे हे त्यांनी एका अभंगाद्वारे सांगितले आहे. ते म्हणतात :

'अहो मंदिरवासी जन । तुम्ही ऐकावे वचन
आल्या अतीता अन्न द्यावे । रामनाम नित्य घ्यावे
पुजा करावी त्रिकाळ । अंगी वैराग्याचे बळ
भाव ठेवा रामापायी । कोणा मागू नका काही
नम्र व्हावे सर्वां भूता । परनारी जैसी माता' [२] (चै. गा. भं. क्र. १७४)

मंदिरातून चालू असलेली उपासना हे एक प्रकारचे लोकशिक्षणच आहे. असे शिक्षण सामाजिक परिवर्तनाच्या दृष्टीने योग्य होते. वैचारिक शुद्धता, वर्तनातील नीतीमर्यादा, लोकांच्या अंगी बाणवण्याचे कार्य त्यांनी मंदिरातून होणाऱ्या प्रवचनाद्वारे केले. प्रवचनांतून महाराज अनेक तऱ्हेच्या कौटुंबिक, सामाजिक प्रश्नांची उकल करीत असत. महाराजांचे भ्रमण खूप असल्याने अशा तऱ्हेची प्रवचने जागोजागी होत असत. कर्मकांड, यज्ञयाग या जटीलांचा त्याग हे त्यांच्या उपदेशाचे खरे मर्म आहे. त्यांचा उपदेश होता :

'न लगे योग ध्यान । पंचाग्नीधूम्रपान
न लगे काही साधन । तीर्थयात्रेचे भ्रमण,
न लगे विषयांची खटपट । मंदिर आणि कधी मठ
न लगे मानापमान । सुखदुःख येक जाण (चै. गा. भं. क्र. ३४३)
दीनदास म्हणे रामराया । दृढ राहू तुझे पाया'

त्या वेळेची सामाजिक स्थिती महाराज वर्णन करतात :

'सोडुनिया संध्या स्नान । कोणी करिती मद्यपान
नास्तिक सांगे ब्रह्मज्ञान । शुद्र करिती संध्या स्नान
नीति मर्यादा नासली । पाप बुद्धी बळावली (चै. गा. भं. क्र. १५९)
संन्यासी करिती विषयक्रिया । गृहस्थे सोडियेल्या स्वस्त्रिया (क्र. १७१)
कोण जाणे भक्तीभाव । प्लेग आला गावोगाव
दुष्काळ पडे बहु भारी । कष्टी होती नाना परी.
दीनदास सांगे तुम्हा । मुखी राम राम बोला.

एकोणीसाव्या शतकाच्या उत्तरार्धात भारत अनेक सामाजिक सुधारणांमध्ये आघाडीवर होता. परंतु त्याचबरोबर नैसर्गिक आपत्ती, अनिष्ट रुढींनी गांजलेलाही होता. यातून मार्ग काढण्यासाठी प्रार्थना समाज, आर्यसमाज, थिऑसॉफिकल सोसायटी, रामकृष्ण मिशन असे अनेक धार्मिक, सामाजिक पंथ निर्माण झाले होते. जुन्या मतांना काही ठिकाणी डावलून तर काही ठिकाणी वेदोक्त मतांना उन्नत करून या संस्थांनी आपला मार्ग आखला होता. या पंथांच्या वैचारिक मंथनातून पूर्णपणाने सुधारलेला असा एक खास वेगळा वर्ग समाजात निर्माण झाला होता. मध्यम व सुशिक्षित वर्गात निरीश्वर वादही मोठ्या प्रमाणावर बोकाळला होता. परमेश्वराचे अस्तित्व मानणे किंवा साधु-संतांना मान देणे हे कमीपणाचे मानले जात होते. जे लोक ईश्वर मानीत होते त्यांची मनस्थिती निरनिराळ्या पंथ स्थापनेने दोलायमान होती. कोणत्या पंथाची मते आचरावित या कल्पनेने सामान्यजन संभ्रमित होते. अशा वेळी मतमतांतराच्या गलबल्यातून सहज पेलवणारा, रुचणारा व आचरणात आणण्यास सुलभ असा मार्ग सुचविणे आवश्यक होते. या योग्य वेळी अनेक संतांनी पूर्वापार प्रतिपादिलेला असा नामस्मरणाचा मार्ग महाराजांनी परत एकदा लोकांच्या समोर मांडला. तत्कालीन परिस्थितीत तो मार्ग आचरणीय वाटला असल्याने लोकांनी नामभक्तीच्या मार्गाचा स्वीकार केला असावा. महाराजांच्या शिकवणुकीत त्या वेळी प्रचलीत असलेल्या अनेक पंथांची मते एकवटली होती. 'सर्वत्र श्रीरामाचे विश्वात्मक रूप पहा, रूप व नाम यात फरक करू नका. नामभक्तीसाठी कुठल्याही जाती-धर्माचे, वयाचे बंधन नाही.' अशी महाराजांची शिकवण कुठल्याही समाज सुधारक पंथाच्या तत्त्वांची बरोबरी करणारीच होती. त्यासाठी नवीन पंथ स्थापनेची जरूरी नव्हती. काळाच्या प्रभावापुढे दुसरे कुठलेही साधन फार काळ टिकून राहणार नाही याची जाणीव महाराजांना असल्याने त्यांनी नामस्मरणाचा मार्ग चोखाळला व त्या मार्गावर भर दिला. या मार्गाने आचार, विचार, धर्म टिकून राहील असा त्यांचा विचार असावा. त्यामुळे महाराजांनी आपली स्वतःची वेगळी वाट निवडली व काळानुसार साधना सांगितली. स्वतःच्या शुद्ध आचरणाने, आदर्श वर्तनाने एका उत्कृष्ट सामाजिक नेत्याचा आदर्श लोकांपुढे ठेवला. त्यांनी काळानुसार साधना सांगितली पण कुठल्याही चळवळीत,

---

**२. डॉ. वा. रा. अंतरकर संपादक चैतन्य गाथा, वा. रा. अंतरकर, मुंबई १९७७.**

आंदोलनात उघडपणाने भाग घेतला नाही. त्यामुळे त्यांच्या वाङ्मयातून काळाचे पडसाद फारसे दिसत नाहीत.

महाराजांनी केलेली वाङ्मय निर्मिती ही ठराविक उद्दिष्ट डोळ्यांपुढे ठेऊनच होती. नामसाधनेने वैयक्तिक जीवन सदाचरणाने सुस्थितीत येते व अनेकांचे वैयक्तिक जीवन सुधारले की सामुदायिकरीत्या समाज सुधारणा होतेच या संकल्पनेवर महाराजांचा विश्वास असावा कारण त्यांच्या प्रवचनातून ते अशा तऱ्हेची उदाहरणे अनेक वेळा देत असत. असे कार्य कोणत्याही सामाजिक कार्याइतकेच महत्त्वाचे आहे यात शंका नाही.

महाराजांची अनेक कार्ये सामाजिक दृष्टीने महत्त्वाची आहेत. ते करीत असलेले अन्नदान हे त्यापैकी एक कार्य आहे. १८७६ च्या भयंकर दुष्काळात महाराजांनी आपल्या शेतावर अनेक मजूर ठेऊन घेतले होते. त्या मजुरांना काही ना काहीतरी काम सांगून महाराज त्यांना पोटभर जेवण देत असत. त्यांना काम सांगण्याचा उद्देश एकच असे तो म्हणजे ते स्वतः शारीरिक व मानसिक आलस्याच्या अगदी विरोधी होते. ते स्वतः नेहमी उद्योगरत असत. आळस मग तो शारीरिक असो अगर मनाला आलेली ग्लानी असो दोन्ही गोष्टी त्यांना संपूर्ण त्याज्य होत्या. श्रीमहाराजांनी नामस्मरण, सात्त्विक जीवन, वैषयिक निवृत्ती उद्योगप्रियता याचबरोबर अन्नदानालाही फार महत्त्व दिले. त्यांच्या दृष्टीने अन्नदान म्हणजे वंचितावर केलेली दया नव्हती. अन्नदानाला सात्विक, धार्मिक, सामाजिक अधिष्ठान त्यांनी निर्माण केले. भुकेल्या पोटी दोन घास घालावेत हे धार्मिक आचरण तर आहेच परंतु ती सहृदयता सुद्धा आहे. अशा हजारो बेघर, उपासमारीने जर्जर झालेल्या लोकांना ते पुरेसे अन्न देत असत व त्यानंतर त्या लोकांना रामनाम घ्यायला लावीत असत. त्या वेळेचा औंधचा राजादेखील महाराजांचे असे अन्नदान पाहून थक्क झाला होता. अन्न हे पूर्ण ब्रह्म असून त्याचे सेवन करताना प्रसन्नतेने ईश्वराचे चिंतन आणि अनुसंधान असावे यासाठी रामनामाच्या गजरात अन्नदानाच्या पंगती उठत असत. अन्नदानाचे वेळी सामाजिक, शैक्षणिक, वैचारिक आणि आर्थिक पातळीचा चुकूनही विचार केला जात नसे. प्रत्येकजण अतिथी आहे ह्या पूज्य भावनेने अन्नदान सदैव पार पडत असे. तेव्हापासून सुरू असलेली ही प्रथा आजही गोंदवले येथे सुरू आहे. श्रीमहाराजांच्या या कार्याला अन्नदान म्हणण्यापेक्षा अन्नयज्ञ म्हणणे कदाचित जास्त उचित होईल. कारण दान घेणाऱ्याची असहायता त्यात अपेक्षित नव्हती. यज्ञकर्म करण्याची, सात्त्विकतेने समृद्ध व ईश्वराच्या अधिष्ठानाशी संपूर्ण निगडित असलेले ते एक कर्तव्यकर्म होते.

दुष्काळात भुकेल्या जनावरांसाठीही महाराजांनी गोंदवल्यास छावणी उघडली होती. गोसेवा व गोरक्षण हे महाराजांचे महत्त्वाचे सांस्कृतिक व सामाजिक कार्य आहे. अनेक वेळा त्यांनी कसायाकडून शेकडो गाई सोडवून आणल्या होत्या. गोरक्षण हा त्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय होता तरी पण त्याचा महाराजांनी कधी देखावा केला नाही. गाई-बैलांची देखरेख ते स्वतः करीत असत.

दीनदुबळ्यांची सेवा करणे हाही एक धर्म आहे, असे ते मानीत असत. त्यांनी महारोग्यांची सेवा करून त्यांना गोंदवल्यात मानाने राहू दिल्याचे उदाहरण गौतमबुवांनी आपल्या पुस्तकात दिले आहे. समाजाच्या दृष्टीने टाकाऊ अशा वर्गातील लोकसुद्धा महाराजांचे शिष्य होते. महाराजांनी रचना व शरणा या दोन वेश्यांचे आयुष्य बदलून त्यांना भक्तीमार्गाला लावल्याचे उदाहरण काणे महाराजांच्या चरित्रात सापडते. या [३] उदाहरणावरून महाराजांना फक्त सामाजिक जागृती अभिप्रेत नव्हती तर त्याबरोबर अध्यात्मिक जागृतीही अपेक्षित होती.

धार्मिक सुधारणांच्या बाबतीतही ते उदारमतवादी होते. वेदांना त्यांनी प्रमाण मानले पण त्याचबरोबर त्यातून वाढलेल्या कर्मकांडाला त्यांनी विरोध केला. महाराजांना हिंदू धर्माचा, त्यातील आचार-विचारांचा, संस्कारांचा अभिमान होता. लहान मुलांच्या मनावर उत्तम संस्कार झाले पाहिजेत असे त्यांचे मत ते प्रवचनांतून व्यक्त करीत असत. अनेक गरीब मुलांचे सामुदायिक उपनयन संस्कार त्यांनी केले. त्या मुलांना संध्या व इतर आन्हिक शिकविणे, विष्णुसहस्त्रनामाच्या पोथ्या देणे अशी कार्ये धार्मिक परंपरा जतन करणारीच होती.

इंग्रजी संस्कृतीतून आलेली धर्मांतराची मोहीम त्या काळी चांगलीच बाळसे धरू लागली होती. सातारा भागातही ख्रिश्चन पाद्री आपला जम बसवू पहात होते. गरीब लोकांना त्यापासून परावृत्त करण्यासाठी महाराज या गरजुंना मोफत अन्न, कपडा देत असत व सोप्या पद्धतीने त्यांना नामस्मरणाकडे वळवून धर्मांतरापासून परावृत्त करीत असले पाहिजेत, असे अनुमान काढता येते.

शिक्षणाच्या बाबतीत महाराज बाह्य शिक्षणापेक्षा अंतरंगातील शिक्षणाला जास्त महत्त्व देत असत. माणसाचे अंतरंग सुधारले तरच तो आदर्श नागरिक म्हणून वागू शकेल, असे त्यांना वाटत असे. खऱ्या शिक्षणाने माणसाचा अहंकार न वाढता तो नष्ट झाला पाहिजे. ब्रह्मानंद, डॉ. कूर्तकोटी, कृष्णशास्त्री यांच्यासारखे महाराजांचे अनेक विद्वान उच्चशिक्षित शिष्य होते. महाराजांनी त्यांना त्यांच्या योग्यते प्रमाणेच उपदेश केला होता. या शिष्यांचा त्यांना विद्येबद्दल असलेला अहंकार महाराजांच्या सहवासात आल्यावर पूर्णपणाने लोप पावला होता. शिक्षणाच्या संदर्भात महाराज एका प्रवचनात म्हणतात, 'समाधान देईल, भगवंत जोडेल ती खरी विद्या व अभिमान नाहीसा करेल तेच खरे शिक्षण.'

श्रीगोंदवलेकर महाराजांच्या एकूण राजकीय, धार्मिक, सामाजिक कार्याचा धांडोळा घेतला तर काही निष्कर्ष निश्चितपणाने काढता येतील. अव्वल इंग्रजी कालात श्रीमहाराजांनी फक्त महाराष्ट्रातच असे काम केले नाही तर त्यांचे काम कर्नाटक, मध्य प्रदेश, बंगाल या भागांतही मोठ्या प्रमाणावर होते. राजस्थान मध्येही महाराजांची नामसाधना पोहोचलेली आढळते. श्रीमहाराजांचा स्वतःचा असा वेगळा संप्रदाय नव्हता तरी तो संप्रदाय रामदासी संप्रदायाशी खूप मिळता जुळता होता. त्याला 'नामसंप्रदाय' हे नाव अधिक उचित ठरेल. या संप्रदायाने तत्कालीन परिस्थितीत गीतेतील कर्मवादाला भक्तीमार्गाची पुष्टी जोडली. भक्तीचे, नामाचे तत्त्वज्ञान सामान्यातल्या सामान्य लोकांपर्यंत समाजाच्या तळागाळापर्यंत, बहुजनांसाठी सोपे करून मांडले. प्रपंच, विज्ञान व परमार्थ याचा सुंदर मेळ कसा

**३. श्री. वसंतराव गोखले 'परमचैतन्य काणे महाराज चरित्र' सद्गुरु सेवा मंडळ, बेळगाव, १९९४, पृ. ७८.**

घालावा याचे प्रमेय सांगितले. श्रीमहाराजांनी प्रपंच सोडून परमार्थ करा असे कधीच सांगितले नाही. तर समर्थांनी म्हटल्याप्रमाणे, 'आधी प्रपंच करावा नेटका' हे सूत्र स्वतः अंगिकारले व मगच इतरांना सांगितले. द्रव्यार्जनाला त्यांचा कधीच विरोध नव्हता. कष्ट करून उत्तम द्रव्यसंचय करावा असे ते म्हणत. पण त्याचबरोबर सात्त्विकतेने व नीतिमत्तेच्या अधिष्ठानावर राहून सर्व प्रपंच करावा ही त्यांची शिकवण होती. नामस्मरणाच्या गजराने सावध असलेला प्रपंच करताना परमार्थ साधावा अशी त्यांची निष्ठा होती. संसाराच्या आड ते आले नाहीत पण परस्त्री, परद्रव्यावर डोळा ठेवून सुखी संसाराचा बडेजाव करणाऱ्या भोंदू लोकांचा त्यांनी धिक्कारच केला. तुकारामबुवांच्या सारखीच परनिंदा, परस्त्री व परद्रव्य या त्रिसूत्रीवर त्यांनी आपली शिकवण आधारली होती. गृहस्थाश्रमाचे महत्त्व त्यांनी वारंवार पटवून दिले आहे. इंग्रजी काळातील सुशिक्षितपणाच्या नावाखाली आपली संस्कृती, आचार, विचार, वर्तने विसरू पाहणाऱ्या इहवादी चंगळवादाला प्रोत्साहन देणाऱ्या लोकांच्या जीवनाला अनिष्ट वळण लागू नये म्हणून भक्तीमार्गाचा प्रसार केला व त्यांच्यापुढे श्रीरामाच्या उपासनेचे आधिष्ठान उभे केले. व्यक्तिगत जीवनशुचितेने परिपूर्ण व्हावे, सुसंपन्न असावे यासाठी नामस्मरणाच्या मार्गाचा अंगिकार केला व तो मार्ग लोकांच्या आचरणात कसा आणता येईल याचा सदैव विचार केला. त्यांच्या दीर्घ तीर्थाटनामागे हा फार महत्त्वाचा हेतू होता. इंदौर, वाराणसी, हरदा, कलकत्ता या भागात ते अनेक वेळा जात असत. जो शिष्यवर्ग त्यांनी त्या भागात जोडला होता त्या शिष्यांचा आत्मविश्वास, रामनामाचे प्रेम सातत्याने जागृत ठेवण्यासाठी महाराजांना तिथे वारंवार जाणे आवश्यक होते. उत्तरेत त्यांना दख्खनका साधु किंवा ब्रह्मसाधू म्हणून ओळखत असत.

श्रीमहाराजांची ऐहिक जीवनाला परमार्थाची जोड देऊन लोकांना नीतिच्या मार्गावर आणण्याची भूमिका उत्तम समन्वयकाची होती. तशीच आदर्श लोकशिक्षकाचीही होती. त्यांनी सहज सोप्या भाषेत घातलेली प्रपंच परमार्थाची सांगड, व्यवहाराला दिलेले महत्त्व व अध्यात्म म्हणजे गहन शास्त्र नसून रोजच्या जगण्यातला महत्त्वाचा भाग आहे हे सांगण्याची हातोटी ह्या सर्वातून त्यांच्यातला हाडाचा लोकशिक्षक आपल्या पुढे येतो. आपल्या दीर्घ पर्यटनातून त्यांनी मानवी मनाचे मनस्वी निरीक्षण केले होते. मनाचे विश्लेषण करून मनाला ताब्यात ठेवण्यासाठी मनासारख्याच सूक्ष्म नामसाधनेची निवड केली हे त्यांच्या कार्याचे विशेष आहे.

श्रीमहाराजांच्या प्रभावी व आकर्षक व्यक्तिमत्त्वामुळे आणि पारमार्थिक अधिकारामुळे लो. टिळक, मदनमोहन मालवीय, न. चिं. केळकर, वासुदेव बळवंत फडके यांच्यासारखे राजकारणीही त्यांच्याकडे आकर्षित झाले होते. लो. टिळकांना वाटणारा श्रीमहाराजांचे बद्दलचा आदर महाराजांच्या पारमार्थिक ज्ञानामुळे, महाराजांच्या दासबोध प्रेमामुळे व महाराजांच्या श्रीसमर्थांच्या वरील निष्ठेमुळेही असावा. समर्थांचेच काम काही प्रमाणात श्रीगोंदवलेकर महाराजांनी चालू ठेवले अशी अनेकांची श्रद्धा आहे. लो. टिळक श्रीसमर्थांचे बद्दलचा आदर प्रकट करताना म्हणतात,

'उत्कट भक्ती आणि त्याबरोबर आमरणात ईश्वरार्पण, निष्काम कर्म असे जे प्रवृत्तीपर भागवत धर्माचे लक्षण किंवा गीतेचा सिद्धांत याचा पूर्ण खुलासा समजण्यासाठी समर्थ रामदासांच्या कार्याकडे व त्यांच्या दासबोधाकडे वळले पाहिजे. '

श्रीगोंदवलेकर महाराजांची कामाची दिशा श्रीसमर्थांच्या कार्यापेक्षा थोडी वेगळी असली तरी दोघेही संत गुरु परंपरेने एकच आहेत हे स्पष्ट आहे. श्री समर्थांच्या शिकवणुकीतला आचार-विचारांचा काही भाग महाराजांनी तसाच उचलला आहे. मंदिरांची स्थापना, त्यातून होणारे वैचारिक परिवर्तन, वर्तनातील नेमस्तपणा, प्रपंच परमार्थाची उत्तम सांगड, चोख व्यवहाराला दिलेले महत्त्व व लोकांच्या मनात उत्पन्न केलेले रामनामाचे प्रेम ह्या गोष्टी समर्थांच्या कार्याचेच पुढचे पाऊल आहे यात शंका नाही.

श्रीगोंदवलेकर महाराजांना देह ठेऊन ८५ वर्षे झाली तरीही त्यांची लोकप्रियता यत्किंचीतही कमी झाली नाही. उलट पक्षी गोंदवल्यात प्रतिदिनी त्यांचा भक्तगण वाढतोच आहे. श्रीमहाराजांचे निर्वाणानंतर त्यांची शिकवण, विचारधन तळागाळा पर्यंत पोहोचविण्याचे महत्त्वाचे काम त्यांचे शिष्य श्रीब्रह्मानंद महाराज, श्रीआनंदसागर यांनी पूर्वी केले. हल्लीच्या पिढीतील श्री. तात्यासाहेब केतकर व नुकतेच निवर्तलेले श्रीमहाराजांचे भक्त व अनुयायी कै. के. वि. बेलसरे यांनी श्रीमहाराजांच्या विचारप्रसाराचे काम प्रवचनांद्वारे मोठ्या प्रमाणावर केले आहे. त्यांच्या एवढेच महत्त्वाचे काम श्री. गो. सी. गोखले यांनी संकलीत केलेल्या 'श्रीमहाराजांची ३६५ प्रवचने' या पुस्तकाने केले आहे. ह्या पुस्तकाने महाराजांची शिकवण सामान्यातल्या सामान्य लोकांपर्यंत संक्रमित होते आहे. श्रीमहाराजांनी आपली गादी न ठेवूनसुद्धा त्यांची शिकवण, विचार सौंदर्य आजही लोकांना आत्मिक समाधान देते आहे. याची साक्ष त्यांच्या सतत वाढणाऱ्या शिष्यवर्गावरून मिळते. या बाबतीत प्रसिद्ध संत वाङ्मय लेखक श्री. र. रा. गोसावी म्हणतात, 'गोंदवल्याच्या श्रीगोंदवलेकर महाराजांची विमुक्त उपासना परंपरा व विदर्भातील साखरखेर्डा येथील प्रल्हाद महाराजांची परंपरा (प्रल्हाद महाराज हे श्रीगोंदवलेकरांच्याच संप्रदायाचे आहेत) या पारमार्थिक संस्था समर्थ संप्रदायाच्या विस्ताराच्या निदर्शक आहेत. कोठल्याही गादीच्या किंवा उपासना परंपरेच्या चौकटीत न सापडता स्वतंत्रपणाने रामोपासना करून समर्थविचारांचे पाथेय घेऊन आपल्या जीवनाला आकार देऊ पाहणारे असंख्य मुमुक्षु आज दिसू लागले आहेत.' [४]

श्रीमहाराजांनी १०० वर्षांपूर्वी लावलेल्या रामनामाच्या रोपट्याचा आज मोठा वृक्ष गोंदवले इथे वाढताना दिसतो आहे, ही खरोखरच अभिमानाची गोष्ट आहे.

सौ. आशा परांजपे
ए २२, अभिमानश्री सोसायटी, पाषाण रोड, पुणे ४११ ००८.

**४. श्री. र. रा. गोसावी श्रीसमर्थ व समर्थ संप्रदाय व्हीनस प्रकाशन, पुणे १९९१, पृ. २६३.**

# महाराजांच्या प्रवचनांची अपूर्वता

**श्री. चं. प. भिशीकर**

*पुणे तरुणभारत दैनिकाचे सेवानिवृत्त संपादक. राजकीय, सामाजिक व आध्यात्मिक विषयांवर सुमारे २५ पुस्तके प्रसिद्ध. आध्यात्मिक चिंतन, लेखन व प्रवचन यात काळ व्यतीत करतात.*

'श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर - प्रवचने' या ग्रंथाची १८ वी आवृत्ती १९९८ च्या मार्च महिन्यात प्रसिद्ध झाली. पहिली आवृत्ती नोव्हेंबर १९६६ मध्ये प्रसिद्ध झाली होती. अलीकडे भराभर संपणाऱ्या आवृत्त्या पाहता, या ग्रंथाला अफाट लोकप्रियता लाभली आहे आणि ती द्रुतगतीने वाढते आहे, हे उघड दिसते. पहिली ४,००० प्रतींची आवृत्ती दोन वर्षांतच संपली, या गोष्टीचे आचार्य अत्रे यांना मोठे कौतुक वाटले होते आणि १९६९ साली एक अग्रलेख त्यांनी 'मराठा'त लिहिला होता. (२८-४-६९) या अग्रलेखात आचार्य अत्रे यांनी लिहिले होते, '... हा प्रवचन खंड दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला आणि त्याच्या चार हजार प्रती महाराष्ट्रात बघता बघता संपल्या. महाराष्ट्रातील अत्यंत लोकप्रिय आणि पद्मभूषण नि पद्मश्री पदव्या मिळविलेल्या लेखकांच्या देखील एक हजार प्रतींची पहिली आवृत्ती वर्षोनुवर्षे बाजारात खपत राहाते ही वस्तुस्थिती लक्षात घेता, चार हजार प्रतींची पहिली आवृत्ती चुटकीसरशी संपून दोन वर्षांतच पाच हजार प्रतींच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशनाचा प्रपंच प्रकाशकांना करावा लागला, या एकाच गोष्टीवरून हे सिद्ध होते की महाराष्ट्रातील बहुसंख्य नव्हे बहुतेक वाचकांना शाश्वत तत्त्वज्ञानाच्या आनंददायक पुस्तकांचेच आकर्षण आहे. ही खरोखरच आनंदाची गोष्ट आहे. घाणेरड्या 'ललीत' वाङ्मयापेक्षा शाश्वत आनंद देणाऱ्या तत्त्व विचारांचाच मोह जनतेला होत असला पाहिजे, तरच तिचा आत्मा शाबूत आहे, असे म्हणता येईल. या प्रवचनांची मुमुक्षूंनी पुन्हा पुन्हा पारायणे करावीत आणि मनसोक्त आनंद, जीवनाचे समाधान, यांचा लाभ करून घ्यावा, अशी आमची सर्वांना आग्रहाची शिफारस आहे.'

## ग्रंथाची जन्मकथा

आचार्य अत्रे यांचा हा अभिप्राय अत्यंत बोलका आहे. पण प्रस्तुत प्रवचन-खंडाच्या गुणवत्तेकडे आणि त्यातील शिकवणुकीकडे वळण्याआधी त्याची जन्मकथा थोडी निवेदन करणे आवश्यक आहे. मुख्य गोष्ट अशी की महाराजांनी आपल्या जीवनकाळात अन्य प्रवचनकारांप्रमाणे प्रवचने केली आणि त्यांचे संकलन या ग्रंथात करण्यात आले, असा समज होण्याचा संभव आहे. पण तसा प्रकार नाही. महाराजांची अवतारसमाप्ती १९१३ मध्ये झाली. तो त्यांचा पहिला अवतार.जाताना ते म्हणाले होते की, बारा वर्षांनी माझा पुन्हा अवतार होणार आहे. हा अवतार १९२५ साली झाला. श्री. तात्यासाहेब केतकर महाराज (मालाड) हे महाराजांचे सच्छिष्य विशिष्ट पेटीपुढे बसत, अक्षरांवरून हात फिरवित आणि प्रत्यक्ष महाराज त्यांच्या माध्यमाने बोलत. या वेळी भक्तमंडळी सभोवार बसलेली असे. महाराज जो उपदेश करीत त्याची टिपणे त्यापैकी अनेकांनी करून घेतली. श्री. तात्यासाहेब महाराजांनी १९६७ मध्ये देह ठेवला. तेव्हा या ४२ वर्षांच्या दुसऱ्या अवताराची समाप्ती झाली. या अवताराबद्दल महाराजांच्या कोणाही भक्ताला शंका नव्हती व नाही. प्रस्तुत प्रवचन-खंडासाठी जी सामग्री किंवा महाराजांचे जे विचारधन उपलब्ध झाले ते या दुसऱ्या अवतारातीलच होय. विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे ग्रंथाचे संपादक आणि प्रवचनांचे संग्राहक श्री. गो. सी. गोखले यांची सर्व हस्तलिखिते तात्यासाहेबांनी स्वतः वाचली होती. योग्य त्या सूचनाही केल्या होत्या. त्यांच्या हस्तेच मुंबईला मालाड येथे ग्रंथाचे प्रकाशनही झाले होते. त्यामुळे ग्रंथाला मोठा अधिकृतपणा सहजच प्राप्त झाला आहे. श्री. गो. सी. गोखले यांच्याशी माझा व्यक्तिगत स्नेह असल्यामुळे ही सारी पूर्वपीठिका त्यांच्याकडून ऐकता आली.

## वाचकांची साक्ष

महाराजांच्या प्रवचनांचे हे पुस्तक गेल्या ३०-३२ वर्षांत अक्षरशः लक्षावधी लोकांच्या वाचनात आले. या वाचकांत कॉलेज विद्यार्थ्यांपासून वृद्धांपर्यंत समाजाच्या सर्व थरांतील, विविध संप्रदायातील, आस्तिक आणि नास्तिक, देशातील आणि परदेशातील, विविध प्रांतांचे आणि भाषांचे लोक आहेत. कारण या ग्रंथाचे हिन्दी, गुजराती, कानडी, इंग्रजी, फ्रेंच इत्यादी भाषांत अनुवाद झाले आहेत. या वाचकांपैकी शेकडो लोकांनी प्रवचनांविषयीच्या त्यांच्या भावना संपादकांना कळविण्याचे कष्ट घेतले आहेत. या पत्रसंभारावरून ध्यानात येते की, वाचकांच्या जीवनावर परिणाम करणारा, त्यांच्या जीवनात एक आंतरिक परिवर्तन घडवून आणणारा, असा हा ग्रंथ ठरला आहे. वानगीदाखल पत्रातील काही वाक्ये पुढीलप्रमाणे –

'... थोडक्यात तुम्हाला येवढेच सांगेन की, माझा संसार उध्वस्त होणार होता, तो सावरला गेला आहे. आपण हे पुस्तक छापून अतिशय बहुमोल असे कार्य केले आहे. या पुस्तकाच्या वाचनामुळे माझ्या यजमानांच्या स्वभावात अतिशय फरक पडला आहे. हे पुस्तक वाचल्यानंतर लोकांच्या मनात देवाविषयी आदर, भावना, प्रेम आणि सत्य बाणले जाते असे मला मनोमन वाटते.'

'प्रपंचात मन कधी कधी अस्वस्थ होते. अनेक प्रश्न सुटतच नाहीत. फार त्रास झाला म्हणजे महाराजांचे प्रवचनांचे पुस्तक घेऊन वाचत बसते. कोणतेही पान काढून वाचते. सर्वच पाने अमृताने भरलेली आहेत, असे वाटते.'

'सामान्य प्रापंचिक माणसाची दुःखे आणि त्यातून सुटण्याचा मार्ग यांचा, त्याची कुवत आणि मर्यादा लक्षात घेऊन, इतक्या सुलभपणे कोणी विचार केल्याचे मला आढळले नव्हते... आता मी माझ्या पूर्वायुष्याबद्दल खंत करीत न बसता पश्चात्तापामुळे श्रीमहाराजांनी मला पदरात घेतले आहे अशा विश्वासाने माझे नामस्मरण आणि अनुसंधान चालू आहे. 'प्रवचने' या पुस्तकाने माझा उद्धार झाला आहे हे निश्चित.'

या व या स्वरूपाच्या अनेक अनुभवांतूनच प्रस्तुत प्रवचन-खंडाची जबरदस्त परिणामकारकता सहज ध्यानात येण्यासारखी आहे.

## अनुभवाचे बोल

मला असे वाटते की प्रवचनांच्या या पुस्तकाला हे जे विलक्षण सामर्थ्य प्राप्त झाले आहे, ते श्रीब्रह्मचैतन्य महाराजांच्या व्यक्तिमत्त्वातील अनेकविध असामान्य गुणांमुळेच होय. पहिली गोष्ट म्हणजे त्यांच्या प्रवचनातील प्रत्येक शब्द अनुभवाचा आहे. शांती असो, समाधान असो, रामावरील किंवा मानवमात्रावरील उत्कट प्रेम असो, तितिक्षा असो, अन्नदान असो, गोरक्षण असो वा रुग्णसेवा असो, अशी एकही गोष्ट नाही की, जी महाराजांच्या अनुभवाच्या मुशीतून निघालेली नाही किंवा जी महाराजांच्या नित्य जीवनाचा सहज भाग बनलेली नाही. म्हणून त्यांच्या उपदेशपर शब्दांत मनावर परिणाम करायची अद्‌भुत शक्ती वाचकांच्या प्रत्ययास येते. रामावर आणि नामावर महाराज शंभर टक्के श्रद्धा ठेवावयास सांगतात. पण तत्पूर्वी त्यांनी आपले स्वतःचे संपूर्ण जीवन नामाच्या व रामाच्या प्रेमाने भरून टाकले होते. प्रपंचाचे कोणतेही ओझे स्वतःच्या डोक्यावर उरू दिले नव्हते. सारा प्रपंचच त्यांनी रामाचा करून टाकला होता.

बोलण्यासारिखे चालणे । स्वये करूनि बोलणे ।
तयाची वचने प्रमाणे । भाविती जनी ॥

ही समर्थांची ओवी महाराजांच्या जीवनाला आणि प्रवचनांना तंतोतंत लागू पडते.

## साधी, सोपी शैली.

महाराजांच्या या प्रवचनांची अनेक वैशिष्ट्ये ती वाचणाराच्या दृष्टीत ताबडतोब भरल्याविना रहात नाहीत. त्यापैकी पहिले सहज जाणवणारे वैशिष्ट्य म्हणजे त्यांची साधी, सोपी आणि अडाण्यातील अडाण्यालाही समजेल अशी घरगुती भाषा. दि. ५ जूनच्या प्रवचनातील पुढील काही वाक्ये पाहिली तरी ही गोष्ट प्रत्ययास येईल -

'एखाद्याला बायको नसली म्हणजे तो विरक्त आणि असली तर आसक्त, असे म्हणता येणार नाही. बायको असून लंपट नसेल तो विरक्त.'

'पक्ष्यांची पिले त्यांच्या पंखाखाली वाढतात, त्याप्रमाणे घरातल्या माणसांना आपण प्रेमाच्या आश्रयात ठेवावे.'

परमार्थासारखा एरवी लोकांना गूढ आणि अवघड वाटणारा विषय पराकाष्ठेचा सोपा करून सांगावा तर श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनीच. मानवी स्वभावाचे, विचार करण्याच्या पद्धतीचे जे आकलन महाराजांना झाले होते, त्यातून त्यांना अनेक उदाहरणे सहज स्फुरली आहेत. ते ग्रामीण भागातील शेतकरी बांधवांत पुष्कळ वावरत. या लोकांना परोपकार समजावताना महाराजांनी घेतलेले उदाहरण पहा - 'एखादे शेत खोलात असले तर त्यात पाणी इतके साचते की ते जर बाहेर काढून लावले नाही तर सगळे पीक कुजते. बंधारा फोडून पाणी बाहेर घालविले म्हणजे आपल्या शेतातील पीक न कुजता उत्तम वाढते आणि सोडलेले पाणी इतर शेतात पसरून तिथेही पीक काढावयाला मदत होते. हे बंधारा फोडून पाणी बाहेर घालविणे म्हणजेच परोपकार होय.' अशी स्थळे या प्रवचनांत जागोजागी आहेत.

## प्रापंचिकांसंबंधी जिव्हाळा

स्वतः अत्यंत विरक्त असतानाही प्रापंचिकाविषयी तिटकारा महाराजांनी कधी दाखविला नाही. उलट प्रापंचिकासंबंधी ते नेहमीच मोठ्या आस्थेने आणि जिव्हाळ्याने बोलले आहेत. त्यांच्या अडचणींची, कुचंबणेची, सुखांची आणि दुःखांची मोठ्या आत्मीयतेने दखल त्यांनी घेतली आहे. त्यांना मदतीचा हात वारंवार पुढे केला आहे. पण अखेर आग्रह एकच धरला आहे की, नुसताच प्रपंच करू नका. तो रामाचा म्हणा व रामाचे नाम जपा. त्यांची समजावयाची शैली पहा -

'ते वैराग्य, त्याग वगैरेच्या भानगडीत तुम्ही पडू नका. भगवंत ठेवील त्या परिस्थितीत समाधानाने राहणे यापरते वैराग्य दुसरे कोणतेही नाही.'

'प्रपंचाच्या अधीन होणे हे पाप आहे. प्रपंच करणे हे पाप नाही. स्वार्थाने कर्म करणे याचे नाव प्रपंच आणि निःस्वार्थपणाने करणे याचे नांव परमार्थ.'

'रामाची भक्ती केल्याने आपला संसार आपली कल्पनाही होणार नाही, इतका सुखाचा होईल.' या उपदेशाचा अव्हेर कोणता प्रापंचिक करील बरे ?

महाराजांनी जाणले होते की प्रापंचिक अशांत राहतो, नाना गोष्टींची काळजी करीत बसतो, प्रपंचातील उणीवांनी खंतावतो. त्यांच्या प्रवचनात यावर एकच तोडगा त्यांनी वारंवार सांगितला आहे आणि तो म्हणजे, 'कर्तेपण' स्वतःकडे न घेता रामाकडे देण्याचा. राम कर्ता म्हटल्यावर अर्थातच आपली वेगळी अशी इच्छा उरत नाही. राम आपल्या कल्याणाचे तेच करणार या श्रद्धेने माणूस सर्व प्रकारच्या परिस्थितीत शांत व समाधानी राहातो. रामाने ज्या परिस्थितीत ठेवले ती परिस्थिती आनंदाने स्वीकारतो. कर्तेपण घेऊन माणूस काळजी करू लागला म्हणजे तिला अंतच राहात नाही. हे महाराजांनी प्रपंचातीलच साधी साधी उदाहरणे घेऊन श्रोत्यांच्या मनावर बिंबविले आहे. हे काळजीमुक्त जीवनाचे चित्र माणसाला नामाकडे आकृष्ट करून घेते. विपरीत परिस्थितीतही महाराज निश्चिंत का राहू शकत असत, याचे रहस्य उलगडल्यासारखे त्याला वाटते. 'काळाच्या स्वाधीन करते ती काळजी' हे महाराजांचे सूत्रमय सांगणे नितांत खोलवर रुजते.

## मोठाच चमत्कार !

महाराजांची या ग्रंथातील ३६५ प्रवचने मी प्रथम वाचली तेव्हा माझ्या मनाला जे जाणवले, ते अनेक वाचकांच्याही मनाला जाणवले

असल्याचा संभव आहे. विचार आला तो असा की, अरे या सगळ्या प्रवचनांचे मध्यवर्ती सूत्र एक आणि केवळ एकच आहे. ते म्हणजे लोकांना नाम घेण्यास प्रवृत्त करून त्यांच्या जीवनात परिवर्तन घडवून आणणे. पण विषय एकच असला तरी प्रत्येक प्रवचन वेगळे आहे, रसरशीत आहे. नाममाहात्म्याची वेगळी छटा प्रकट करणारे आहे. प्रत्येक प्रवचनात लोककल्याणाची विलक्षण तळमळ प्रकट झाली आहे व नाम का घ्यावे यासाठी नवनवीन युक्तिवाद आहे. हा युक्तिवादही प्रपंचातील नित्य अनुभवांच्या आधारे आहे व सहज हृदयाला भिडणारा आहे. महाराज म्हणत असत की, माणसाने 'तर्कटी' बनू नये ! विद्वानांपेक्षा व श्रीमंतापेक्षा अडाणी व गरीब मला अधिक आवडतात, असेही महाराज सांगत. समाजात असेच लोक अधिक प्रमाणात असतात. त्यांच्यात महाराज समरसतेने वावरले आणि त्यांना सुखी करण्यासाठी झिजले. नामधारकांना महाराजांनी जी आश्वासने दिली आहेत ती तेच एक देऊ जाणोत. त्यांचे एकही आश्वासन खोटे ठरलेले नाही हे तर भक्तांनी अनुभवलेच आहे. एकाच विषयांवरील ३६५ प्रवचनांचा हा ताजेपणा आणि त्यांची हृदयस्पर्शिता म्हणजे एक चमत्कारच वाटतो.

## पारदर्शक प्रतिपादन

या प्रवचनांचा आणखी एक विशेष म्हणजे ती सोपी खरी; पण साराच्या सारा वेदांत त्यात सामावलेला आहे. वेदांत तत्त्वज्ञानाची जड परिभाषा महाराजांनी वापरली नाही, पण नामाचे बोट धरून अंतिम 'ब्राह्मी' अवस्थेला माणूस कसा पोहोचू शकतो, हे मात्र त्यांनी उत्तम प्रकारे विशद केले आहे. त्यांचे सारे प्रतिपादनच मोठे उत्कट, निर्मळ आणि पारदर्शक आहे. अशा प्रतिपादनाचा एक नमुना सादर करण्याचा मोह मला आवरत नाही. दि. २५ ऑक्टोबरच्या प्रवचनात ते प्रापंचिक मागण्या करणाऱ्या भक्तांना समजावतात,

'माझ्याकडे इतकेजण येतात पण एकाने तरी 'मला रामाची प्राप्ती करून द्या' म्हणून विचारले का ? मी आलो आहे तो काय तुमचे विषय पुरवण्यासाठी ? समजा एकजण चोरी करायला निघाला आहे आणि वाटेत त्याला मारुतीचे देऊळ लागले. तिथे जाऊन त्याने मारुतीला नवस केला की, मला जर आज चोरीत यश मिळाले तर तुझ्या देवळावर मी सोन्याचा कळस चढवीन. तर आता सांगा मारुतीने काय द्यावे ? त्याने त्याच्या नवसाला पावावे का ? जर नाही तर तुम्ही विषय मागितले आणि मी दिले नाहीत, तर मला दोष का देता ? आपल्याला नवस करायचा असेल तर असा करावा की, 'मला तू ज्या स्थितीत ठेवशील त्या स्थितीत आनंद म्हणजे समाधान राहावे आणि दुसरे काही मागण्याची इच्छाच होऊ नये.'

## सूत्ररूप बोध

या प्रवचनासंबंधी जेवढे लिहावे तेवढे थोडेच. म्हणून अधिक विचार न करता महाराजांच्या शैलीची थोडीशी कल्पना येण्यासाठी त्यांची काही सूत्ररूप वचने पुढे ठेवतो :

'प्रपंचातील अहंकार दूर झाला की तो परमार्थच.'

'नामात दंग होऊन स्वतःला विसरा, मग राम तुमच्यापुढेच उभा आहे.'

'प्रपंचात आनंद शोधावा, रडत राहू नये.'

'माझ्याकडे येणाऱ्या माणसाला माहेरी आल्याप्रमाणे वाटले पाहिजे. तो जाताना त्याच्या डोळ्यात पाणी आले पाहिजे.'

'जगाचा नाद सोडा, भगवंताचे प्रेम जोडा.'

'माझ्यातले प्रेम काढा, तर 'मी' नाहीच.'

'भगवंताच्या दास्यात जे प्रेम आहे, ते जगाच्या मालकीत नाही.'

'मन मारायचे नाही, ते भगवंताकडे लावायचे.'

'काळजी घ्या, पण काळजी करू नका.'

एवढी उदाहरणे पुरेत. हा लेखनप्रपंच अशासाठी की ज्यांनी हा अपूर्व ग्रंथ अद्याप पाहिला नसेल, त्यांनी तो हाती घ्यावा आणि रोज त्या त्या तारखेचे प्रवचन श्रद्धापूर्वक वाचावे. एका आगळ्याच आनंदाची जोड जीवनात करून घ्यावी.

## पू. बाबांची प्रस्तावना

शेवटी एक उल्लेख जरूर करावयास पाहिजे. या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीला प्रस्तावना पू. बाबा बेलसरे यांनी लिहिली होती. ती मध्यंतरीच्या अनेक आवृत्त्यांत समाविष्ट नव्हती. पू. बाबांनी नंतर लिहिलेली दुसरी प्रस्तावनाच छापली जात होती. पण आता जी अठरावी आवृत्ती नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. तीत दोन्ही प्रस्तावना आहेत. १९६६ सालच्या प्रस्तावनेत पू. बाबांनी महाराजांच्या उपदेशाचे सार जे सांगितले आहे, ते उद्धृत करून मी लेख पुरा करतो.

'देहपूजेला जीवनसर्वस्व मानणाऱ्या विसाव्या शतकातील सुशिक्षितांना आत्मज्ञानाच्या भूमिकेवर उचलून उभे करण्याचा प्रचंड खटाटोप महाराजांनी जन्मभर केला. मानवी देहाला जीवनात मोठे महत्त्व आहे. पण ते भगवंताचे साधन म्हणून आहे, ही दृष्टी ठेवून देहाला चांगले खायला-प्यायला घालावे, त्याला सुखोपभोग द्यावे, त्याला बलवान ठेवावे. पण केवळ तेवढेच करण्यासाठी जगणे म्हणजे भगवंताला विसरून जगणे हे पाप आहे, असे महाराजांचे सांगणे आहे.'

चं. प. भिशीकर
९१७/१२, गणेशवाडी, पुणे ४११ ००४.

- **माणसे नेहमी अंधश्रद्धेबद्दल ओरडतात. परंतु खरे म्हणजे आपण श्रद्धा नसल्यामुळे आंधळे झालो आहोत. आपण परमेश्वराची पूजा-अर्चा करतो पण त्याच्या अस्तित्वाबद्दल जरासुद्धा खात्री वाटत नाही. परंतु ज्या भुतांचे अस्तित्व आपण मानीत नाही त्यांची भीति मात्र वाटते.**

# श्रीमहाराजांच्या वेळचा पत्रव्यवहार

**श्री. गो. सी. गोखले**

*ए. टी. आय. (मँचेस्टर), ए. एम. बी. आय. एम. (लंडन) चार्टर्ड टेक्स्टाईल टेक्नॉलॉजीस्ट युनायटेड नेशन्स टेक्स्टाईल एक्सपर्ट. ३६ वर्षे टेक्सटाईल इंडस्ट्रीजमध्ये नोकरी. जनरल मॅनेजर म्हणून निवृत्त. 'श्रीमहाराजांची प्रवचने' पुस्तकाचे संपादक. ज्ञानसागरातील शिंपले ५ भाग. महाराष्ट्र सरकार पुरस्कार. प. पू. श्री. तात्यासाहेब केतकर यांचा लहानपणापासून सहवास.*

गोंदवले संस्थानने गेल्या दशकात जवळ जवळ ७/८ स्मरणिका काही निमित्ताने प्रकाशित केल्या. त्या वेळी स्मरणिकेत श्रीमहाराजांच्या थोड्या पत्रांचा समावेश करण्यात आला होता. संपादनाच्या निमित्ताने श्रींचा व त्यावेळच्या श्रींच्या ज्येष्ठ मंडळींचा पत्रव्यवहार अवलोकन करायला मिळाला. यातील बरीचशी पत्रे मोडी लिपीतील आहेत. विशेष नमूद करण्याची गोष्ट म्हणजे या सर्व मोडी पत्रांचे देवनागरीत रूपांतर श्रींचे एक ज्येष्ठ व्यासंगी भक्त श्री. आप्पासाहेब मराठे यांनी केलेले आहे. दुर्दैवाने श्री. आप्पासाहेबांचे जानेवारी १९९७ मध्ये ८८ व्या वर्षी निधन झाले. त्या आधी त्यांनी ही सर्व पत्रांची फाईल माझ्या स्वाधीन केली होती. म्हणूनच या पत्रांच्या संकलनाचा हा योग जुळून आला. हे सर्व श्रीमहाराजांच्या इच्छेनेच होऊ शकले असे मला वाटते. याशिवाय श्रींच्या वेळचे श्री. बापूसाहेब साठे यांचे नातू श्री. रा. य. ऊर्फ किसनराव साठे यांनी आपल्याजवळची सर्व जुनी पत्रे मोठ्या प्रेमाने दिली. तसेच श्रींच्या काही भक्तमंडळींनी आपण होऊन आपल्याजवळची पत्रे आणून दिली. यामुळेच हा पत्रांचा संग्रह होऊ शकला. श्रीगोंदवले संस्थान, श्री. किसनराव साठे व इतर अनेक भक्तमंडळींचा मी अत्यंत ऋणी आहे.

## पत्रांचे वर्गीकरण

श्रीमहाराजांच्या पत्रव्यवहाराचे दोन विभाग करता येतील. एक म्हणजे श्री देहात असताना झालेला पत्रव्यवहार व दुसरा श्रींच्या आविष्कारात म्हणजे श्री. तात्यासाहेब केतकर यांच्या वाणीद्वारे १९२५ ते १९६७ सालापर्यंत झालेला पत्रव्यवहार. वरीलपैकी पहिल्या विभागात जवळ जवळ नव्वदएक पत्रे उपलब्ध झाली. ही सर्व पत्रे १९०० ते १९१३ पर्यंतच्या कालावधीतील आहेत. यातील बरीचशी पत्रे मोडीतील आहेत. यामध्ये श्रींनी स्वतः लिहिलेली अथवा लिहिण्यास सांगितलेली अशी पस्तीस पत्रे आहेत. बाकीची पत्रे श्रींच्या त्या वेळच्या ज्येष्ठ भक्तमंडळींनी आपापसात धाडलेली आहेत. या पत्रांमध्ये श्रींच्यासंबंधी अनेक उल्लेख आहेत. ही सर्व पत्रे मौल्यवान तर आहेतच पण त्या पत्रांवरून तत्कालीन परिस्थिती, भाषा, श्रींविषयी असणारा आदरभाव व प्रेम, आपापसातील प्रापंचिक संबंध इ. अनेक गोष्टींचा बोध होऊ शकतो. दुसऱ्या विभागातील म्हणजे श्रींच्या आविष्कारातील पत्रे बहुतांशी पद्य स्वरूपात असून अक्षरशः शेकडो भक्तांना कारणपरत्वाने लिहिलेली आहेत. ही सर्व पत्रे देवनागरीतीलच आहेत. या सर्व पत्रांचा संग्रह करून परामर्श घ्यायचा म्हणजे एक छोटे पुस्तकच तयार होईल. म्हणून या लेखात फक्त पहिल्या विभागातील म्हणजे १९०० ते १९१३ या कालखंडातील पत्रांचाच परामर्श घेतला आहे. जागेपरत्वे मोजकी, महत्त्वाचीच पत्रे मोडीतून देवनागरीत लिहून जशीच्या तशी देण्याचा प्रयत्न केला आहे. श्रीमहाराजांनी श्रीब्रह्मानंद, डॉ. कूर्तकोटी, (श्रीमत् शंकराचार्य), श्री. बापूसाहेब साठे यांनाच बहुतेक सर्व पत्रे लिहिलेली आहेत. ही सर्व पत्रे येथे उद्धृत करणे केवळ अशक्य आहे. म्हणून श्रींनी प्रत्येकाला लिहिलेली २/२ पत्रेच येथे देत आहे. सर्व पत्रे अत्यंत चिंतनीय अशीच आहेत.

श्रींनी श्रीब्रह्मानंदांना लिहिलेली दोन पत्रे : ही दोन्ही पत्रे इंदूरहून देवनागरीत लिहिली असून इ. स. १९०० च्या एप्रिल महिन्यातील असावीत असे त्या पत्रातील मजकुरांच्या संदर्भावरून वाटते.

### पत्र क्रमांक १

॥ श्रीराम समर्थ ॥

श्रीरामभक्त परायण ब्रह्मानंद यासी ब्रह्मचैतन्य बुवा मु. इंदूर यांचा अनेक आसीर्वाद पत्र लिहिणेचे कारण आपण तेरा कोटी जपाबद्दल मजकूर अप्पासाहेब (भडगांवकर) यांच्यामार्फत कळला. तरी लिहिल्याप्रमाणे हरीपूर येथे करण्याला सुरुवात अवश्य व्हावी जरुर जरुर जरुर. मी कासीहून परत हरदेमुकामी येऊन तेथे रामनवमीला श्रीरामाची स्थापना केली व आता नैमिषारण्याला जाण्याचा विचार आहे. आपल्यास कळावे आणि ज्या ठिकाणी तेरा कोटीची सोय असेल त्या ठिकाणी करावा. कृष्णातीरी बरे आहे परंतु आता दिवसेंदिवस घोर कली असल्यामुळे चांगले सत्कर्म कोणतेही सेवटास जावू देण्याबद्दल कळीचा दुराग्रहा आहे. तर त्याचा प्रयत्न न चालण्याचा उपाय तपोबल पाहिजे. शब्दज्ञान व जगाचे महत्त्व व निंदा हे दोन्हीही उपयोगाचे नाही. तू तर तशाचा सहवास करू नये. नास्तिक कुर्तकासी वाद न करिता अहंमानारहित व्यवहाराचा संबंध न ठेविता अक्रोध, निर्लोभ, चित्तांत वृत्ती लीन करून उपासनेरूप जग पाहावे. अखंड नाम स्वतः घ्यावे हे आपले कर्तव्य आहे. मी आपणास काय लिहावे असे नाही पण सूचनार्थ लिहिले आहे. दुसरे असे मन चित्तवृत्ती बाह्य नामस्मरण झाल्यावाचून साधनात आळस करू नये. तसेच स्त्रियाचे मुख अवलोकन, शब्द, स्पर्श, भाषण, ममत्व अगत्य परमार्थ हे कधी सत्य मानू नये व त्याचे वारे कधी लागू देवू नये असे तेरा कोटी जप होसतोपर्यंत करावे. माझी विनंती आहे कारण काळ भयंकर आहे तर माझ्या चालीने चालू नका. माझे वेळ काळ कारण वेगळे आहे तथापि मी अन्य अवस्थेत राहणार अथवा देह सोडणार कारण आता पुढे धर्म, दया, शांती,

भक्ती, नीती कोठे आढळणार नाहीत. सबब संभाळून वागा वागा वागा. रामनामी अखंड जागा जागा जागा. हा आसीर्वाद.

## पत्र क्रमांक २

॥ श्रीरामसमर्थ ॥

श्रीरामभक्त परायण सर्व उपमायोग्य राजमान्य राजेश्री ब्रह्मानंदबुवा मु. तेरदाळ यासी - अनेक आसीरवाद विशेष लिहिण्याचे. कारण तुमचे पत्र पोचले जपाचे सुरवातीबद्दल फार आनंद जाहला. असाच अखंड जप व रामाची सेवा करत असावे. विलासपूरवालेस इकडे येऊन जाणेस कळवावे. माझी प्रकृती बरी आहे. फक्त थोडासा श्वास मधून मधून होतो. हवा बरी आहे. समक्ष भेटीअंती खुलासा होईल. पत्री लिहिता येणार नाही कारण पुष्कळ लिहावे लागेल. सोडुनी कोदकाम लोभ मोहो सर्व आभीमान स्वआनंदांत करावे चींतन हेच आयकावे वचन तुम्ही माझे जीवाचे जीवप्राण शेवटची सांगीतली खूण कळावे हा आसीरवाद. ब्रह्मचैतन्य

सर्वत्र जप करणार मंडळीस माझा फार फार आशीर्वाद सांगावा. ब्रह्मचैतन्य

(पत्राच्या खाली श्रीमहाराज पुन्हा लिहितात)

श्रीसमर्थ

१. पोटापुरता उद्योग करणे. २. बायका-मुलांचे रक्षण करणे. ३. नौकरी अगर व्यापार करणे. ४. लोकनिंदा सहन करणे वगैरे ज्या गोष्टी आपण दहिवडीचे वाटेत सांगितल्या त्या मला सिरसावंद्य आहेत. लोकनिंदेची काळजी न करिता स्वतः वागणूक अंतरापासून चांगली ठेवून श्रीसमर्थचरणी दृढ विश्वास धरून आपले हातून साधेल तितका व्यवहार लौकिक सांभाळून कुटुंबपोषणाकरिता उद्योग करणे हे देहाचे कर्तव्यकर्म आहे. परंतु तो उद्योग असा केला पाहिजे की तो करीत असताना हृदयामध्ये श्रीरामचिंतन व श्रीसद्‌गुरुस्वरूप याचा विसर न पडला पाहिजे व त्या उद्योगापासून होणारा नफा अगर नुकसान याबद्दल अंतरास आनंद अगर शोकाचा धक्का न लागला पाहिजे व बाह्य व्यावहारिक मनुष्याप्रमाणे असावे असे माझे अल्पबुद्धीस वाटते.

(वरील दोन्ही पत्रे अत्यंत मननीय आहेत. आपल्या अत्यंत जीवाभावाच्या शिष्याला हा उपदेश आहे. तसेच या शिष्याची योग्यताही श्री पूर्णपणे जाणून आहेत. खरं म्हणजे या दोन्ही पत्रांचे आपण सर्वांनी चिंतन करायला पाहिजे.)

श्रीमहाराजांनी डॉ. कूर्तकोटी (महाभागवत असे श्री त्यांना प्रेमाने म्हणत असत) यांना लिहिलेली दोन पत्रे :

## पत्र क्रमांक १

हरदा पौष कृ. १, सोमवार १८२९ (१९०७)

श्रीराम

श्रीरामभक्त परायण रा. रा. महाभागवत यांस,

ब्रह्मचैतन्य बोवा यांजकडून मुक्काम हर्दा, आशीर्वाद. विशेष लिहिण्याचे कारण तुमचे पत्र आले. मजकूर समजला. इकडील मजकूर. मी ग्रहणाकरिता श्रीक्षेत्र काशी अथवा श्रीक्षेत्र कुरुक्षेत्रास जाणार होतो परंतु श्रीक्षेत्र काशी, प्रयाग, जबलपूर हिकडे प्लेग जागोजाग फार झाला व थंडीही फार पडली आहे. सबब मंडळीस घेऊन जाण्याचा बेत रद्द केला आहे. आपल्यास कळावे. यापुढे विचार झाल्यास तार करीन. तुमचे वडिलांची खुशाली कळवावी. तब्येत कशी आहे. तुमचा पत्ता भाऊसाहेबांकडे कळवावा. प्रकृतीस फार जपत जावे. सदा वृत्ती सुप्रसन्न ठेऊन अखंड रामचिंतन करीत जावे. सर्वांचे समाधान ठेवावे. जनमन आवरून व त्यास ठेऊनि राजी श्रीरामचिंतन करावे अंतर्यामी.

कळावे हा आशीर्वाद.

ताजाकलम : तुम्हास संकट न पडता वागावे. मर्जीस वाटले तरी इकडे यावे. परंतु इकडे रोग फार असून लोक हवालदील आहेत. सबब तुम्ही अक्षय चिंतन करावे म्हणजे सर्व पर्वकाळ काळाचे काळ व्यथा न जाय वेळ त्याचेच नाव पर्वकाळ. जर इतक्यावर येण्याची इच्छा असेल तर भाऊसाहेब यास लिहून कळवावे म्हणजे मी परत उत्तर पाठवीन त्याप्रमाणे करावे. तुमचे वडिलांस, सौ. मातुश्रीस व लहान-थोर मंडळींस सर्वत्रास आशीर्वाद सांगावा. ब्रह्मानंद बोवा कोठे आहेत तो मजकूर कळवावा. कळावे हे आशीर्वाद

ब्रह्मचैतन्य (सही मोडीत)

दस्तुर खुर्द

## पत्र क्रमांक २

श्रीरामभक्त परायण सर्व उपमायोग्य रा. रा. भागवत यांस ब्रह्मचैतन्य महाराज यांजकडून आशीर्वाद. पत्र लिहिण्यास कारण की आपल्या तिथे सर्वत्र मंडळी घेऊन रामनवमीचा उत्छाह कथा कीर्तन, पुराण, अध्यात्म रामायण, दासबोध, माळ नित्य व सप्ता व नित्यनेम याप्रमाणे चालवावे. सुज्ञाप्रती ज्यास्त काय लिहिणे. हा आशीर्वाद. तमन्ना, व्यंकटराव, मार्तंड गौडा सर्वत्र लहान-थोर मंडळीस आशीर्वाद सांगावा.

ब्रह्मचैतन्य (सही मोडीत)

पू. श्रीशंकराचार्य यांना श्रीमहाराजांनी लिहिलेले पत्र

पत्रारंभी लिहिलेला मायना त्या वेळच्या संबोधनाच्या पद्धतीनुसार श्रींनी लिहिला आहे. पत्र पौष शु. ३ शके १८३४ (इ. स. १९१२) रोजी लिहिलेले आहे. ते जसेच्या तसे खाली उद्‌धृत केले आहे :

श्रीरामसमर्थ

स्वस्तिश्रीमत्समस्तसुरवृंदपूजितपादरविंद शिवप्रतिबिंबवर्य श्रीमत्‌परमहंसपरिव्राजकाचार्य पदवाक्यप्रमाणपारावारपारीण यमनियमासन प्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठान निष्ठ तपश्चक्रवर्त्यनाद्यनिच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्‌दर्शनसंस्थापनाचार्य व्याख्यानसिंहासनाधीश्वर सकलनिगमानिगमसारहृदयसांख्यत्रयप्रति पादक सकलनास्तिकमतोच्छेदपूर्वकसकलधर्मसंस्थापनैकधुरीण वैदिकमार्गप्रवर्तक सर्वतंत्रस्वतंत्र श्रीमहाराजधानीऋष्यश्रृंगवराधीश श्रीमद्राजाधिराज गुरुमंडळाचार्य श्रीमच्छंकराचार्यान्वय संजाताभिनव पंचगंगातीरवास कमलानिकेतन करवीरसिंहासनाधीश्वर श्रीसच्चिदानंद विद्यानृसिंहभारती करकमळकिंजल्कोद्‌भव श्रीमदभिनव सच्चिदानंद

विद्याशंकरभारतीस्वामीकृतानि श्रीमान् सपरिवारच्छात्राणामनुदिन मेघमानभव्यजनकानि श्रीमच्छंकराराधनावसरीयनारायणस्मरणानि

चरणशेवेसी.

श्रीब्रह्मचैतन्य रामदासी गोंदवलेकर यांचा त्रिकालचरणी मस्तक ठेऊन सीरसाष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना.

विशेष लिहिण्याचे कारण आपली प्रकृति बरी असल्याबद्दल कळवून दासाचा समाचार घेत जावा. दुसरे मी असे ऐकिले की कोणी अपमाना सारिखी वर्तणूक केली हे जर खरे असेल तर मंडळीने असे न वागण्याबद्दल सावधपणा का नाही केला, असो. आता आपण बापूसाहेब खरे पेनशली मामलेदार त्यास हुकूम करून ते काम जरूर लौकर करून घ्यावे अशी माझी प्रार्थना आहे. मर्जीनरूप व्यवस्था करावी. बापूसाहेब तूर्त गोंदवले येथे आहेत आणि त्यांनी सांगितले आहे की श्रीमज्जगद्गुरुस्वामी महाराज यांजकडून आज्ञापत्र आल्याबरोबर मी चरणाजवळ नाखरे यास घेऊन येतो आणि आज्ञेप्रमाणे करितो असे आहे, त्यास आज्ञापत्र पाठविणे

ब्रह्मचैतन्य.

श्रींनी श्री. बापूसाहेब साठे यांना लिहिलेली तीन पत्रे :

श्रीमहाराजांनी श्री. बापूसाहेब साठे यांना लिहिलेल्या अनेक पत्रांपैकी पस्तीसएक पत्रे उपलब्ध आहेत. ही सर्व पत्रे मोडी लिपितीलच आहेत. श्रीबापूसाहेब साठे हे श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनी नियुक्त केलेल्या पहिल्या विश्वस्तातील एक होते. दहिवडीच्या कोर्टात जज्ज म्हणून बदली झाल्यावर त्यांची व श्रींची गोंदवल्यास भेट झाली व ते अखेरपर्यंत श्रींचे होऊन राहिले. त्यांनी आपला शेवटचा श्वास नामस्मरणात हरदा येथे सोडला. श्रीमहाराजांनी आपले इच्छापत्र श्री. बापूसाहेबांकडून करून घेतले. १९२० साली समाधीवरील श्रीगोपालकृष्णाच्या मूर्तीची स्थापना श्री. बापूसाहेबांच्या हस्ते करण्यात आली. १९३४ साली काशीयात्रेहून परत येताना हरदा येथील श्रीराममंदिरात मृत्यूसमयी श्रीमहाराज (श्री. तात्यासाहेब केतकर यांच्या वाणीरूप आविष्कारात) म्हणाले, 'बापूसाहेब, तुम्ही अंतकाळ साधला, आता आनंदाने जावे.' मानेनेच होकार देऊन श्री. बापूसाहेब कायमचे शांत झाले. त्यांच्या राजाराम या एकुलत्या मुलावर श्रींचे फार प्रेम होते. श्रींनी बापूसाहेब यांना लिहिलेल्या तीन मोडी लिपीतील पत्रांचे देवनागरीत केलेले रूपांतर खाली दिले आहे.

## पत्रक्रमांक १

श्रीरामभक्त परायण अखंड आसू कल्याण. संतति, संपत्ती, आरोग्य राहू प्रकृति सदा घडो रामभक्ती आयसे वांछित आहे मन. कृपा करू ज्यानकी जीवण राजमान्य राजश्री बापूसो यासी आसीर्वाद. विशेष लिहिणे याचे कारण वेळकाळ फार कठीण. निरंतर करावे श्रीराम चिंतण. आंतरी आसावे समाधाण, आंतःकर्णी दयाशांति सुखदुःख माणअपमाण समसमाण भाय (बाह्य) वेव्हार लौकिक आबरू करावी जतण, बायकामुले यांचे आप्तगोत सके सजन, सत्य करावे रक्षण, वळकून ठेवावे सजेण दुर्जण, निरामय निर्भय असावे. नाही भय नाही लय आयसा माझा धणी आहे. हाचि माणुनी भरवसा, दृढ विश्वास नामस्मरण करावे. स्वासुस्वास प्लेगापासून दूर असावे. विचार पाहून वागावे. खुशालीचे पत्र वरचेवर लिहावे. भाऊसो केतकर यांचे नावे पाठवावे. माझे पत्र कोणी फाडून पाहतात आयसे अनुभव येतात. पत्रही घाळ (गहाळ) होतात. अस्तु दुसरे माझा विचार निमिस आरणेयात जावे असे वाटते काय होईल ते पाहू इकडे आसपास उंदीर पडतात. दुस्काळाच लक्षणही लोक बोलतात. बाकीमार (मजकूर) तुकाराम मुखणवाणी सांगता कळेल. प्रसाद श्रीफळ पाठविले आहे. कळावे पोचले याचे उत्तर यावे हा आशीर्वाद.

चिरंजीवीत सौ. माईस खण, कुंकु पाठविले आहे. चिरंजीव राजश्री राजाराम यास आशीर्वाद.

## पत्रक्रमांक २

श्रीरामभक्त परायण राजमान्य राजेश्री बापुसो मुक्काम इस्लामपुर यास आसीर्वाद विशेष लेहणेयाचे कारण आपले कार्ड पुणे यास आले त्यात मजकूर प्रकृति बरी नाही असे मला कोणी सांगितले पत्र पाहाणेयास मिळाले नाही तर आपलेया प्रकृतिबद्दल खुलासा लेहून कळवावा रजा मिळणार ती कसी मिळणार आणि किती दिवस मिळणार आणि त्यापासून नोकरीस उणेपण नसेल तर रजा घेणेयास तर काय हरकत आहे ? ज्यामध्ये चित्त प्रसन्न राहील ते करावे उदासीण कधी न राहाता श्रीराम चिंतणाच्या आणदाणी (आनंदाने) काळ उत्तम रीतीने काढावा. विवेक अक्षयी राहावा प्रेमपूर्वक श्रीराम आठवावा वेळकाळ वळकूण सोडावा सुज्ञाप्रति मजकूर फार काय लेहावा हा आसीर्वाद ता. (ताजाकलम) मी पंढरपूरहून निघालो तो पुणेयास जाऊन ग्रहणाकरिता इंद्रायणीतीरास आलो आणि फुडे पुणेयास जाऊन कोरेगावास आलो फुडे कागवाडास जाणार आहे त्यापुढे माजलखेडास जाणार आहे. आन कोणी गोंदवलेकडून कागवाडास जावे असे म्हणतात. रामदासीबाबा कागवाडेस चाल म्हणतात. काय होईल ते पाहावे. फुडे जिकडे जाणे होईल ते कळवीण कळावे हा आसीर्वाद.

चिरंजीवीत सौ. माईस आशीर्वाद चिरंजीव राजेश्री राजाराम यास आसिर्वाद सांगावा चिरंजीव राजेश्री बंकूस आसीर्वाद सांगावा.

## पत्र क्रमांक ३

श्रीराम समर्थ

श्रीरामभक्त परायण राजश्री बापुसो साठे यासी आसीर्वाद विशेष लेहणे याचे कारण आपल्या तिकडे बरेच दिवसापासून प्लेगाचा उपद्रव सुरू आहे असे आइकतो. काल रोजी तुकाराम म्हसवडास गेला. त्याणी सांगितले की हाजार माणुशे गेली. यावरून फार भयंकर प्रसंग आहे. इकडेही लोक दिलहवाल जाहाले आहेत. सर्व गाव गाव प्लेग, कोठे उंदीर पडतात. अनइक (अनेक) प्रकारचा त्रास दुष्काळासारखे हे चिण (चिन्ह) दिसतात. आसू. मी गोंदवले येथेच आजपर्यंत आहे. निमिसआरणे यात अथवा गिरणार पर्वतात जावे असे वाटते. आप्पासो भडगावकर, केतकर मंडळी, सर्व खुशेल आहेत. आपल्याकडून खुशेलीचे वरचेवर पत्र पाठवीत जावे. सूज्ञाप्रत फार काय लेहावे, परंतु परमेश्वराचे स्मरण विसरू नये. समाधान मोडू नये. सत्यअसत्य समजल्याशिवाय राहू नये. मणुजय, वासणाक्षय वृत्तिलय वेवहारदक्ष, सत्याचा पक्ष, अवक्षलक्ष आसे होण्याचा यत्न करावा. निर्भय, निष्काम, निर्लोभ, आक्कोद (अक्रोध)

आणंदात असावे, कळावे हा आसीर्वाद.

शरीरास फार जपत जावे. प्लेगाच्या गावात न राहावे. चिरंजीव राजेश्री राजाराम यास आसीर्वाद आभेस चांगला करावा. चिरंजीवीत सौ. माईस आसीर्वाद सांगावे.

## श्रीमहाराजांचा पत्रव्यवहार

संग्रहीत असलेल्या श्रींच्या पस्तीस पत्रांपैकी आठ पत्रे जशीच्या तशी वर दिली आहेत. (श्रीब्रह्मानंदांना दोन, डॉ. कूर्तकोटींना दोन, श्रीमत् शंकाराचार्यांना एक व श्री. बापूसाहेब साठे यांना तीन) या सर्व पत्रांच्या खाली श्रींनी सही केलेली दिसत नाही. कदाचित काही पत्रे श्रींनी कुणाला तरी लिहिण्यास सांगितली असावीत. अनेक पत्रांवर तारीख नाही. श्रीमहाराजांनी श्रीब्रह्मानंद व डॉ. कूर्तकोटी यांना लिहिलेली पत्रे देवनागरीत आहेत. पण सही मोडीत आहे. श्री. बापूसाहेब साठे यांना लिहिलेली बहुतेक सर्व पत्रे मोडीतील आहेत.

याशिवाय इ. स. १९०० ते १९१३ या काळातील संग्रहीत असलेल्या पत्रांपैकी जवळ जवळ निम्मी पत्रे श्रींच्या सहवासातील खास भक्तमंडळी श्री. भाऊसाहेब केतकर व श्री. अण्णासाहेब घाणेकर यांनी एकमेकांना कारणपरत्वे धाडलेली आहेत. ही सर्व पत्रे मोडीतील आहेत. या सर्व पत्रांचा श्रींशी संबंध असल्याने या पत्रांना विशेष महत्त्व आहे. चार निवडक पत्रे मोडीतून देवनागरीत रूपांतर करून खाली देत आहे.

पत्र क्रमांक १. (श्री. भाऊसाहेब केतकर यांनी श्री. अण्णासाहेब घाणेकर यांना पाठविलेले पंत्र)

श्रीराम प्रसन्न

हर्दा राममंदिर ता.. इ.

गुरुवार १।११। १९०६

कृतानेक सा. नमस्कार विनंती विशेष,

पत्र पावले. लगत पेन्शन, बिल पाठविले आहे. रुपये जरूर पाठवावेत. येथे फार खोळंबा आहे. श्रींची स्वारी गेले बुधवारी येथून यकायकी निघून लखनौचे तिकीट घेऊन गाडीत बसली. तेथपर्यंत आज जातील असे आम्हास कोणासही वाटले नव्हते. बरोबर दहा-पाच माणसे गाडीत घुसली. पुढे दहाबारा मैलांवर टेंभुरणी म्हणून स्टेशन आहे. तेथे काही लोकांनी त्यांस उतरून घेतले. ही बातमी येथे आम्हास रात्री दाहा वाजता कळताच दुसरे दिवसी मंदिरातील सर्व मंडळी दर्शनासाठी टेंभुरणीस गेली. स्वारी स्टेशनावर पुढे जाण्याकरिता अगदी तयार होती. परंतु सर्व मंडळी उतरताच गाडी चालू झाली व दर्शन समारंभ सुरू झाला. तिसरा प्रहरी तेथेच गुड्सशेड मध्ये जेवण झाले आणि नंतर पाच वाजता गाडी आली. त्यात स्वारी बसून पुढे चालू झाली आणि आम्ही सर्वजण डोळे पुसीत रात्रीचे गाडीने परत आलो. तेव्हापासून येथे दिवस मोठे कष्टाने जात आहेत. मला मंदिराची व्यवस्था पाहण्यास आज्ञा झाली आहे. हे येकून आपणास आश्चर्य तर वाटेलच परंतु श्रींनी माझी निवडणूक केली तेव्हा त्यात दोष कोण काढणार ? असो मंदिरात जाडे पाहुणे आले आहेत. ते जेवण्याकरिता खोळंबले आहेत. आता पुरे करतो. तुम्हास रजा घेण्याबद्दल आज्ञा झाली आहे. आता उगीच डोके पिकवीत बसू नये. विश्रांती घ्यावी. लांबलचक रजा घेऊन येथे राहण्यास यावे. श्रींची स्वारी लवकर परत येईल असे त्यांचेच बोलण्यावरून वाटते. चि. सौ. सोनूताईस व चि. रा. कृष्णरावजीस आसिरवाद सांगावे व तिची सविस्तर हकिकत काढावी. कळावे.

लोभ करावा हे विनंती

आपला

चिंतामणी केतकर

पत्र क्रमांक २

श्रींची स्वारी परत आल्यावर श्री. भाऊसाहेब केतकर यांनी श्री. अण्णासाहेब घाणेकर यांना पाठविलेले पोस्टकार्डावरील लिहिलेले पत्र.

श्री

हरदा ता. १४।११।१९०६, बुधवार

कृ. साष्टांग नमस्कार वि. वि.

आपले ता. ११ चे पत्र आजच पोचले. श्रींची स्वारी आज पहाटे नैमिषारण्यातून प्रयागकडून कलकत्ता मेलने आली. त्यामुळे जिकडेतिकडे आनंदी आनंद आहे. आता मुक्काम किती दिवस होईल हे कळत नाही. लवकर जाण्याचा बेत आजपासूनच सुरू आहे. पैशाची बरीच अडचण आहे हे कालचे पत्रावरून कळेलच. होईल तितके लवकर पाठविण्याची तजवीज करावी. चि. सौ. सोनूताईस कुड्या किंवा टीका हे तिचे इच्छेप्रमाणे व आपले व आपल्या मातुश्रीच्या मनाप्रमाणे करावे. आपलेच तिला माहेरघर आहे. कळावे लोभ करावा हे विनंति

भाऊ केतकर

पोस्टकार्डावरील पत्ता :

B. N. Ghanekar, (Engr.)

Supervisor P. W. D. Supt. Engrs. Office S. D.

Fort, Belgaum

S. M. C. (Pres. Bombay)

पत्रक्रमांक ३

श्री. अण्णासाहेब घाणेकर यांनी रत्नागिरीहून श्री. भाऊसाहेब केतकर यांना १२-६-१९१० रोजी पाठविलेले पत्र. पत्र अगदी बोलके आहे. गोंदवल्याच्या सर्व सेवक भक्तमंडळींची हकिकत (अगदी नावे लिहून) सविस्तर पाठवावी असे त्यांना कळविले आहे. त्या सर्वांची विचारपूस त्यांनी पत्रांतून केली आहे.

श्रीराम

रत्नागिरी

ता. १२-६-१९१०

कृ. शिरसाष्टांग नमस्कार वि. वि. माझे मागील पत्रास 'असेच कृपापत्र पाठवीत जावे, इकडील सर्व मंडळी खुशाल आहेत.' यापेक्षा काही जास्त उत्तर येईल अशी पुष्कळ आशा होती. असेच म्हणावे मागील पत्राप्रमाणे मी किती पत्रे पाठवावी म्हणजे आपला राग जाईल. कृपा करून येत्या पत्री पूर्वीप्रमाणे लोभांत आपणास घेतले अशाबद्दल मला आश्वासन द्यावे. तेथील सविस्तर हकीकतीचे भलं मोठं लांबलचक पत्र यावे. चार-पाच मुंजी झाल्या म्हणून अनेकदा लिहिले पण कोणा कोणाच्या

झाल्या. लग्ने कोणाची झाली. साहेबमंडळी कोणकोण आहेत म्हणजे मधल्या तबकडीत जेवावयास कोण बसतात. खालील माहिती लिहावी.

आमचे थोरले आईसाहेबांची प्रकृती. तुम्ही कोकणात गेला त्या कामाबद्दल तुमचा तेथील कार्यक्रम.

रा. गोविंदबुवा त्यांचे मौन, पत्रावळी संपल्या का, का पानाला जावे लागते, पत्रावळी कोण लावतो. घोड्याची चाकरी कोण करतो.

श्रीधर भटजी त्यांचे प्रश्नाचा निकाल झाला का त्यावरून आपणास बराच बोध घेण्यास सापडेल.

हरिपंत मास्तर - मास्तर जप सपाटून चालू आहे ना.

गणपतराव ग्वाल्हेरकर - सध्या पहाऱ्याची व्यवस्था कशी आहे. रात्रीचे पहारे कोण करतो.

तात्या व सिताराम बोवा - कसे काय चालले आहे.

मल्हार भटजी - कोणचा पहारा करतात.

बळवंतराव नागपूरकर - कबूल केल्याप्रमाणे मला सविस्तर पत्र पाठविण्यास व पत्ता कळविण्यास सांगावे.

पंढरपूर - गाई किती आहेत, व्याल्या किती, दूध निघते का, शेण गोठ्याला कोण जातो, जप चालू आहे ना ?

कानडा मुदुक्रु - गडी वरच असतात का. हे मला शीर्षासन शिकविणार होते तुम्ही शिका.

सखाराम बुवा - कथा चालू असतात का. का कोठे गेले वगैरे.

उद्धव चिद्घन - नाथाच्या देवळातच वस्ती आहे का ? कसे काय चालले आहे. यांस साष्टांग नमस्कार सांगावे व याबद्दल सविस्तर लिहावे.

चच्या - रात्रीच्या पहाऱ्याला याला ओढतात की नाही.

गणपतराव साने - खोली कोणाची आहे. का दहिवडीस जातात.

वे. बाबूभटजी - आहेत का गेले. असल्यास शिरसाष्टांग नमस्कार सांगावेत. वरील सर्व मंडळींस माझे शिरसाष्टांग नमस्कार सांगावे. रा. बापूसाहेब साठे पाण्याच्या वेळेची हकीकत. नवीन मंडळी कोण आली. भुते-खेते, भांडण-तंटे, वैदिकातील वगैरे. तसेच भजनाला कोण असतात. हरभटजी आले का. आरतीला कोण हजर असतात. श्रीरामाची पूजा कोण करतो वगैरे सविस्तर, चार दिवस उशीर लागला तरी हरकत नाही. उत्तर पाठविणे.

श्रीसमर्थ स्वतः भजनाला कितीदा उभे राहिले होते, काय निरूपण चालले होते. पोथी निघते की नाही. कळवावे. नित्यनेमात श्री. अप्पासाहेबांचे निरूपण होते ना ? येथे नियमाने कोण बसतात. हरिभाऊ जावई, त्याचे सोबती दादी[illegible]बद्दल लिहावे. कोणकोणच्या बिऱ्हाडांतून कोण कोण राहिले आहेत.

(ब. ना. घाणेकर)

**पत्रक्रमांक ४**

श्री. तात्यासाहेब केतकर यांनी श्री. अण्णासाहेब घाणेकर यांना श्रीगुरुपौर्णिमा झाल्यानंतर पाठविलेले सविस्तर हकिकतीचे पत्र.

श्रीराम

गोंदवले ता. ३-८-१० बुधवार

कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार वि.,

कृपापत्र पावले. नारळासहित रुपया श्रींस दिला. उत्सवास बरीच मंडळी जमली होती. श्रीब्रह्मानंद व भागवत यांचेकडील १००/१२५ मंडळी, दामले, गोडबोले सर्व मंडळींसह, मंजीरे, गोखले वगैरे पुण्याकडील मंडळी. ति. अप्पा, त्रिंबक, बाबू रानडे, सांगली व मिरजेकडील मंडळी सर्व मिळून ३००/४०० लोक जमले होते. रा. पागे फडणीस आले नव्हते. बेळगावचे गोडबोले आले होते. रा. आप्पासाहेब फडके येथेच आहेत. त्यांचे विलायतेस गेलेले चिरंजीव बॅरीस्टर होऊन येथे आले आहेत. नामसप्ताह झाला. बहुतेक सर्व पोथींचे पारायणे झाली. एकादशीचे दिवशी जास्त म्हणजे पालखी निघाली होती. रा. बळवंतराव नागपूरकर मळवडीस (?) गेले आहेत. श्रावणशुद्ध पौर्णिमेस परत येणार आहेत. बाकी सर्वांच्या प्रकृती ठीक आहेत. ती. गं. आईस सिरसाष्टांग नमस्कार. ती. सौ. माई (आईसाहेबांस) सिरसाष्टांग नमस्कार. वारंवार आशिर्वादपत्र येत जावे. कळावे. सेवेसी श्रुत होय.

आपला नम्र

तात्या केतकर

उपसंहार

श्रीमहाराजांच्या वेळचा हा उपलब्ध पत्रांचा संग्रह श्रींच्या उत्तर आयुष्याच्या तेरा वर्षांच्या कालावधीतील आहे. एकूण नव्वद पत्रांपैकी निवडक बारा पत्रे या लेखात जशीच्या तशी दिली आहेत. त्यामुळे हा लेख म्हणजे श्रींच्या वेळच्या पत्रांची नुसती एक झलकच आहे, असे म्हणायला हरकत नाही. सर्वच पत्रे नुसती वाचनीयच नाहीत तर चिंतनीयही आहेत. ज्यांची श्रींवर पूर्ण श्रद्धा आहे व ज्यांना नामाचे थोडे फार प्रेम लागले आहे त्यांना या पत्रांतील मजकुराचे खरे मर्म कळून येईल. श्रींच्या इच्छेनेच हे संकलनाचे कार्य होऊ शकले. अनेक पत्रांचे कागद जीर्ण झाले आहेत. पत्रेही बरीचशी मोडी लिपीतील आहेत. ही सर्व पत्रे ज्यांनी नीट सांभाळून जतन करून ठेवली त्यांचे आपल्यावर उपकारकच आहेत. अनेक भक्तमंडळींची या कामी खूप मदत झाली.

श्रीमहाराजांच्या वाणीरूप आविष्कारात म्हणजे इ. स. १९२५ ते १९६७ च्या दरम्यान श्रींचा भक्तपरिवार खूप वाढला. या आविष्कारातील अनेक पत्रे आज उपलब्ध आहेत. ही पत्रे पद्यरूपात असून त्यांचे संकलन श्रींच्या प्रवचनाच्या पुस्तकात प्रत्येक महिन्याच्या १०, २०, ३० तारखांना आले आहे. या लेखात त्यांचा समावेश करण्यात आला नाही.

श्रींच्या कृपेनेच श्रींच्या वेळचा हा पत्रांचा संग्रह माझ्या हाती आला व त्यांनीच हे संकलनाचे व या लेखाचे काम करवून घेतले. या निमित्ताने श्रींचे जे चिंतन झाले त्याबद्दल श्रींच्या चरणी विनम्र भावाने प्रार्थना करून हा लेख आटोपता घेतो.

गोविंद सीताराम गोखले
१, धरती सोसायटी, प्रभात रोड, गल्ली नं. १०,
पुणे ४११ ००४.

# 'श्रीमहाराजांच्या अभंगांतील जीवन दृष्टी'

**डॉ. सौ. किशोरी बेलसरे,**

*बी.एस्सी., एम. ए., पीएच. डी, निवृत्तीनाथ निबंध. बी.एड. २० वर्षे मॅथेमॅटिक्स (क्लासेस), विविध मासिकांत अध्यात्मिक लेखन.*

श्रीमहाराजांचे एकूण अभंग ३९८ असून ते श्रीगोंदवले येथील श्रीमहाराजांच्या वेळचे पुजारी कै. अनंत कृष्णाजी कुलकर्णी यांच्या संग्रहावरून प्रकाशित केले आहेत. 'चैतन्यगाथा' या नावाने हे अभंगांचे पुस्तक इ. स. १९७७ साली श्री. वा. रा. अंतरकर यांनी संपादित करून ते प्रकाशित केले आहे. त्या अभंगांच्या आधारे श्रीमहाराजांच्या काव्याबद्दलचा विचार थोडक्यात मांडायचा प्रयत्न येथे केला आहे. सर्व अभंगांचा विचार करणे शक्य नाही. तरीपण त्यात आलेले श्रीमहाराजांचे परमार्थाबद्दलचे विचार थोडेफार स्पष्ट करण्याचा हा प्रयत्न आहे.

श्रीमहाराजांनी नामस्मरण हेच सर्वश्रेष्ठ साधन सांगितले आहे. इतर सर्व साधने नामाच्या अंगाने साध्य होऊ शकतात, असे त्यांचे स्पष्ट मत होते. त्यांच्या अभंगातून त्यांचे व्यक्तिमत्त्व निश्चितपणे जाणवते. त्यांनी स्वतः प्रपंचात राहून नामाच्या साधनाने स्वानंदानुभूती साधली होती. त्यामुळे त्यांनी सर्व अभंगात भगवंताची भक्ती व नामस्मरण यांचेच विविध अंगांनी वर्णन केले आहे. साधी, सोपी रचना आणि सूचक आशय व्यक्त करण्याची शैली त्यांच्या अभंगांतून जाणवते.

प्रपंचात राहून कर्तव्यकर्म पार पाडून परमार्थ उत्तम करता येतो हे त्यांनी दाखवून दिले. नामाचे अखंड अनुसंधान असल्यास एका जन्मातसुद्धा ईश्वराचा साक्षात्कार होऊ शकतो. आपल्या स्वतःच्या अस्तित्वापेक्षा भगवंताच्या अस्तित्वाची सतत जाणीव ठेवणे, सर्व काही त्याच्या कृपेनेच होत आहे ही भावना, जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तिन्ही अवस्थांमध्ये नामस्मरण चालू रहाणे व शेवटी 'मी' चा लोप होऊन तोच सर्व ठिकाणी आहे हा भाव उत्पन्न होणे हे सर्व नामस्मरणाने साधते, असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. परंतु यासाठी सद्गुरुकृपा आवश्यक आहे हेही त्यांनी निक्षून सांगितले आहे. एकदा नाम अविरतपणे चालू राहिले की नामच साधकाची पाठ सोडत नाही. नाम त्याला घट्ट धरून ठेवते. हा अनुभव आला की साधकाचा देह, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी व अहंकार नामरूपच बनतात व त्यालाच मोक्षप्राप्ती किंवा आत्मसाक्षात्कार म्हणतात असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे.

श्रीमहाराजांनी सर्व अभंगांत स्वतःचा उल्लेख दास किंवा दीनदास अशा नावाने केला आहे. या नावावरूनसुद्धा लक्षात येईल की त्यांना सर्वसामान्य जनतेचा म्हणजेच दीनांचा दास म्हणवून घेण्यात आनंद होत असे. बुद्धीमान माणसापेक्षा मला अडाणी माणूस आवडतो असेही श्रीमहाराज म्हणत. त्यांच्या अभंगात व्यवहारातील साधे साधे दृष्टांत आढळतात. फार काव्यमय व अलंकारिक भाषा नसल्यामुळे अडाणी माणसालाही अभंगांचा अर्थ सहजपणे आकलन होतो. तशी भाषा सरळ, स्पष्ट व रोखठोक आहे. कुठेही प्रपंचाचा त्याग करून परमार्थ अवलंबिण्यास सांगितले नाही. उलट प्रपंचातील सर्व कर्मे भगवंताच्या किंवा सद्गुरुच्या इच्छेनेच चालली आहेत. प्रपंचात सुख-दुःखे काहीही आली तरी नामस्मरणाने अखंड समाधान टिकवले जाते असेच श्रीमहाराजांचे सांगणे आहे. त्यांनी सर्वांना 'श्रीराम जयराम जय जय राम' ह्या तेरा अक्षरी सिद्ध मंत्राचा जप करण्यास सांगितले. राम व त्याचे नाम याशिवाय दुसरे काहीही त्यांनी आयुष्यभर केले नाही. रामाशिवाय त्रैलोक्याची सत्ता, सर्व विद्या, चौसष्ट कला, चारी मुक्ती इत्यादी गोष्टी फोल आहेत हे त्यांच्या पुढील अभंगांवरून दिसते.

'तिन्ही लोकींची सत्ताप्राप्ती । रामपायाची ही माती ।।
चौदा विद्या, चौसष्ट कळा । रामपायाचा हा धुरळा ।।
ओवाळूनी टाका चारी बाया (म्ह. मुक्ति) । शरण जावे रामराया।।

अभंग क्र. ९१

दास म्हणे राम हिरा । रामाविणे सर्व गारा (म्ह. दिखाऊ) ।।'

सर्व विद्या रामाच्या पायाच्या धुळीइतक्या किमतीच्या आहेत. राम हा हिऱ्याइतका मौल्यवान असून बाकी सर्व चौसष्ट कला, चारी मुक्ती या दिखाऊ, पोकळ गोष्टी आहेत. रामनामाशिवाय त्यांचे महत्त्व नाही हेच श्रीमहाराजांना सांगायचे आहे. नाम सर्वांचे आधी आहे व शेवटपर्यंत अखंड राहणार आहे. सर्व देवादिकांनी नामस्करण केले आहे. नामामुळेच वेद, शास्त्रे, कर्ममार्गाला अर्थ प्राप्त झाला आहे, असे ते सांगतात.

'नामी परब्रह्ममिठी । नामी शास्त्रा नाही तुटी ।।
वेदनिर्मित सृष्टी आहे । नाम त्याचे आधी पाहे ।।
चारी युगी नाम श्रेष्ठ । म्हणून जपे नीलकंठ ।।
दीनदास म्हणे नाम सुलभ । देवादिकांसी दुर्लभ ।। (अभंग क्र. ९४)

इतर काही आटाआटी न करता नाम घेतले की सर्व सिद्धी प्राप्त होतात. ते कसेही, कुठेही, केव्हाही घेतले तरी ते काम करते. अंतकाळी नाम आले की तो जीव मुक्त होतो. नामामुळे त्याचे सर्व विकार नाहीसे होतात. नामाला कोणतीही उपाधी लागत नाही. नाम सर्व साधनांचे मूळ आहे. नामामुळे साधकाची जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून सुटका होते. वाल्मिकी, ध्रुव, अजामेळ सर्व नामामुळे उद्धरून गेले.

'न लगे खटाटोप काही । नामे सिद्धि लोळे पायी ।।
नाम राहे हृदयात । यम त्यासी शरणागत ।।
नाम साक्षि आहे मला । नामे वाल्मिक तरला ।।
होय जितेंद्रिय अक्रोध । नामे ध्रुवा अढळपद ।।
नामे हटे भव काळ । उद्धरिला अजामेळ ।।
दीनदास म्हणे नाम । निजकैवल्याचे धाम ।। (अभंग क्र. १०२)

असे असंख्य अभंग पाहिले तरी सर्वांमध्ये नामाचेच महत्त्व श्रीमहाराजांनी नानापरीने वर्णन केले आहे. श्रीमहाराजांनी श्रीरामजन्म, श्रीमारुती जन्म, श्रीकृष्ण जन्म, सर्व तीर्थांचे महात्म्य, संतमहिमा, सद्गुरु महिमा, ज्ञान, भक्ती, वैराग्य, विषयवासना, विकार, कलियुगाचा महिमा अशा असंख्य विषयांवर अभंगरचना केली आहे.

'सद्गुरु कृपेचा सागर । भक्तां देई अभयवर ।।
सद्गुरुवचनी घाली मिठी । दैन्य जाय उठाउठी ।।
घेता सद्गुरुदर्शन । चुके चुके जन्ममरण ।।
सद्गुरुचे नाम घेता । लाभे मुक्ति सायुज्यता ।।
दीनदास म्हणे भजा । देव सद्गुरु नाही दुजा ।। (अभंग क्र. १४९)

वरील सद्गुरुविषयीच्या अभंगात सद्गुरु म्हणजे परमात्मा असून तो कृपेचा सागर आहे. तो भक्तांना अभय देतो. सद्गुरुंच्या वचनावर दृढ निष्ठा व श्रद्धा असली तर तो भक्त कधीही दैन्यवाणा होत नाही. सद्गुरुदर्शनाने भक्ताची जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटका होते. त्याला सायुज्य मुक्तीचा लाभ होतो. म्हणून अनन्यभावाने सद्गुरुस शरण जावे व परब्रह्माची प्राप्ती करून घ्यावी असे श्रीमहाराज सांगतात.

अनेक वर्षांपासून शास्त्रकर्ते सांगत आले आहेत की, चारी युगात कलियुगाचा प्रभाव फार आहे. अधर्म वाढला आहे. देहबुद्धी, विषयवासना, द्रव्यलोभ, भोगवृत्ती या वेगाने वाढत आहेत. शास्त्रावरचा व धर्मावरचा माणसाचा विश्वास कमी झाला आहे. त्याबद्दल अनादर वाढला आहे. आचार-विचारांवर बंधन राहिले नाही. प्रत्येक जण स्वतःला शब्दज्ञानी समजून आपल्या शहाणपणाने धर्माचे विपरीत अर्थ लावू लागले. त्यामुळे अनाचार, दुर्धर रोग, दुष्काळ, अतिवृष्टी यासारख्या घटनांमध्ये वाढ झाली. सर्व साधुसंतांना कलियुगाची काळजी लागली होती. अशा या कलिविषयावर श्रीमहाराजांनी सतरा अभंग रचले आहेत. सर्व अभंगांत त्यांचे एकच सांगणे आहे की पुढे काळ मोठा कठीण येणार आहे. त्यातून पार पडण्यासाठी सर्वांनी नामाला घट्ट धरून ठेवा. नामासारखे प्रभावी शस्त्र असल्यावर तुम्हाला कळीकाळाची भीती नाही. प्रत्येकाने अखंड नामस्मरण करून स्वतःचा उद्धार करून घ्या. नमुन्यादाखल पुढील अभंग बघा :

'ऐका ऐका श्रेष्ठजन । काळ आला हो कठीण ।।
नीतिमर्यादा उडाली । पापबुद्धी बळावली ।।
सत्यधर्मा नाही ठाव । पापी भ्याले बहुजीव ।।
मना आले ऐसे करिती । शब्दज्ञाने ब्रह्म होती ।।
वेदबाह्य झाले जन । आता कैसे ब्रह्मज्ञान ।।
काय कलीची हो मात । पडती दुःखाचे पर्वत ।।
दुष्काळ पडे बहु भारी । कष्टी होती नाना परी ।।
ज्ञान भक्ती नाही ठावा । प्लेग झाला गावोगावा ।।
दास म्हणे हा आकान्त । आता भजा रघुनाथ ।। (अभंग क्र. १५९)

श्रीमहाराजांना देह ठेवून यंदा ८५ वर्षे झाली. परंतु त्या वेळी श्रीमहाराजांनी वर्णन केलेल्या कलियुगाचा प्रभाव आजही आपल्या निदर्शनास येत आहे. त्यावरून संतांना भविष्याची दृष्टी कशी असते हे दिसून येते.

श्रीमहाराज आपल्या आईला, गीतामाईंना घेऊन काशीयात्रेला गेले तेव्हा त्यांनी मंदिरवासी लोकांना केलेला उपदेशाचा अभंग फार सुंदर व अर्थपूर्ण आहे. प्रत्येक माणसाने त्याप्रमाणे आचरण करण्याचा प्रयत्न केला तर आदर्श साधक निश्चितच बनू शकेल. अजूनही हा अभंग गोंदवले येथे सकाळी काकडारतीनंतरच्या भजनात नेमाने म्हणतात.

'अहो मंदिरवासी जन । तुम्ही ऐकावे वचन ।।
आल्या अतिथा अन्न द्यावे । रामनाम नित्य घ्यावे ।
पूजा करावी त्रिकाळ । अंगी वैराग्याचे बळ ।
पंचपदी भजन करा । रामनाम दृढ धरा ।।
नका करू काही आस । राम जपा श्वासोच्छ्वास ।।
भाव ठेवा रामापायी । कोणा मागू नका काही ।।
नम्र व्हावे सर्वाभूता । परनारी जैशी माता ।।
जीवन्मुक्ता नाही भेद । हाचि माझा आशीर्वाद ।।
दीनदास म्हणे गुरु पुत्र । तोचि होई जीवन्मुक्त ।। (अभंग क्र. १७४)

वरील अभंग म्हणजे सर्व अभंगांच्या चिरांचे मंदिर कल्पिले तर त्याचा सुवर्णरूपी कळसच वाटतो. प्रत्येक चरणात साधकाने कसे वागावे याचा सोप्या शब्दांत वस्तुपाठच दिला आहे. परमार्थाबद्दल काहीही शंका न घेता वरील अभंगात वर्णिल्याप्रमाणे रामनाम दृढ घेतले व आचरण केले तर नक्कीच या जन्मात राम भेटल्याशिवाय राहणार नाही.

इ. स. १८९७ मध्ये श्रीमहाराज नैमिषारण्यात जावयास निघाले त्या वेळी त्यांनी रचलेले अभंग हे संप्रदायात 'निर्याणाचे अभंग' म्हणून समजले जातात. कारण त्यात त्यांनी निरोपाची भाषा वापरली आहे. देवाने बोलावल्यावर आनंदाने जावे. आता माझे आयुष्य संपत आले. आजपर्यंत मी तुमच्याशी दुष्टपणाने वागलो असलो तर मला क्षमा करा. पण तुम्ही अंतरात शुद्ध भाव ठेऊन रामापाशी जीव लावा. त्यामुळेच तुमची अंतरीची तळमळ शांत होईल. आता मी पुन्हा येणार नाही. नामाला लहान साधन समजू नका. संसार असार मानू नका. दृश्यावर प्रेम करू नका. वैखरीचा नामाचा अभ्यास सोडू नका. आयुष्याचा भरवसा नाही. आजपर्यंत मी हेच सांगत आलो की नामाशिवाय दुसरे हीत समजू नका.

'आजवर तुम्हा सांगितली मात । नामाविण हित समजू नका ।।

मानू नका नाम साधन लहान । तुम्हा माझी आण जीवेभावे ।।
मानू नका सार संसार असार । दृश्य हा जोजार मानू नका ।।
सोडू नका नाम धरू नका काम । नाही नाही नेम आयुष्याचा ।।
दीनदास म्हणे सांगतो ते ऐका । अभ्यास वैखरी सोडू नका ।।
(अभंग क्र. १८५)

श्रीमहाराज मंदिरात रोज रात्री भजन करायचे. त्या भजनाच्या शेवटी त्यांनी रचलले अभंग अप्रतिम आहेत. त्यातसुद्धा त्यांनी तळमळीने सांगितले आहे की एकदा तरी राम बोला. पुन्हा अशी वेळ येणार नाही. रामनामाचा गजर करा. हाच पुण्यपर्वाचा काळ आहे. त्यामुळे भवसिंधु तरुन जायला मदत होईल. दीनदासाचे हे बोल तुम्ही फोल मानू नका.

विषयवासना आणि विकार यावर श्रीमहाराजांनी ३० अभंग रचले आहेत. यावरून हे विषय परमार्थाच्या दृष्टीने किती महत्त्वाचे आहेत ते लक्षात येते. षड्‌रिपु हे नेहमीच त्रास देतात. पण ते नामस्मरणाच्या मदतीने हळूहळू मनातून बाहेर काढणे सहज शक्य आहे. विषयांचा पूर्ण त्याग करायला श्रीमहाराजांनी कधीच सांगितले नाही. पण आपण त्यांच्या तालावर न नाचता त्यांना आपल्या तालावर नाचवावे. म्हणजे आपण आधीन न होता विकारांवर आपले स्वामित्व असले तर ते परमार्थाच्या आड येत नाहीत. त्यायोगे हळूहळू विषयात रंगणारे मन नामात रंगून जाते व मन विषयातीत होते. काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर हे माणसाचे सहा शत्रू आहेत. एकाच्या मागे लागले तरी बाकीचे सगळे आपोआप हातात हात घालून येतात.

ज्ञान, भक्ती, जीवाची तळमळ, वैराग्य, रामाची प्रार्थना, उपदेश अशा अनेक विषयांवर श्रीमहाराजांचे अभंग आहेत. रामाला अनन्य शरण जावे व तळमळून प्रार्थना केली असता आपल्यातील दोष तो काढून टाकेल असेच श्रीमहाराजांचे सांगणे आहे. कर्म करतानासुद्धा ते रामापाशी कसे नेईल इकडे ध्यान द्यावे. तुकाराममहाराजांचे व श्रीमहाराजांचे अभंग यांची तुलना केली तर तीच तळमळ दोघांच्याही अभंगात दिसते. श्रीमहाराजांनीसुद्धा कित्येक ठिकाणी परखडपणे व रोखठोक शब्दात भक्तांना ठणकावले आहे. पुढील ओळीत त्यांनी रामनाम न घेणाऱ्याचे तोंडसुद्धा पाहू नका असे सांगितले आहे.

'राहुनिया देवद्वारी । मुखे नाम न उच्चारी ।।
त्याचे पाहू नये तोंड । काय प्रसवली रांड ।।
माथा न करी ठेंगणा । शिक्षा व्हावी त्या दुर्जना ।।
जाहला तैसा मेला । कैसा आनंद तयाला ।।
दीनदास म्हणे ऐका । यमसदनी जाऊ नका ।। (अभंग क्र. ३७०)

सर्वच अभंगांत श्रीमहाराजांनी जरुरीपुरता व्यवहार सांभाळून भगवंताची कास धरावी, प्रत्येक कर्म, व्यवहार हे भगवंताच्या इच्छेने घडत आहे. सुख-दुःख समान मानावे असेच वारंवार सांगितले आहे. सर्वच अभंग सुंदर आहेत. आपल्याकडून थोडासाही अविचार होऊ देऊ नये. त्याचा परिणाम किती टोकाचा होऊ शकतो हे त्यांनी पुढील अभंगांत अनेक उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे.

'मुंगी कानात जाये । गज मरे लवलाहे ।।
राईइतुका अग्नि लागला । सहज गाव जळूनी गेला ।।
थेंब थेंब मेघ येत । त्याचे नदी-नाले वहात ।।
दास म्हणे थोडा अविचार झाला । त्याचा जन्म वृथा गेला ।।'
(अभंग क्र. ३८०)

परस्त्री, परद्रव्य व परनिंदा ही विषासारखी आहेत, हे श्रीमहाराजांनी वारंवार सांगितले आहे. जे घडते ते आपल्या कल्याणाचेच असते, भक्तिज्ञानावाचून पुस्तकी ज्ञान व्यर्थ आहे. अवगुण जर गेले नाहीत तर तीर्थयात्रा करणे निष्फळ आहे, अंतःकरण शुद्ध असेल तर तीर्थाटनाची गरज नाही, अशा प्रकारे संसारी माणसाला श्रीमहाराजांनी मोठ्या चातुर्याने प्रपंचात राहून राम कसा भेटेल याचे मार्गदर्शन आपल्या अभंगातून केले आहे. त्यांचा शेवटचा अभंग आशीर्वादपर असून तो आपणा सर्वांनाच मार्गदर्शनपर ठरो व सर्वांना श्रीमहाराजांसारखे नामाचे प्रेम लाभो ही त्यांचे चरणी प्रार्थना.

'अखंड संतती संपत्ति । तुम्हा असो जयप्राप्ति ।।
सदा घडो भगवद्‌भक्ति । मनी वसो ही विरक्ति ।।
ऐसे वांछित आहे मन । कृपा करील रघुनंदन ।।
दीनदासाचे हे शब्द । तुम्हा माझा आशीर्वाद ।। (अभंग क्र. ३९८)

सौ. किशोरी बेलसरे,
४०/७, भोंडे कॉलनी, कर्वे रोड,
पुणे ४११ ००४. फोन : ३३३४७०

## तूंच सर्व माझे

जागृतित चाले नाम  तुझ्याच कृपेने
निद्रेत नाम चालणे  किमया तुझी
हाती धरिले जयास  त्याचा तूं सोबती
सदा राहसी सांगाती समग्र जीवनी
अत्त्युत्तम भाग्य माझे  सद्‌गुरु तू लाभला
वाहू मी चिंता कशाला ? तूच सर्व माझे

**यशवंत माणकीकर,**
१४ अ, गिरीदर्शन सोसायटी,
बाणेर रस्ता, औंध, पुणे ४११ ००७.

# श्रीब्रह्मचैतन्यांचे उपेक्षित काव्य

**डॉ. प्र. न. जोशी**

*एम. ए. पीएच. डी. प्रबंध विषय मधुरा भक्ती, नू. म. वि. मुख्याध्यापक. १७५ लहान-मोठे ग्रंथ प्रसिद्ध. शिवाय शालेय क्रमिक पुस्तके लेखन विषयांत विविधता. शिक्षण शास्त्रज्ञ, संत साहित्य अभ्यासक व विचारवन्त. शैक्षणिक व सामाजिक परिस्थितीच्या अभ्यासासाठी अमेरिका भेट. चित्रकार व चित्रकला संबंधित ग्रंथ प्रसिद्ध. संत विषयक वाङ्मयाचे १४ ग्रंथ प्रसिद्ध.*

अर्वाचीन काळातील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीगोंदवलेकर महाराज यांची ख्याती आजही सर्व भारतात आहे. नामस्मरणावर आणि संतत्त्वावर यांचा भर होता. यांनी अनेक राममंदिरे बांधून शेकडो लोकांना सन्मार्गास लाविले आहे. भागवत व दासबोध यावर त्यांची निरूपणे होत असत. यांची प्रवचने आता खूप प्रसिद्ध आहेत. यांचे कवित्व व पत्रव्यवहार आज लोकांना पहावयास मिळतो. आजकाल बऱ्याच अज्ञात वाङ्मयाचे प्रसिद्धीकरण झाले आहे. ह. भ. प. लक्ष्मणराव पांगारकर यांनी आपल्या 'मुमुक्षू'तून गोंदवलेकर महाराजांचे वाङ्मय प्रसिद्ध केले आहे. ते नजरेआड होण्याचा संभव असल्या कारणाने त्याचा संक्षेपाने परिचय करवून देत आहे.

सन १९२५ च्या जानेवारीपासून पांगारकरांनी असे वाङ्मय आपल्या 'मुमुक्षू'तून छापलेले दिसते. पुणे येथील त्रिंबक नारायण देशपांडे या गृहस्थांनी जानेवारीच्या अंकात श्रीगोंदवलेकर महाराजांच्या 'तोंडची वचने' या नावाने लेख लिहिण्यास सुरुवात केली. या लेखातील बहुतेक सर्व वाङ्मय पद्यात्मक आहे. खरेच आहे की ज्यांना परतत्त्वाचा स्पर्श झाला त्यांच्या मुखातून काव्यरूप शब्द बाहेर येणार. 'मुमुक्षु'च्या या अंकात देशपांडे यांनी गोंदवलेकर यांच्या मुखातून जे काव्य प्रकट झाले त्याची नोंद घेतली आहे. असे वाङ्मय बहुधा ओवी वृत्तांत आहे.

या पहिल्याच लेखात महाराजांनी कलीचा महिमा वर्णन केला आहे. त्यानंतर त्यांनी कलीवर तोडगा काय तेही सांगितले आहे. पुढे लोकांनी कसे वागावे ? याचे मार्गदर्शन केले आहे. परमात्मा व जीव यांचा संबंधही स्पष्ट केला आहे. साधकबोध, पोथीचे सार, उपदेशसार अशा काही विषयांवर महाराजांचे विचार स्पष्ट झाले आहेत. यातील काही मजकूर धावत्या व सोप्या गद्यात आहे. महाराजांचे काव्य आणि गद्य सोपे, साधे व समजण्यास सुलभ असे आहे. त्यांनी कलीचा महिमा अत्यंत सुबोधरीतीने वर्णन करताना म्हटले आहे की, या कलीत 'सत्याचे विरुद्ध बोलती । वेदशास्त्र मिथ्या म्हणती । क्रियेवाचोनी वेदांत सांगती। ऐसे वर्तती जन ।। दुसऱ्यास बोले मूर्ख अज्ञान । झाले म्हणे मज ज्ञान। सत्य शब्द न बोले मुखाने । ऐसा काळ विपरीत ।। जे करिती लबाडी परद्रव्य हरण । कपट करूनि कापिती लोकांची मान । परप्रिया विश्वासघात रात्रंदिन । तयासि शहाणा म्हणती ।। जो सत्वशील करी स्नानसंध्या । परोपकारी सत्य भाषण । भगवद्‌भक्ती करी नामस्मरण । त्यासी जन अज्ञान म्हणती ।। दुसऱ्यांचे दोष बोलण्यात तत्पर । आपण दोषांचे सागर । सत्य नाही तिळभर । द्रव्यलोभी सदा मन ।। द्रव्य हेचि ब्रह्मज्ञान। द्रव्यासाठी घेती प्राण । जीवप्राण धर्म करिती अर्पण । ऐसा कलिचा प्रादुर्भाव ।।'

अशा प्रकारे श्रीगोंदवलेकर यांनी कलीचा प्रभाव वर्णन केला आहे. ते म्हणतात की, कलियुगात माणसास गर्व, ताठा, अभिमान फार असतो. परस्त्रीबद्दल त्याच्या मनात आसक्ती असते. परलोकावर त्यांचा विश्वास नसतो. आहार, निद्रा, मैथुन या शिवाय त्याला महत्त्वाचे काहीच वाटत नाही. कनक व कांता याचे प्रेम त्याच्या मनात असते. माता-पित्यांना तो अगदी विचारीत नाही. वर्णाश्रमधर्माचा त्याने त्याग केलेला असतो. त्याला संतांचा सहवास आवडत नाही. ब्राह्मणांनी वेदाध्यायन सोडून दिलेले असते. स्त्रिया, सासुरवाडी सोडून देतात आणि परपुरुषांवर लंपट होतात. कुळ व जात याना माहीत नसते. पतीच्या आज्ञेचे त्यांना महत्त्व वाटत नाही. जिकडे तिकडे अधर्म पसरलेला असतो. सर्वत्र अकाली पर्जन्यवृष्टी होते. घोडे, गाई, म्हशी चाऱ्याविणा कष्टी होतात. रोग, मृत्यू यांचे थैमान सुरू होते. जनक आणि जननी कष्टी होतात. त्यांचे कन्या, पुत्र प्लेगात मरण पावतात. गावातील लोक ग्रामत्याग करतात. दिव्याला तेलवात नसते. असे सर्वत्र पापी आचरण कलीयुगात निर्माण होते.

कलीच्या या महाभयंकर आक्रमणावर तोडगा काय आहे ? यासंबंधीही श्रीगोंदवलेकरांनी विचार केला आहे. कलियुगात श्रीगुरुंचे महत्त्व त्यांनी सांगितले आहे. वेद, शास्त्र, कर्म, उपासना, आत्मज्ञान, षड्‌दर्शन इत्यादी साधनांनी श्रीगुरुंची कृपा संपादन करावी. सकल तीर्थांमध्ये स्नान करून अध्यात्माचे निरूपण ऐकावे. ज्ञान व भक्ती यांचा मार्ग पत्करावा. चौदा विद्या, चौसष्ट कळा, चार वेद, सहा शास्त्रे, गीता, भागवत इत्यादींचा अनुभव घ्यावा. नामस्मरणाशिवाय एक क्षणही राहू नये. पापाचे भय असावे. अन्यायाने धन न मिळविता बायका मुलांना सांभाळावे. सत्य भाषण करून धंदा करावा. गुरू नीट पारखून घ्यावा. स्वधर्म सोडू नये. नवविधा भक्ती करावी. मर्यादा राखावी. स्त्रियांनी पतीची आज्ञा प्रमाण मानावी. त्यांनी घरचे माता-पिता, बंधू, कन्या, पुत्र, नातवंडे, सुना यांना सोडून जाऊ नये. स्त्रियांनी लज्जा, मर्यादा, स्वधर्म, स्वजन यांचा सांभाळ करावा. परपीडावर्जित असावे.

नाशवंत पदार्थांचे प्रेम मनात धरू नये. मिथ्या ओळखून असावे. नेहमी सत्य बोलावे. कोणावर अन्याय करू नये. दुसऱ्याची निंदा करू नये. दुसऱ्यास पीडा देऊ नये. परद्रव्य घेऊ नये. पर स्त्री पाहू नये. सदासर्वदा नम्र असावे. कामक्रोध, लोभ यांना जवळ करू नये.गुरुसेवा,

संतसंग, सत्कर्म, ज्ञान, भक्ती यांना नित्य जवळ करावे. भूतदया, शांती, लीनता यांच्या साह्याने दुसऱ्याचे मन जिंकावे. नामस्मरणाशिवाय एक पळही फुकट जाऊ नये. असा गोंदवलेकर महाराजांचा उपदेश आहे.

पोथीचे सार, उपदेशसार यांचेही महत्त्व या अंकात महाराजांनी सांगितले आहे. अक्रोध, निर्लोभ, भूतदया, नम्रता, सुख-दुःख, मानापमान समान मानणे. पर पीडा, परनिंदा करू नये. परद्रव्याची इच्छा धरू नये. नास्तिकांसी भांडण करू नये. भक्तिमार्ग सोडू नये. सद्‌गुरुवचनावर दृढ विश्वास ठेवावा. अखंड आनंदास विसरू नये. मिथ्या बोलू नये. चित्त सदैव नामस्मरणात ठेवावे. अधर्म, दुष्कर्म, असत्य यांना जवळ करू नये.

उपदेशसार सांगताना महाराजांनी फार बारकाईने विचार केला आहे. ते म्हणतात की, कामक्रोधाची लहर विवेकाने ठार करावी. विनाकारण भ्रमात राहू नये. जारण-मारण यांच्या नादी लागू नये. किमयेचा छंद करू नये. सिद्धींच्या मागे उगाच धावू नये. गर्व करू नये. कोणत्याही जीवास तुच्छ लेखू नये. कोणाचाही विश्वासघात करू नये. असत्य भाषण करू नये. जेत्यांची संगत धरू नये. कारणावाचून बोलू नये. शास्त्राचा आधार सोडू नये. कुळधर्म आणि कुळाचार यांचा त्याग करू नये. कोणाची वाट पाहू नये. कोणाची भीती बाळगू नये. आळस सोडून द्यावा. मेले अन्न खाऊ नये. परदुःखी पाहून हसू नये. नीच द्रव्य सेवू नये. स्नान, संध्या सोडू नये. आपण अणुरेणूपेक्षा लहान आहोत, असे मानावे. नित्य पूजा, नामस्मरण, अभ्यास करावा. असत्यासारखे दुःख नाही आणि समाधानासारखी श्रीमंती नाही. शांतीसारखे ऐश्वर्य नाही. परपीडेसारखे दुःख नाही. विश्वासघातासारखा दोष नाही. नेत्यांची संगत धरू नये. कोणाची निंदा करू नये. कोणाचे वर्म काढू नये. संसारात उणे पडू नये. उत्पन्नापेक्षा खर्च ज्यास्त करू नये. माता-पित्यांना देव मानावे. खोटी साक्ष देऊ नये. असा उपदेश ब्रह्मचैतन्यांनी सर्वांना केला आहे.

यानंतर सन १९२५ फेब्रुवारीच्या 'मुमुक्षु'मध्ये त्रिंबक नारायण देशपांडे यांनी श्रीगोंदवलेकर महाराजांच्या 'तोंडची वचने' या नावाचा मजकूर प्रसिद्ध केला आहे. ओवीबद्ध असणाऱ्या या मजकुरात स्त्रियांविषयी मन स्वाधीन ठेवण्याचा उपाय, जीव व आत्म्याचे विवरण असे काही महत्त्वाचे विषय आले आहेत. मन स्वाधीन होण्यासाठी 'निजध्यासे करावें जतन । निरोध, आक्रोध, अंतःकरण । रामनाम जपे रात्रंदिन स्वानंद । तात्काळ आत्मप्रतीती ।।' असा उपाय सांगितला आहे.

याप्रमाणे गोंदवलेकर महाराज यांनी काव्यमय भाषेत उपदेश केला आहे. तो मुळातून पाहाण्यासारखा आहे. या लेखात त्याचे ओझरते दर्शन मात्र घडवीत आहे. ब्रह्मचैतन्यांनी ओवी व अभंग या वृत्तांत लेखन केले आहे. सुमारे ७५ ते ८० वर्षांपूर्वी 'मुमुक्षु' मासिकातून ते वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे. आज ते बहुतेकांच्या नजरेआड होण्यासारखे आहे. काही वर्षांपूर्वी मी गोंदवलेकर महाराज यांचे चरित्र लिहिले होते. त्याची दुसरी आवृत्ती पाच-सहा वर्षांपूर्वी मुंबईच्या 'मनोरमा' प्रकाशनाने प्रसिद्ध केली. या लेखनात मी मुमुक्षु मासिकाचा आधार घेतला आहे. पण हे दुर्लक्षित काव्य सामग्राने प्रसिद्ध व्हावे असे वाटते. अलीकडच्या काळात गोंदवलेकरांच्या अप्रसिद्ध वाङ्मयाचे प्रकाशन होत आहे. त्यात मुमुक्षुतील हे काव्य प्रसिद्ध झाले आहे काय ? मला फारसा अंदाज नाही. मी दोन-तीन भक्तांचे लक्ष याकडे वेधले होते. पण त्याचा उपयोग कितपत झाला, हे सांगता येत नाही. असो.

ओवीवृत्तापेक्षा अभंग जास्त स्वाभाविक आणि सरळ असतात. अभंग हे खरे म्हणजे वृत्त नसून ती एक वृत्ती आहे असे वाटते. म्हणूनच ज्ञानेश्वरांपासून अनेक मराठी कवींनी ओवी वृत्तास आश्रय दिलेला दिसतो. भक्तीच्या अनेक रम्य छटा, अभंग या वृत्तातूनप्रकट झालेल्या दिसतात. गोंदवलेकर महाराज यांनाही अभंग हे वृत्त स्वाभाविकच वाटले असल्यास नवल नाही. त्रिंबक नारायण देशपांडे यांनी ८५/८६ अभंगांतून हे दर्शन 'मुमुक्षू'च्या वाचकांना घडविले आहे. 'गोंदवलेकर महाराजांचे अभंग' या शीर्षकाखाली हे अभंग प्रसिद्ध केले आहेत. अभंग तत्त्वस्पर्शी, अनुभूतिसंपन्न आणि प्रासादिक आहेत. हे अभंग ईश्वराचे स्वरूप, त्याचा प्रेमळपणा आणि त्याचे अवतारकार्य स्पर्श करणारे आहेत. हे अभंग मुमुक्षुच्या ऑक्टोबर १९२५ पासूनच्या अंकात प्रसिद्ध झालेले आहेत.

मुख्यतः नामस्मरण, संतमाहात्म्य, पांडुरंगाचे स्वरूप, लोकांची परिस्थिती व त्यांना उपदेश, स्त्रीचे वात्सल्यरूप, साधनाविचार, लोकस्थिती, विषयी लोक इत्यादी विषयांचे सम्यक दर्शन घडविणारे आहेत. रामप्रभूंविषयी मनाची किती कोवळीक असावी याचेही दर्शन काही अभंगांतून होण्यासारखे आहे. परंतु रामनाम हे एक मुख्य सूत्र गोंदवलेकरांच्या बोधाचे होते. रामनामाचे माहात्म्य त्यांच्या अनेक अभंगांतून व्यक्त झालेले दिसेल. एका अभंगात ते म्हणतात की,

रामकृपा करी सांभाळ । राम दीनांचा दयाळ ।
राम लावण्याची खाणी । राम निर्गुण निरंजनी ।
राम भक्तांचे भूषण । राम जानकीजीवन ।
दीनदास म्हणे रामचरण । सदा राहो लोटांगण ।।

या रामाच्या कृपेसाठी फक्त त्याचे नाम घ्यावे. त्याचे स्मरण करावे असे महाराजांचे सांगणे आहे. उगाच तीर्थयात्रा करू नये. रामनाम तोंडानी म्हणावे. 'मानवाची न धरा माया । शरण जावे रामराया।' या नामासाठी कंटाळा करू नये. कारण तो आपल्या हृदयात सतत वास करीत असतो. तरी प्रेमसुखाच्या अनुभूतीसाठी भक्त कळवळ्याने त्याला साद घालतो. तो म्हणतो की,

काय माझ्या रामा पाहातोसी अंत ।
काय मन पतित करू आता ।
हिरा टाकोनियां गारा देसी हातीं ।
तेथें माझी मती काय चाले ? ।।
सांडोनियां नाम दावितसें काम ।
काढी माझा भ्रम रामराया ।।

दीनदास तुज येतो काकुळती ।
शुद्ध करी मती रामराया ।।

या सर्व अभंगांतून गोंदवलेकरांनी स्वतः 'दीनदास' म्हणवून घेतले आहे. हे एक लक्षणीय गमक आहे. अशासाठी की, भक्त दीन झाला तरच प्रभूच्या भेटीची गोडी अनुभवास येते. या कामी संतांचे साह्य आपणास मोठेच होते. म्हणून दीनदास म्हणतात की,

तुम्ही दयावंत संत । माझा पाहूं नका अंत ।।
पोटीं लागलीसे भूक । मज झालें असें दुःख ।।
नानापक्वान्नें तुमचे घरीं । द्वारीं उभा मी भिकारी ।।
तुमच्या उच्छिष्टाचा लेश । मज द्यावा भिकाऱ्यास ।।

गोंदवलेकरांना श्रीराम व पांडुरंग एकच वाटतो. त्याला वश करण्यासाठी लोकांनी प्रयत्न करावेत. महाराजांनी म्हटले आहे की, 'तोचि पाणी भरी । चित्त देई एक्या बोला । विषय टाकी अंतरींचा । पुढे मार्ग परमार्थीचा ।। विषय सोडी सोडी भ्रम । मग संतसमागम कलियुगात।। पापकर्मात मन रमते. अशा वेळी दीनदास म्हणतात की, चित्तात रामनाम पक्के धरून ठेवा. हे सर्व सुखाचे आगर आहे. एका अभंगात तर ब्रह्मचैतन्यांनी ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, कबीर इत्यादी संतांचा उल्लेख केला आहे. या संतांबद्दल कोवळिक किती असावी यासंबंधी महाराज म्हणतात की,

माय बाळापाशी चित्त । तैसें संत करिती हित ।
स्तनीं पान्हा दाटला । हाका मारी बाळकाला ।
त्याची सदा चिंता वाहे । ऐसी कृपाळू ती माये ।
बाप म्हणे संतमाये । मुमुक्षुंची वाट पाहे ।।

गोंदवलेकर महाराजांनी भक्तीच्या अशा विविध छटा व्यक्त केल्या आहेत. प्रपंच व परमार्थ यांचे योग्य दर्शन घडविले आहे. ईश्वराच्या प्राप्तीसाठी विविध साधनांची गरज नाही. अष्टांग योग, कुंडलिनीचे उत्थापन, नाना सिद्धी या सर्व गोष्टी अनित्य आहेत. केवळ रामनामाने तरुन जाल असा त्यांचा उपदेश आहे. ते एका महत्त्वाच्या अभंगात म्हणतात की,

सरली आयुष्याची गणना । आता नाही येणें पुन्हा ।
तुझ्या पायीं मन राही । हेंचि सुख आम्ही घेतो ।
तुझ्या पायी पडिली मिठी । आतां जातो उठाउठी ।
दीननाथ म्हणे रघुनाथा । आज्ञा द्यावी मज आता ।

सर्व मानवी जीवन प्रभूच्या आज्ञेवर विसंबून आहे. असे श्रीगोंदवलेकर महाराज यांना म्हणावयाचे आहे आणि हेच सर्व संतबोधाचे मर्म नाही काय ?

डॉ. प्र. न. जोशी
सामदा, डॉ. केतकर मार्ग, एरंडवणा, पुणे ४.

# श्री. प. पू. ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांची जीवनमूल्ये

**प्रा. अजित कुलकर्णी**

*बी. ए. (तत्त्वज्ञान), एम. ए. (तत्त्वज्ञान), (समाज शास्त्र), पीएच. डी. काम सुरू. रजिस्ट्रार, बी. एम. सी. सी. कॉलेज. पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध. गेली २६ वर्षे प्रवचन, कीर्तन, व्याख्यान. श्रीज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण, विवेकानंद इ. गाढा अभ्यास. शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार. पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक, धर्मभूषण पदवी - श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्य (पुरी) १९९६.*

प्रत्येक मनुष्याला वाटत असते की, आपलं जीवन सुख समृद्धीने परिपूर्ण असावे. वैदिक धर्म परंपरेत सर्वच संत, ऋषी मंडळींची शिकवण व मार्गदर्शन म्हणजे सुखी जीवनाचे मूलमंत्र आहेत. ही शिकवण व मार्गदर्शन हा संतांचा प्रयत्नवाद आहे. हे प्रयत्न बुद्धिवादावर अधिष्ठीत आहेत. मानवी जीवनाला खऱ्या अर्थाने वळण देणे आवश्यक असते. याने मनुष्याचा, व्यक्तिमत्त्वाचा विकास होतो व मनुष्याला जीवन साफल्याची अनुभूती येऊ शकते. मनुष्याला हे पटले आहे की, लौकीक व्यवहाराच्या दृष्टिकोनातून मनुष्याला शांती व समाधान प्राप्त होत नाही. तर समृद्ध जीवन कोणते असेल तर, अक्षय-शाश्वत, सुख चिरंजीव प्रेमाची अनुभूती, कृतकृत्येची भावना होणे व आत्मज्ञान प्राप्त करून घेणे, असा संत महात्म्यांचा जीवनाचा दृष्टिकोन आहे. सर्वसामान्यपणे मनुष्य जीवन हे अपूर्ण असून दुःखमय आहे. त्यामध्ये सर्व संतमंडळी जीवन आनंदी, सुखमय कसे होईल हे सांगत असतात. प. पू. गोंदवलेकर महाराज यांचे चरित्र, प्रवचन साहित्य यातून जी विचारप्रभा व्यक्त होते ते 'सुखी जीवनाचे मूलमंत्र' आहेत. महाराजांची शिकवण ही पूर्णपणे शास्त्रीय कसोटीवर आधारीत असून सत्यानुभूतीची प्रचिती देणारी रोकडी अनुभूती आहे. या विचारांच्या अंगाने आपण महाराजांच्या जीवनमूल्यांचे अवगाहन करून आपले जीवन सुस्नात करू या.

## मनुष्याने जीवनात कर्तव्य परायण रहावे.

आपले कर्तव्याला न विसरावे । भगवंताचे अनुसंधान राखावे ॥
व्यावहारिक योग्य ते कर्तव्य करीत जावे । बाकी रामावर सोपवावे ॥

प्रत्येक मनुष्याने कर्तव्य करीतच जीवन व्यतीत करावे. व्यवहार हा द्वैताधारित असतो. परमार्थ-अध्यात्माची शिकवण अद्वैताधारित असते. या दोन्हीचा समन्वय होत नाही. परंतु महाराजांनी सहजपणे मनुष्याला व्यवहार व अध्यात्माची सांगड घालून दिली आहे की, प्रत्येकाने जीवनात प्रथम कर्तव्याच्या अंगाने विचार करून व्यवहार पूर्ण करावा. यातच जीवनाचे साफल्य आहे. कर्तव्याचा विसर अथवा त्याग कधीही करू नये.

भगवान गोपाळकृष्णानेही अर्जुनाला गीतेची शिकवण कर्तव्याच्या जागृतीने करून, अर्जुनाचा विषाद दूर केला आहे. तसे महाराजही सांगतात, प्रत्येकाने कर्तव्यपूर्तीने जीवनाचे सार्थक करावे, यातून आपोआप भगवंताचे स्मरण राहू लागते. म्हणून पू. महाराजांना व्यवहार हा योगसाधनेसारखा वाटतो.

## मनुष्याने कर्म निर्हेतुकपणे करावे

मनुष्य कर्माशिवाय राहू शकणार नाही असा नित्याचा अनुभव आहे. तेव्हा मनुष्याने कर्म करताना निर्हेतुकपणे करावे असे महाराज म्हणतात.

प्रश्न असा निर्माण होतो की, हेतुरहित कर्म करता येईल का ? कर्मामागे हेतु हा असतोच. परंतु येथे निर्हेतुक म्हणजे फलासक्तीच्या दृष्टीने हा शब्द आहे. मनुष्य कर्तव्याच्या अंगाने जेव्हा 'सहजकर्म' करतो, ते कर्म आपोआप निर्हेतुक होऊ शकते. सारांशाने कर्माचा हेतु हा शुद्ध असला पाहिजे. 'कर्मानो गहना गति ।' असे शास्त्रकार कर्माबाबत म्हणतात. सहेतुक केलेले कर्म, साधना शेवटी नाशाला कारणीभूत ठरते. दानवांनी केलेली तपसाधना, दानवांच्या नाशाला कारणीभूत झाली असा इतिहास आहे. वरदान हे मागावयाचे असते. तर आशीर्वाद हा द्यावयाचा असतो. तपसाधना करून जी सहेतुक कर्म असतात ती वरदान असतात व तपसाधना निर्हेतुक केल्याने भगवंत साधक व भक्तासाठी कृपाआशीर्वाद देत असतात. हे निर्हेतुक कर्माचे शाश्वत फळ आहे. म्हणून कर्तव्याच्या अंगाने केलेले कर्म हे निर्हेतुक बनू शकते. मनुष्य सदाचरणी होतो आणि प्रापंचिक सुखाचीही अनुभूती येते.

## मनुष्याने प्रपंचात घ्यावयाची काळजी

मनुष्याने आपले हित कशात आहे हे जाणणे खरोखर आवश्यक आहे. तुकाराम महाराज म्हणतात - 'आपुलिया हिता जो असे जागता। धन्य माता-पिता तयाचिया ॥' पू. महाराजांनी प्रपंचात तीन गोष्टी मुख्यत्वे सांगितल्या आहेत. एक दुःसंगति, दोन अनाचार व तीन मिथ्या भाषण या गोष्टी मनुष्याने निश्चित टाळाव्यात आणि सत्संगती, सद्ग्रंथ सेवन, सद्विचार आणि सदाचरणात रहावे. 'माझे मज कळो येति अवगुण ।' हे अवगुण जेव्हा मनुष्याला समजतात तेव्हा त्याचा त्यागही करावयाला शिकले पाहिजे. सद्गुणांचा स्वीकार करून जीवन साफल्याची अनुभूती येऊ शकते. हा महत्त्वाचा विचार पू. महाराजांच्या विचारातून समजू शकतो.

पू. महाराज प्रपंचात वागताना समर्थ सांगतात तसेच वागण्यास सांगतात. ते असे, 'राखावी बहुतांची अंतरे । भाग्य येते तदनंतरे ।।' असा प्रपंच करताना सर्वांना धरून रहावे. त्याने आपोआप जनप्रियत्वाची प्राप्ती होते. प्रपंचात गरजेपुरती व्यवहार ठेवावा आणि नीतिधर्माने सारे काही मिळवावे. प्रपंचातील जास्तीत जास्त काळ ईश्वर चिंतनात घालवावा. आसक्तीच्या वृत्तीने प्रपंच वाढीस लागतो. प्रपंचातील आसक्ती सोडणे म्हणजे प्रपंच सोडण्यासारखे आहे. यामुळे प्रपंचाचा ताप वाटत नाही. प्रपंच कर्तव्याच्या अंगाने करावा आणि मन भगवद् चिंतनात ठेवावे, ही प्रपंच भगवंतमय होण्याची अटकळ आहे. यासाठी अस्तिक्य बुद्धीने प्रपंच करावा; परंतु प्रपंचाचे स्वरूप ओळखून वागावे. प्रपंच हा अशाश्वत आहे, तर परमार्थ हा शाश्वत आहे. व्यवहार्य दृष्ट्या प्रपंच हा सदैव अपूर्णच असतो. हे जाणणे व तसे वागणे याला प्रपंच जाणणे असे म्हणतात. यासाठी प्रपंच्यात प्रेम, दया, शांती व क्षमा या गुणांचा अंगिकार करावा, म्हणजे सद्‌गुणांचे संवर्धन होते. प्रपंच हा भगवंतमय करणे म्हणजे घरातील वातावरण शुद्ध, शांत, पवित्र व भगवंतमय होऊन सर्वांनाच घर हा विसावा वाटू लागतो. प्रपंच देवाचा समजून केला म्हणजे प्रपंचाचा अभिमान संपून जातो. प्रपंचात गरजेपुरता संचय करावा. अतिकष्टाने मिळालेली कोणतीही गोष्ट सुख देत नाही, असा अनुभव आहे. यासाठी जीवनात कोणतेही कर्म मनुष्याने शांतचित्ताने करावे. प्रपंच करताना घरात शांत व पावित्र्य राखावे. प्रपंच हा (गृहस्थाश्रम) एक परमात्म्याकडे जाण्याचा श्रेष्ठ दुवा आहे. यामुळे जीवनात प्रपंच हे साधन व परमार्थ साध्य असे समजून जीवन व्यतीत करावे असे पू. महाराजांचे म्हणणे आहे.

## जीवनात परमेश्वरावर पूर्ण निष्ठा ठेवावी

मनुष्याने जीवन जगताना परमेश्वरावर पूर्ण निष्ठा ठेवून जीवन जगावे. ज्याप्रमाणे लहान मूल आईसाठी रडत असते त्याप्रमाणे परमेश्वर भेटीसाठी जीवनात रडावेसे वाटले पाहिजे. त्या वेळी परमेश्वराची खरी ओढ समजू शकते. भगवंतावर अविचल श्रद्धा ठेवली पाहिजे, म्हणजे जीवनातील काळजी नावाची चीज संपून जाते. त्या वेळी केलेले कर्म आपोआप भगवद् अर्पण होते. जीवनात भगवंतावर व माणसावर निर्हेतुक प्रेम करता आलं पाहिजे. यासाठी मनुष्याची गरीबी वा श्रीमंती आड येत नाही. तसेच जीवन जगताना मनुष्याने सबंध सृष्टीकडे कौतुकाने भगवंताचे स्वरूप म्हणून पाहण्यास शिकावे. जीवनात कितीही मिळविले तरी हाव कधीही संपत नाही. यासाठी जीवनात नीतिधर्माचे आचरण करीत अंतरंग सुधारण्यासाठी ईश्वरावर परिपूर्ण निर्व्याज्य प्रेम करावयाला शिकले की आपोआप सर्व प्रकारच्या वासना क्षीण होत जातात. जीवनात सुख व दुःख केवळ मनानी - जाणीवेने ठरविले आहे. परमेश्वरावरील विश्वासाने मनुष्य सर्व घटनांकडे साक्षीभावाने पाहण्यास शिकू शकतो. हे एकदा साधले की, सुख व दुःख सारे काही संपून जाते व केवलानंद प्राप्त होतो. म्हणून प्रथम मनुष्याने आपल्याला सुधारण्यास शिकले तर थोड्या अवधीत सर्व जग सुधारले जाईल. हे अंतिम शाश्वत सुख भगवंताच्या अधिष्ठान व निष्ठेशिवाय समजणार नाही, असे पू. महाराजांचे मार्गदर्शन आहे.

## साधकांना काही सूचना

साधक - उपासकांनी कर्माचा हेतु शुद्ध ठेवला पाहिजे. साधन काळात अंतर्बाह्य सावधगिरी राखली पाहिजे. निश्चयपूर्वक व प्रयत्नपूर्वक नामसाधना केली की अंतरंग - (चित्तशुद्धी) शुद्ध होऊ लागते. यासाठी धर्माचरण, भगवत्‌भक्ती, नामस्मरण व सत्संग ही अंतरंग शुद्धीची साधने महाराज साधकांना सांगत आहेत. तसेच साधकांनी त्यागातील आनंदही ओळखला पाहिजे व स्वार्थ आवरला की, निर्व्याज्य प्रेम वाढू लागते.

साधना करताना मनुष्याला 'मग रामनामी उपजे आवडो । सुख घडोघडी वाढो लागो ।।' प्रमाणे साधन केले पाहिजे.

साधकांनी देहबुद्धीचा त्याग करून, बुद्धी आत्मरूप करावी. याने मनुष्याचा 'मी' पणा आपोआप संपून जातो. भगवंताचे अनुसंधानात राहू शकतो. तसेच कोणत्याही परिस्थितीत साधकांनी आपली वृत्ती स्थिर राहील असे पाहणे आवश्यक आहे. यासाठी सदैव 'मी भगवंताचा आहे' ही अखंड जाणीव ठेवावी. आपल्या सद्‌गुरुंवर नितांत श्रद्धा ठेवावी. सर्वांवर प्रेम करण्यास शिकावे. हीही एक साधना आहे. तसेच 'दाता एक रघुनंदन ।' अशी वृत्ती व भावना असली पाहिजे. याने भगवंताच्या निरुपाधिक प्रेमाची अनुभूती येऊ शकते.

## समारोप

मानवी जीवन क्षणभंगुर आहे. या मनुष्य जीवनात जे काही प्राप्तव्य आहे ते प्राप्त करून घ्यावे. यासाठी प. पू. ब्रह्मचैतन्य महाराजांनी प्रत्येकाला नामसाधना सांगितली आहे. नाम-साधनेत चार प्रकारच्या शक्ती आहेत. मनुष्याची बुद्धी, मन, वाणी व प्राण यावर नामसाधना संस्कार करीत असते. बुद्धी प्रगल्भ राहून ज्ञानमार्गावर अचल राहिली पाहिजे. याने शाश्वत ज्ञानाची अनुभूती येते. मनाच्या एकाग्र शक्तीने, ध्यानादि साधनेचा विकास घडतो. वाणी ही नाममंत्र विद्येतील साम्राज्ञी आहे. परा, पश्यंती, मध्यमा व वैखरीच्या योगाने भक्तीभावाचा रस वाहू लागतो व शरणागतवृत्ती जागृत राहून तिच्यातून निर्माण होणाऱ्या स्पंदनाच्या वलयांनी मनुष्याला खऱ्या चैतन्याची अनुभूती येते. प्राण शक्तीने सर्व संस्काररूपी वलये शक्तीप्रवाहाने प्रवाहित होऊन आत्मरूप बनतात. याची प्रचिती येण्यासाठी जी जीवनमूल्यांची रत्ने वेचली आहेत, त्या प्रभेत प्रत्येकाने आपले जीवन दैदिप्यमान करून कृतार्थ करावे अशी महाराजांची इच्छा दिसते. यासाठी 'अखंड भगवत् चिंतनात राहण्याची प्रेरणा व शक्ती तुम्हा-आम्हा सर्वांना पू. महाराजांनी द्यावी', ही त्यांच्या चरणी प्रार्थना करू या.

प्रा. अजित कुलकर्णी
६९५ नारायण पेठ, संपदा अपार्टमेंट,
लोखंडे तालीम जवळ, पुणे ४११ ०३०.

# सद्गुरु - शिष्य - परंपरा

**सौ. आशा परांजपे**

*एम. ए. एल. एल. बी., चिन्मयमिशन हाँगकाँग येथे ६-७ वर्षे मिशनचे काम केले. पूजा मासिकात गेले ६-७ वर्षे नियमित लेखन. भक्तिमहिमा हे इंग्रजी गोष्टीरूप पुस्तक लहान मुलांसाठी प्रसिद्ध. सध्या नामदेव अध्यासनात श्री. गोंदवलेकर महाराज यांचेवर संशोधनपर लेखन सुरू आहे.*

प्रत्येक संत महंताच्या आयुष्यात गुरूचे महत्त्व अनन्यसाधारण असते. ज्याच्या त्याच्या पिंडाप्रमाणे त्या मार्गातील गुरु भेटतो व गुरूचे भेटीनंतरच संताचे आयुष्यात आमूलाग्र बदल झालेला दिसून येतो. ज्या अध्यात्मज्ञानाच्या ध्येयाने साधक प्रेरित झालेला असतो तेच अध्यात्म ज्ञान त्याला गुरूकडून मिळते. म्हणून भारतीय संस्कृतीत सद्गुरु ही संज्ञा फार महत्त्वाची आहे. महाराष्ट्रात नाथ, वारकरी, समर्थ, महानुभाव व दत्त हे पाच संप्रदाय प्रचलित आहेत. या पंथांनी आध्यात्मिक एकता घडवून आणली. प्रत्येक पंथाचे दैवत वेगळे असले तरी ज्ञानाच्या प्राप्तीसाठी या पंथांनी भक्ती व योग या दोन गोष्टींना महत्त्व दिले. या पंथातील संतांनी लोकांना स्वधर्मपालनाचा आदेश दिला. कर्माचा सिद्धांत शिकविला, करुणेचा, प्रेमाचा झरा लोकांच्या अंतःकरणात निर्माण केला. या पंथांचे प्रवर्तक हे श्रेष्ठ संतपुरुष होते. प्रत्येकाला ज्ञानप्राप्तीसाठी गवसलेला मार्ग एकमेकांपासून थोडासा वेगळा होता.

नाथ-संप्रदायाने सत्-शक्तीचा विकास कसा करावा यावर भर दिला. वारकरी पंथाने भक्तीची महत्ता गाइली. महानुभाव पंथाने त्यागाची आवश्यकता दाखवून दिली. दत्त-संप्रदायाने कर्मदक्षता व शिस्तप्रियता शिकविली व समर्थांनी संस्कृतीच्या विकासासाठी श्रेष्ठ मूल्यांची जपणूक केली.

श्रीगोंदवलेकर महाराजांचे गुरु श्रीतुकामाई हे नाथ संप्रदायाचे होते असे दिसून येते.

## नाथपंथाची उत्पत्ती व परंपरा

नाथपंथ पुरातन म्हणून ओळखला जातो. या पंथाच्या उत्पत्तीबाबत अनेक मतमतांतरे आहेत. श्रीमच्छीन्द्रनाथांनी आदिनाथापासून या पंथाचे तत्त्वज्ञान आत्मसात केले व गोरक्षनाथांच्या मदतीने व अन्य नाथांच्या साहाय्याने त्याचा भारतभर प्रसार केला असे बहुमतांनी मानले जाते. या पंथाचे उपास्य दैवत श्रीशंकर, आदिनाथ आहे. या पंथाचे उर्ध्वयु असे नऊ नाथ मानले जातात. या नाथांपैकी एक नाथ गहिनीनाथ, यांच्यापासून निवृत्तीनाथांना शिष्यत्व प्राप्त झाले. त्यांच्याच पुढच्या शाखेतून श्रीतुकामाई यांना गुरुलाभ झालेला दिसतो.

तुकामाईची गुरुपरंपरा अशी सांगता येईल -

आदिनाथ - मच्छिंद्रनाथ - गोरक्षनाथ - गहिनीनाथ - मुक्तावटेश्वर - चक्रपाणी - विमलाचांगदेव - जनार्दनहरी - विश्वेश - केशवराज - बोपया हरिदास - कान्हया - सदानंद - कृष्ण - शामसुंदर - प्रल्हाद नागया - एकनाथ - विठ्ठल किंकर - चिन्मयानंद - तुकामाई. [१]

तुकामाईंच्या गुरुपरंपरेत ज्ञानेश्वरांच्या भक्तिमार्गाचा व गहिनीनाथांच्या योगमार्गाचा अपूर्व संगम झालेला दिसतो.

## तुकामाई उर्फ तुकाराम चैतन्य

श्रीगोंदवलेकर महाराजांचे गुरु तुकामाई हे मराठवाड्यातील येहळेगावचे. तेथील काशीनाथपंत व पार्वतीबाई या सद्गुणी दांपत्याचे पोटी तुकामाईंचा जन्म फाल्गुन वद्य पंचमी १८१३ साली झाला. लहानपणापासूनच या बालकाचे अंगी अद्भुत गुण दिसत होते. त्यावरून ते अवतारी पुरुष असावेत असे सर्वांना वाटत असे. ते बाह्यांगाने अस्ताव्यस्त राहात असत म्हणून लोक त्यांना वेडा तुक्या म्हणत असत. वयाच्या बाराव्या वर्षी त्यांची उमरखेड येथील नाथपंथाचे सत्पुरुष चिन्मयानंद यांची अचानक दृष्टभेट होऊन अंतरीची खूण पटली. चिन्मयानंदांनी तुकामाईंना अनुगृहीत केले. ज्या काही संतांना गुरुशोधाची वणवण करावी लागली नाही अशापैकी तुकामाई एक आहेत.

तुकामाईचे दोन गुरुबंधु गोचरस्वामी व रावसाहेब शेवाळकर यांचा उल्लेख असा सापडतो,

> गोचरस्वामी उंबरखेडकर । गुरुबंधु तुकाईचे
> गोचर म्हणाया कारण । धेनुपरी अन्नग्रहण,
> हस्तस्पर्श न करिती जाण । मुखाने आहार करीतसे
> परम विरक्त संन्यासी । परि सगुणोपासना आनंदेसी,
> तिघे गुरुबंधु जे का । वडील मानिती त्यातील तुका
> गोचरस्वामी दुजे देखा । तिजे रावसाहेब शेवाळकर
> तुकाराम परमहंस विरक्त । गोचरस्वामी संन्यास व्रत
> रावसाहेब शेवाळकर पंत । गृहस्थाश्रमी [२]

तुकामाई फार मोठे योगी असले तरी भक्तिभावाला त्यांनी तेवढेच महत्त्व दिले. कोणत्याही भक्ताची कठोर परीक्षा घेतल्याशिवाय ते त्याच्यावर प्रसन्न होत नसत. त्यांच्या परीक्षा घेण्याच्या पद्धती पण विचित्रच असत. कधी ते बेदम मारीत, तर कधी ते प्रेमाने जवळ घेत असत. लोकांना आचरणात आणता येईल अशा भक्तिमार्गाचाच त्यांनी

**१. के. वि. बेलसरे श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज व्यक्ती वाङ्मय, बुकमेलर्स पलो. मुंबई, माकृ. १२, १९९३, पृ. ३७.**
**२. गो. वि. फडके 'सद्गुरुलीलामृत' ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर सेवानिधी, आवृ. ५, १९८१, पृ. ८१, ८५**

उपदेश केला. सुखाने संसार करा पण परमेश्वराला विसरू नका हा त्यांचा महत्त्वाचा संदेश होता. शिष्याच्या आवडीच्या इष्ट देवतेचीच उपासना ते करायला सांगत. त्यांचा मुख्य भर ईश्वरभक्ती, नामस्मरण व अन्नदान या तीन गोष्टींवर होता. याच तीन गोष्टी श्रीगोंदवलेकर महाराजांनी शिरोधार्य मानल्या व आचरणात आणल्या. तुकामाईंनी १८८७ मध्ये येहळेगाव इथे देह ठेवला.

तुकामाईंचे गुरु चिन्मयानंद यांची गादी उमरखेडला अजून चालू आहे. ही गादी संन्याशाचीच आहे. त्यामुळे तिथला उत्तराधिकारी नेहमी संन्यासीच असावा लागतो. तिथे जपजाप्यापेक्षा वैदिक उपासनेला व अन्नदानाला महत्त्व आहे. या मठातर्फे तुकामाईंच्या येहळेगाव येथील मठाची व्यवस्था पाहिली जाते. तुकामाईंचे मठात कोणीही उत्तराधिकारी नाही. तिथे फक्त तुकामाईंची समाधी आहे. या मठाशिवाय पुसद, वाशीम, सिरपूर, हिंगोली, पंढरपूर, मालेगाव, शेवाळ, इटोली इथेही तुकामाईंचे नांवाचे मठ आहेत. [३]

## महाराजांच्या निष्ठावान शिष्यांची परंपरा

शतकानुशतके साधुसंत, महात्मे अज्ञानाचा पडदा दूर करून आपल्यातच स्थित असलेल्या स्वस्वरूपाचे ज्ञान करून घेण्यासाठी इतर अनेक मार्गाबरोबर नामस्मरणाचा मार्ग सांगत आले आहेत. ज्याला अशी ज्ञानप्राप्तीची इच्छा आहे त्याला अध्यात्मात साधक अशी संज्ञा आहे. भगवान कृष्णांनी साधकाचे चार प्रकार गीतेत सांगितले आहेत.

१) आर्त भक्त - संकट निवारण्यासाठी साधना करणारा,

२) जिज्ञासू भक्त - ज्ञान मिळविण्यासाठी झटणारा.

३) अर्थार्थी भक्त - धनप्राप्तीसाठी भजणारा

४) ज्ञानी भक्त - कशाचीच अपेक्षा न करता साधना करणारा

भगवान सांगतात परमेश्वराला सर्व प्रकारचे भक्त आवडतात पण त्यातल्या त्यात त्याला ज्ञानी भक्त जास्त प्रिय असतात. ज्ञानेश्वर महाराजांचे मते हे नाते गाय-वासरा सारखे अतूट असते.

सर्वसाधारणपणाने भक्तिमार्गाकडे अथवा अध्यात्माकडे वळण्याची चार कारणे संभवतात.

१) उपजत कल - काही लोक श्रद्धायुक्त अंतःकरणाने या मार्गाकडे वळतात. त्यांच्यात ही वृत्ती लहानपणापासूनच दिसते.सत्संग मनन, चिंतन ह्या कारणाने साधक पारमार्थिक मार्गाकडे ओढला जातो.

२) पारंपारिक भक्ती - काही लोकांच्या घराण्यात परंपरेने एखाद्या देवतेची भक्ती असते व तीच पुढे वाढते. उदा. पंढरीची वारी.

३) सत्संग - सत्संग कुठल्याही वयात साधकाला अध्यात्ममार्गाकडे वळवितो. त्यातून जिज्ञासा निर्माण होते व साधक त्या मार्गात जातो.

४) आयुष्यात अचानक घडलेल्या घटना - काही वेळा आयुष्यात अशा काही घटना घडतात की साधकाला कळण्याआधीच त्याचे मन अध्यात्माकडे ओढ घेते. या प्रकाराचे शिष्य जवळ जवळ सर्व संतांचे सांनिध्यात असतात. श्रीगोंदवलेकर महाराजांचे शिष्यही अशाच प्रकारचे होते. श्रीमहाराजांना वयाचे सोळावे वर्षी श्रीतुकामाईंकडून अनुग्रह मिळाल्यानंतर त्यांनी गुरूचे आज्ञेप्रमाणे आपला शिष्यपरिवार वाढविला. श्रीमहाराजांनी केलेल्या तीर्थाटणामुळे अक्षरशः लाखो अनुयायी त्यांना मिळाले. या शिष्यांपैकी अनेकजण परमार्थाच्या मार्गात उच्चपदाला, दुसऱ्यांना अनुग्रह देण्याच्या अवस्थेला पोचले. महाराजांची कीर्ति त्यांनी दिगंत वाढविली. अशा काही महत्त्वाच्या शिष्यांच्या कार्याचा आढावा घेता येईल.

### १) ब्रह्मानंद महाराज :

महाराजांचे निकटवर्ती शिष्य म्हणता येईल. विजापूर जिल्ह्यातील जालीहाल गावचे बाळंभट्ट गाडगुळी यांचा मुलगा अनंतभट्ट म्हणजेच ब्रह्मानंद. यांचा जन्म १८५९ मध्ये झाला. लहानपणी विद्याजर्नाकडे अजिबात लक्ष नव्हते. त्यामुळे बाळंभटांनी त्यांची खूप निर्भर्त्सना केली. या अपमानामुळे अनंतभट्टांनी प्राणत्याग करावयाचे ठरवून घर सोडले.देवी बनशंकरीच्या दर्शनाने त्यांनी आत्महत्येचा विचार सोडून विद्यार्जन करण्याचा निश्चय केला. मुळगुंद, गदग इथे राहून वेदाध्ययन केले. तर्कशास्त्र, साहित्यशास्त्र व व्याकरणशास्त्र याचा अभ्यास केला.

याच सुमारास त्यांचे अंगावर कोडाचे पांढरे डाग दिसू लागले. या आघाताने ते अंतर्मुख झाले. त्यांनी आजन्म ब्रह्मचारी राहण्याचे ठरविले. बेलधडी जवळील डोंगरावर जाऊन त्यांनी कठोर तपश्चर्या केल्यानंतर सद्‌गुरु शोधण्याच्या आर्ततेने त्यांनी तीर्थाटण करण्याचे ठरविले. पुण्यासारख्या ठिकाणी संस्कृतप्रेमी पंडितांसमोर त्यांचे संस्कृतमधून भाषण झाले. बडोदा इथेही त्यांचा संस्कृतमधला गाढा अभ्यास व वेदान्तावरील प्रभुत्व पाहून तिथे त्यांचा मोठा सत्कार करण्यात आला. पण सद्‌गुरूच्या भेटीने ते कुठेही राहिले नाहीत. पुढे तर इंदौरला गेले असताना केवळ योगायोगाने त्यांची व गोंदवलेकर महाराजांची भेट झाली. पण अनंतशास्त्रींना महाराजांची योग्यता समजली नाही. जेव्हा त्यांना दत्तात्रेयांचा 'महाराजच तुझे गुरु आहेत' असा दृष्टांत झाला तेव्हा अनंतशास्त्री इंदौरला गेले व महाराजांना भेटले. महाराजांनी त्यांना अनुग्रह देऊन त्यांचे नाव ब्रह्मानंद ठेवले.

ब्रह्मानंदांनी गुरूची प्राणापलीकडे सेवा केली. गुरूच्या आज्ञेनुसार नर्मदातटाकी रामनाममंत्राचे पुरश्चरण केले. महाराजांनी त्यांना कर्नाटकात जाऊन रामनामाचा प्रसार करण्याची आज्ञा केली त्यानुसार ब्रह्मानंदांनी गदग, बेलधडी येथे राहून परत एकदा उग्र तपश्चर्या केली व ते बेलधडीला राहू लागले.

## ब्रह्मानंदांचे कार्य

त्यांनी आपल्या कार्याला बेलधडी येथे श्रीरामाचे मंदिर स्थापून सुरुवात केली. नरगुंद, बिदरहळी, तेरदाळ या गावातून तेरा कोटी नामाचे जपयज्ञ करवून घेतले. वेकंटापूर येथील मंदिराचा जीर्णोद्धार अपार कष्ट घेऊन केला. समर्थांच्या कल्याण स्वामींप्रमाणे ब्रह्मानंदांनी महाराजांची आज्ञा शिरोधार्य मानून राममंदिरे बांधण्यात पुढाकार घेतला

**३. आत्माराम वि. आठवले 'तुकारामचैतन्य महाराज' ब्रह्मानंद महाराज संस्थान, कागवाड द्वि. आवृ. १९९३, पृ. ५७, ५८**

व तिथे रामोपासना अव्याहत सुरू राहील अशी व्यवस्था केली. कर्नाटकात ब्रह्मानंदांचे लाखो शिष्य झाले.

श्रीगोंदवलेकर महाराजांचे निर्वाणानंतर त्यांच्या व्यवस्थापत्राचे मुख्य विश्वस्त म्हणून ब्रह्मानंदांचे नांव होते. व्यवस्थापत्रा प्रमाणे सद्गुरूची समाधि बांधणे, उपासनापद्धती सुरू करणे, याशिवाय महाराजांच्या पादुकांची स्थापना करणे ही अत्यंत महत्त्वाची कामे त्यांनी स्वतः लक्ष घालून करवून घेतली. त्यांनी सुरू केलेला पुण्यतिथीमहोत्सव, नामस्मरण, अन्नदान, पोथीवाचन, नित्यनैमित्तिक कार्यक्रम कीर्तन, भजन अशी नित्यसेवा १९१४ पासून आजतागायत गोंदवले येथे सुरू आहे.

श्रीगुरूंच्या देहावसनानंतर त्यांना जिणे व्यर्थ वाटू लागले. १९१८ पासून ते कागवाड इथे राहू लागले. काही दिवसांनंतर कागवाड इथेच नामस्मरणात तल्लीन असताना त्यांनी आपला देह ठेवला.

ब्रह्मानंद महाराज हे पूर्णत्वाला पोचलेले शिष्य होते. सद्गुरुवर त्यांची नितांत श्रद्धा होती. स्वतः संस्कृत विद्वान असूनही त्यांनी आपल्या ज्ञानाचा कुठेही देखावा मांडला नाही किंवा स्वतःचा नावलौकिक वाढविला नाही. ब्रह्मानंदांना अंगावर कोड आले असल्याची खंत वाटत नव्हती. याबाबत ते एका पत्रात लिहितात, 'श्रीसमर्थ (गोंदवलेकर महाराज) [४] माझ्या अंगावरचे कोड काढतो म्हणाले. मी नको म्हणून प्रार्थना केली. कारण देह चांगला झाला तरी किती दिवस राहणार. श्रीसमर्थांचे दर्शन झाल्यावर उद्धार करा असे मागणे सोडून अशाश्वत मागणे मनात आले नाही.' यावरून त्यांच्या देहातीत मनाची कल्पना येते. ब्रह्मानंदांनी महाराजांचेवर काही अभंग रचले आहेत. या शिवाय मराठी व कानडीमधून बरीच पद्यरचना केलेली आढळते.

## २) आनंदसागर महाराज

आनंदसागरांचे पूर्वाश्रमीचे नाव गोविंद अनंत कुलकर्णी. मूळ गाव अंबड तालुक्यातील मठपिंपळगाव. लहानपणी यांनाही विद्यार्जनाचा कंटाळा होता. पण दासबोधाचे वाचन मात्र आवडीने करीत असत. वडिलांचे मृत्यूनंतर दहाव्या वर्षीपासून गोविंदावर प्रपंचाचा भार पडला. इदौंर इथे रहात असताना त्याला दासबोधाचे वाचनातून सद्गुरु दर्शनाची ओढ लागली.

साधना करीत असताना एकाएकी त्यांना श्रीगोंदवलेकर महाराजांचे दर्शन झाले व त्यांनी गोविंदाला 'मला भेटायला ये' असा संकेत दिला. गोविंदाने महाराजांचा ठावठिकाणा शोधण्यात यश मिळविले आणि इंदौर इथे महाराजांची भेट घेतली. महाराजांच्या अनुग्रहानंतर त्याने उज्जैनी इथे कठोर साधना केली. साडेतीन कोटी जप फक्त साडेचार वर्षांत पुरा केला. त्याची अध्यात्मातील एकूण प्रगती पाहून महाराजांनी त्याला आनंदसागर हे नाव दिले.

## आनंदसांगरांचे कार्य

गुरु आज्ञेप्रमाणे आनंदसागरांनी स्वतःच्या अंबड गावी महाराजांनी दिलेल्या राममूर्तींची स्थापना करून तिथे १८९३ मध्ये राममंदिर स्थापून रामनामाचा प्रसार मराठवाड्यात केला. जालना इथे भिक्षा मागून ते संन्यस्त वृत्तीने रहात असत. महाराजांच्या आज्ञेने त्यांच्याच हस्ते आनंदसागरांनी १८९६ मध्ये राममंदिर बांधले. ब्रह्मानंदासारखीच आनंदसांगरांची इच्छा आजन्म ब्रह्मचारी राहून महाराजांची सेवा करावी अशी होती, पण गुरुआज्ञेवरून त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला.

आनंदसागरांचे आयुष्य अगदी थोडे, फक्त ३५ वर्षांचे होते. १९०७ नंतर त्यांनी नांदुरा इथे देह ठेवला. गुरुभेटीनंतरच्या १९ वर्षांत त्यांनी आपले सर्व आयुष्य रामनामाचा प्रसार करण्यात घालविले. तेरा कोटी रामनामाचा जप व दोन राम मंदिरांची स्थापना हे पंथाच्या दृष्टीने फार महत्त्वाचे कार्य आहे. त्यांचे शिष्यही फार थोडे होते. प्रसिद्धी पराङ्मुख स्वभावामुळे फारसा लोकसंग्रहही नव्हता. त्यांनी काही अभंग, पदे, भूपाळी अशी थोडी रचना केली.

## ३) रामानंद बुवा

आनंदसागरांनी स्थापन केलेल्या जालना येथील राममंदिरात त्यांचे जावई रामानंदबुवा यांनी फार महत्त्वाचे काम केले. त्यांचा जन्म १८८६ मधला. त्यांना रामदासी पंथाची दीक्षा अंबादास महाराजांनी दिली व पुढील कार्यासाठी आनंदसागर व श्रीगोंदवलेकर महाराजांकडे पाठविले. महाराजांनी रामानंदांना तीर्थाटन करण्याची व भरपूर नामस्मरण करण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे त्यांनी चारीधाम, ज्योतिर्लिंगे, गंगा प्रदक्षिणा इ. यात्रा केल्या. त्यानंतर श्रीब्रह्मचैतन्यांनी त्यांना आपली कफनी, कुबडी, टोपी दिली व तुळशीची माळ गळ्यात घालून त्यांना आपल्या जवळचे रामपंचायतन दिले व अनुग्रह देण्याचा अधिकार दिला.

रामानंदांनी जालना येथील राममंदिराचा विस्तार केला. प्रसन्न व्यक्तिमत्त्व, मधुर वाणी, मार्दव, बुद्धिचातुर्य या गुणांमुळे रामानंदांचा शिष्यपरिवार मोठा आहे. वऱ्हाडामध्येही त्यांनी आपले कार्य केले. त्यांचे महत्त्वाचे शिष्य म्हणजे १) वामन कृष्ण आचार्य, २) बाबासाहेब मेरेकर, ३) उत्तमराव देशमुख, ४) प्रल्हाद महाराज साखरखेडकर. रामानंदांनी गोंदवले इथे चैतन्यमय वातावरणात १९३० साली देह ठेवला.

रामानंदांच्या निर्वाणानंतर जालना मंदिराची व्यवस्था वे. शा. सं. नानाचार्य यांनी पाहिली. नानाचार्य चांगले विद्वान होते. त्यांनी ब्रह्मचैतन्यांचीच गुरुपरंपरा चालू ठेवली. राममंदिरात नामोपासना चालू ठेवली व आजूबाजूच्या खेड्यातून रामनामाचा प्रसार केला. नानाचार्यांनंतर रामानंदांचे शिष्य प्रल्हाद महाराजांना जालना हीच आपली कर्मभूमी करावयाची होती पण शिष्यांच्या आग्रहामुळे ते साखरखेडा इथेच राहिले. प्रल्हादबुवांनी विदर्भात रामनामाचा प्रसार मोठ्या प्रमाणावर केला. लाखो मुमुक्षूंना रामनामाची उपासना दिली. लीनता, गुरुभक्ती, स्वधर्माचरण, व्रतपालन ह्या गुणांच्या संगमाने ते परिपूर्ण होते. १९७९ मध्ये गोंदवलेकर महाराजांच्या परंपरेतील या थोर शिष्याचे देहावसान झाले. श्रीगोंदवलेकर महाराजांच्या शिष्यपरंपरेतील या सर्व शिष्यांनी

**४. 'श्रीराम मंदिर जालना स्मरणिका', चैतन्योपासना गोंदवले १९९६**

गुरूच्या इच्छेप्रमाणे रामनामाचा प्रसार खेडोपाडी करून आपली परंपरा जतन केली. आनंदसांगरांपासून सुरू झालेली परंपरा प्रल्हाद महाराजांपर्यंत अतूटपणाने सुरू राहिली. यातून या सर्व शिष्यांचे आपल्या गुरूवरचे व परात्पर गुरूवरचे निस्सीम प्रेम व अनन्य भक्ती दिसून येते. जालना इथे श्रीगोंदवलेकर महाराजांनी आपली शिष्य परंपरा आनंदसागरापासून सुरु केली. तेव्हापासून सुरु असलेले रामनामाच्या प्रसाराचे काम आजपर्यंत म्हणजे १०० वर्षांहून जास्त काळ अव्याहतपणे सुरू आहे. या कार्यावरून श्रीगोंदवलेकर महाराजांची लोकप्रियता व नामभक्तीबद्दल जनमानसात झालेली जागृती प्रकर्षाने दिसून येते.

## ४) श्रीमहाभागवत डॉ. कूर्तकोटी

कर्नाटकातील धारवाड जिल्ह्यातील गदग तालुक्यातील कूर्तकोटी या गावी महाभागवतांचा जन्म झाला. यांचे मूळचे नाव लिंगनगौडा मेलगिरीगौडा पाटील. पाटीलघराणे मूळचे सुसंस्कृत असल्याने लिंगनगौडावर चांगले संस्कार झाले व विद्यासंपादनाची आवड लहानपणापासूनच उत्पन्न झाली. शालेय शिक्षणाबरोबरीने संस्कृतचे अध्ययनही लिंगनगौडाने आवडीने केले. कॉलेजचे उच्च शिक्षण पुणे येथील डेक्कन कॉलेजमध्ये पुरे केले. त्यानंतर वेदशास्त्र, न्यायशास्त्राचा अभ्यास कलकत्ता इथे पुरा केला. त्या वेळी स्वामी विवेकानंदांच्या विचाराने प्रभावीत होऊन धर्मप्रसारासाठी आयुष्य खर्ची घालावे या विचाराने ते वेदांत व दर्शनशास्त्राच्या अभ्यासासाठी काशीला पोचले. काशीक्षेत्री राहून सर्व अभ्यास पूर्ण झाल्यावर त्यांनी भरपूर ग्रंथलेखनही केले. याच काळात म्हणजे अंदाजे १९०३-१९०४ च्या सुमारास लिंगनगौडांची व ब्रह्मानंदांची भेट झाली. एवढ्या ज्ञानसंपादनानंतरही त्यांच्या मनाला कुठेतरी अपूर्णतेची रुखरुख होती. या मनाच्या अस्वस्थ भावनेत ते ब्रह्मानंदांबरोबर बेलधडीला श्रीमहाराजांच्या दर्शनास गेले. प्रथम दर्शनीच ते महाराजांकडे आकर्षित झाले. पण तिथे रहावे की परत जावे या विचारात असतानाच श्रीमहाराजांनी शक्तिपातयोगाने त्यांची समाधी लावली. हाच अनुभव लिंगनगौडांना हवा होता. वेदांताचा अभ्यास केलेल्या शिष्याला योग्य ती अनुभूती महाराजांनी दिली. शक्तिपाताच्या या अनुभवानंतर लिंगनगौडा गोंदवल्यात राहिले. त्यांच्या उच्च शिक्षणामुळे महाराज त्यांना महाभागवत म्हणत असत. त्यांचा व महाराजांचा सहवास ९ वर्षे घडला.

गोंदवल्यात असताना महाभागवत महाराजांचे बरोबर शाश्वत समाधान, अविद्या, वेदांताची तत्त्वे इ. गहन विषयांवर चर्चा करीत असत. महाभागवतांनी महाराजांची अगदी मन लावून निरपेक्ष सेवा केली. पहाटे तीन वाजल्यापासून ते रात्री झोपेपर्यंत ते सदैव महाराजांचे सेवेत असत. महाराजांकडून ब्रह्मज्ञान मिळविण्याची त्यांची तीव्र इच्छा होती. गोंदवल्यात असताना आपण स्वतःचे रहात नसल्याची कबुली त्यांनी अनेक वेळा दिली आहे.

श्रीमहाराजांच्या निर्वाणाच्या आधी थोडे दिवस कूर्तकोटींनी गोंदवल्यात राहून तिथली व्यवस्था पहावी असे महाराजांनी त्यांना सुचविले होते. पण कूर्तकोटींच्या मनात काही वेगळ्या कल्पना होत्या. त्यांना रामकृष्ण मिशनसारखे काम करावयाचे होते. महाराजांच्या परवानगीने त्यांनी आपले क्षेत्र निवडले. ते कोल्हापूरला गेले. टिळकांच्या संमतीने त्यांनी १९१७ साली करवीरपीठाचे शंकराचार्य म्हणून सूत्रे घेतली. शंकराचार्य झाल्यावर त्यांनी संस्कृतच्या प्रसारासाठी खूप प्रयत्न केले. गीतेवर इंग्रजीमध्ये 'Heart of the Bhagvat Gita' हा प्रबंध लिहिला. या प्रबंधाला अमेरिकन विद्यापीठाकडून Ph.d पदवी मिळाली. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर पुणे, संस्कृत ॲकेडमी बंगलोर या संस्था स्थापन करण्यात त्यांचा फार मोठा वाटा होता. ब्रह्मसूत्र शांकरभाष्यावरील वाचस्पती मिश्रांची भामती नावाची टीका समजावून सांगण्यात त्यांचा हातखंडा होता. भारतात त्या वेळी वेदांताचे खरे मर्म जाणणारे जे काही थोडे विद्वान होते त्यापैकी डॉ. कूर्तकोटी होते. सिद्धांतसार हा संस्कृतमधील त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

करवीरचे शंकराचार्य असताना त्यांचे व शाहुराजांचे दुमत झाल्याने त्यांना त्या पदाचा त्याग करावा लागला. त्या वेळी झालेल्या मानसिक त्रासात श्रीमहाराजांनी मदत केल्याचे डॉ. कुर्तकोटींनी स्वतः डॉ. अंतरकरांचे जवळ म्हटले अहे. १९१८ नंतर ते नाशिक येथे जाऊन राहिले. तिथून त्यांनी. समाजपुनर्रचनेच्या व अस्पृशता निवारणाच्या कार्याला प्रारंभ केला. धर्मांतर केलेल्या हिंदूंचे शुद्धीकरण करण्यातही त्यांचा पुढाकार होता.

१९१३ साली श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर कूर्तकोटींना आपण महाराजांची आज्ञा पाळली नाही याचे खूप दुःख झाले. महाराजांच्या समाधीवर ठेवण्यासाठी त्यांनी आपल्या जवळच्या महाराजांनी दिलेल्या पादुका दिल्या. त्याच वेळेस सध्या तिथे असलेली गोपालकृष्णाची मूर्तीदेखील त्यांनी जयपूरहून करवून आणली. श्रीमहाराजांचे निर्वाणानंतर ते काही वर्षे पुण्यतिथीच्या कार्यक्रमासाठी नियमित येत असत.

डॉ. कूर्तकोटींनी आपले कार्यक्षेत्र वेगळे निवडले असले तरी श्रीगोंदवलेकर महाराजांचेवर त्यांची पूर्ण निष्ठा होती. त्यांनी रचलेल्या पदांतून त्यांच्या भावविश्वाचा व निर्मळ मनाचा साक्षात्कार होतो. त्यांचे अंतःकरणात सदैव महाराजांचे स्मरण असल्याचे त्यांनी अनेक वेळा प्रदर्शित केले आहे. आपल्या भाषणातून ते महाराजांचेच विचार प्रवर्तित करीत असत. एका भाषणात ते म्हणतात, 'परमेश्वरापासून आलेले नामरूप प्रवृत्तीपासून भिन्न असले तरी ब्रह्मापासून भिन्न नाही. नामच ब्रह्म आहे. किती महती आहे या नामाची ? नाम घेता घेता रूप आठवू लागते. नामरूप एकच आहे. रामराम म्हटल्यावर रूप [५] आपोआपच प्रकट होते. ध्यान मनाने करावे लागते. जो मनाने नाम घेतो त्याला मुखाने घ्यावे लागत नाही. जो श्वासाबरोबर नाम घेतो त्याचे नाम अखंडच चालते.'

अशा तऱ्हेचे नामाबद्दलचे विचार ते वारंवार सांगत असत. महाराजांच्या मोठेपणाबद्दल सांगताना डॉ. कूर्तकोटी म्हणतात, 'मी

**५. शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी 'विल्पपे' सद्गुरु महाभागवत सेवक मंडळ, १९९१, पृ. १४, १६, १७.**

महाराजांच्याकडे आल्यावरच जगत्गुरु शंकराचार्यांना काय म्हणावयाचे आहे ते मला समजले. शंकराचार्यांनी जे संस्कृतमध्ये सांगितले ते महाराज मराठीत सांगत होते.' आपल्याला आत्मज्ञान प्राप्त [६] व्हावे असे त्यांना मनापासून वाटत असे. त्यासाठी त्यांनी महाराजांची जीवापलीकडे सेवा केली. श्रीमहाराजांबद्दल आलेले अनेक अनुभव डॉ. कूर्तकोटींनी डॉ. वा. रा. अंतरकरांना स्वतः सांगितले आहेत त्यामुळे त्याच्या विश्‍वासार्हतेबद्दल शंका ठेवण्याचे कारण नाही. डॉ. कूर्तकोटींनी १९६९ साली देह ठेवला.

## ५) कृष्णशास्त्री उप्पनबेटीगिरी

कृष्णशास्त्री कर्नाटकातील अतिशय गाढे पंडित. त्यांना म्हैसूर दरबाराने 'विद्वनमुकुटमणी' ही पदवी देऊन गौरविले होते. वेदांतावरच्या सर्व ग्रंथावर त्यांचे प्रभुत्व होते. ब्रह्मानंदांमुळे ते श्रीमहाराजांचे सहवासात आले. बेलधडी येथे त्यांची व श्रीमहाराजांची वेदांतावरील गहन विषयावर तीन तास चर्चा झाली. चर्चेनंतर शेवटी कृष्णशास्त्री महाराजांना शरण गेले व त्यांनी श्रीमहाराजांचा ताबडतोब अनुग्रह घेतला. महाराजांचे बरोबर त्यांनी अनेकदा तीर्थयात्रा केलेली आहे. त्यांची, महाराजांची व मदनमोहन मालवीय यांची बऱ्याचदा भेट झाल्याचा उल्लेख सापडतो. धारवाडहून ते वारंवार गोंदवल्यास येत असत. १९२२ साली त्यांनी देह ठेवला.

## ६) श्री. भाऊसाहेब केतकर

भाऊसाहेब केतकर वयाचे २५ वर्षापासून महाराजांचे शिष्य. त्यांचा व महाराजांचा निकटचा सहवास मात्र त्यांच्या निवृत्तीनंतर आला. भाऊसाहेब त्या काळातले इंजिनीयर होते. वयाचे ६० वर्षानंतर म्हणजे १९०४ मध्ये त्यांनी सर्व व्याप सोडून ते महाराजांची सेवा करण्यासाठी गोंदवल्यास येऊन राहिले होते. श्रीमहाराजांचे विषयी त्यांचे मनात कमालीचा आदर व नितांत श्रद्धा होती. त्यामुळे त्यांच्या आयुष्यातले सर्व निर्णय महाराजांचे आज्ञेने होत असत. त्यांच्या वागण्यात, बोलण्यात अत्यंत नम्रता व लीनता होती. त्याचा दंभ, अहंकार पूर्णपणाने नाहीसा झाला होता असे म्हणण्यात अतिशयोक्ती नाही. सतत नामस्मरण, अडलेल्यांना मदत व अन्नदान या महाराजांना आवडणाऱ्या गोष्टी ते आनंदाने करीत असत. महाराजांच्या निर्वाणानंतरही २६ वर्षे ह्या गोष्टी त्यांनी चालू ठेवल्या होत्या.

## ७) श्री. तात्यासाहेब केतकर

श्री. तात्यासाहेब केतकर हे भाऊसाहेबांचे चिरंजीव. वडिलांच्या सारखेच महाराजांचे निस्सीम भक्त. श्रीमहाराजांचे देहावसनानंतर १२ वर्षांनी श्री. तात्यासाहेब केतकरांचे मुखातून महाराज बोलत होते. या विशेष घडलेल्या गोष्टीचा उहापोह इतरत्र आलेला आहेच. तात्यासाहेब म्हणजे महाराजांचा दुसरा अवतार असेच सर्व सांप्रदायिक मानतात. या अवताराद्वारे त्यांनी १९२५ ते १९६७ या काळात रामनामाच्या उपासनेचे व प्रसाराचे काम अव्याहतपणे चालू ठेवले. तात्यासाहेबांचा गृहस्थाश्रम एखाद्या योग्यालाही लाजवेल असा होता. प्रपंचातून ते मनाने पूर्णपणाने मुक्त होते. महाराजांनी सांगितल्याप्रमाणे ते सर्व संसाराचा भार श्रीरामावर ठेऊन वागत होते. सौ. यमुनाबाई ऊर्फ ताई या तात्यासाहेबांच्या पत्नीही श्रीमहाराजांच्या भक्त होत्या. त्यांची पारमार्थिक प्रगती पण उच्च पातळीवरची होती.

या शिष्यांशिवाय महाराजांचे अनेक महत्त्वाचे शिष्य होते. त्यांची माहिती श्री. गो. वि. फडके यांनी सद्‌गुरुलीलामृतात आठव्या अध्यायाच्या तिसऱ्या समासात दिली आहे.

## ८) विष्णुबुवा कुंभोजकर

ध्यानीमनी नसताना त्यांची व महाराजांची भेट झाली. प्रथम भेटीतच ते महाराजांच्याकडे आकृष्ट झाले. त्यांनी महाराजांना अनुग्रह देण्याविषयी विनंती केली. महाराजांनी त्यांना त्यांच्या पहिल्या गुरुमंत्राची आठवण करून देऊन त्यांचा पहिला शिवाचाच मंत्र दिला. श्री. महाराजांच्या आज्ञेनुसार त्यांनी अनेक तीर्थयात्रा केल्या व नंतर वऱ्हाडात सेंदूरजणी येथे आपला मठ स्थापन केला व महाराजांची रामोपासना वाढविली.

## ९) तम्मणाशास्त्री नवलगुंद

मूळचे हुबळी येथे राहणारे. महाराजांच्या सानिध्यात राहून त्यांची खूप सेवा केली व अनुग्रह प्राप्त करून घेतला. हुबळी येथे महाराजांच्या आज्ञेने मठ स्थापला व रामभक्ती वाढविली. यांचा शिष्य-परिवार फार मोठा नव्हता. यांनाच सच्चिदानंद म्हणतात. यांनी श्रीमहाराजांचे बरोबर अनेक यात्रा केल्या. श्रीमहाराजांनी तम्मणांना आपल्या जवळील सिद्धीने क्षणार्धात रामेश्‍वरास नेल्याचा उल्लेख मिळतो.

## १०) विश्‍वनाथ

आटपाडीस राहून महाराजांची आज्ञा पाळली. तिथे राममंदिर स्थापन करून मंदिरात नित्यनेम चालू केले व आपला शिष्यगण मोठ्या प्रमाणावर वाढविला.

## ११) दामोदरबुवा कुरवलीकर

कुरवली या गावाचे गोसावी होते. महाराजांचे सेवेत २४ वर्षे राहिले. अत्यंत निष्ठेने महाराजांची सेवा केली. जे मिळेल ते घ्यावे व आनंदाने रहावे अशी विशेष वृत्ती होती. महाराजही त्यांच्या सेवेवर खूष होते. काही काळपर्यंत ते गोमेवाडी येथे राममंदिराची व्यवस्था पहात होते. पुढे कुरवलीस आपले राममंदिर बांधले व तिथेच रामनामाचा प्रसार केला. त्यांचेही अनेक शिष्य नावारूपाला आले. त्यापैकी बेळगावचे श्रीकाणे महाराज एक आहेत.

---

**६. डॉ. वा. रा. अंतरकर 'गोंदवले महाराजांचे काही शिष्य' त्रिदल प्रका. १९८९, पृ. ४७.**

श्रीगोंदवलेकर महाराजांनी सर्वच शिष्यांना अनुग्रह देण्याचा अधिकार दिलेला नव्हता. असा अधिकार त्यांनी ब्रह्मानंद, आनंदसागर, महाभागवत, रामानंद, कृष्णशास्त्री, विश्वनाथ, विष्णुबुवा कुंभोजकर, तम्मणाशास्त्री व दामोदरबुवा कुरवलीकर या नऊ शिष्यांना दिला होता.

## १२) श्री काणे महाराज

काणे महाराजांचे प्रत्यक्ष गुरु श्रीगोंदवलेकर महाराज नसले तरी त्यांच्या आयुष्यात घडलेल्या महत्त्वाच्या घटनांत श्रीमहाराजांना अनन्य महत्त्व होते. काणे महाराजांनी श्रीगोंदवलेकर महाराजांचीच रामनामसाधनाच अंगिकारीली. यामुळे त्यांच्या कार्याचा विचार करणे आवश्यक आहे.

काणे महाराजांचे मूळ गाव कोकणातले तुळशी मातुंडी. त्यांचा जन्म २३.१.१८९७. घराण्यात दत्तभक्ती असल्याने त्यांचे नाव श्रीपाद होते. लहानपणी परमेश्वराकडे विशेष ओढा नव्हता. १९०८ च्या सुमारास श्रीगोंदवलेकर महाराज बेळगावास आले होते. त्या वेळी अनेकांनी त्यांचा अनुग्रह घेतला. काणेबुवाही त्यांच्या समोर गेले तेव्हा श्रीमहाराज त्यांना म्हणाले, 'तुम्हाला अजून वेळ आहे. नामस्मरण चालू ठेवा. योग्य वेळ आल्यावर आम्हीच दुसऱ्याकरवी अनुग्रह देऊ.'

या प्रसंगाचा काणेबुवांवर विलक्षण परिणाम झाला. त्यांची नामस्मरणावरील श्रद्धा वाढली. त्यांचे सतत नाम सुरू झाले. १९२५ मधे एक विशेष घटना घडली. श्रीगोंदवलेकर महाराजांनी सांगितल्याप्रमाणे काणेबुवांची अनुग्रहाची वेळ आली. श्रीमहाराजांचे शिष्य श्रीदामोदर बुवा कुरवलीकर बेळगावला आले होते. मधल्या काळात काणेबुवांचा व श्रीगोंदवलेकर महाराजांचे शिष्य बाळ मलवडीकर ऊर्फ योगानंद यांचा संबंध दृढ झाला होता. त्यांच्या सूचनेवरून काणेबुवा श्रीदामोदरबुवांकडे गेले. श्रीगोंदवलेकर महाराजांचे आज्ञेवरून श्रीदामोदरबुवांनी काणे बुवांना त्रयोदशाक्षरी राममंत्राचा अनुग्रह दिला व रामोपासनेचा प्रसार करण्याची आज्ञा केली [७]

श्रीकाणे महाराजांनी आपली गुरुपरंपरा अशी सांगितली आहे -

आदिनारायण - ब्रह्मदेव - हंस - वसिष्ठ - रामचंद्र - रामदास स्वामी - कल्याण - बाळकृष्ण - चिंतामणी - तुकामाई - ब्रह्मचैतन्य - दामोदरबुवा - विवेकानंद (काणे महाराजांचे [८] सांप्रदायिक नाव)

यावरून ते श्रीगोंदवलेकर महाराजांच्याच संप्रदायाचे होते हे सहज स्पष्ट होते. अनुग्रहानंतर काणे महाराजांची उपासना अधिक प्रभावीपणे होऊ लागली. श्रीगोंदवलेकर महाराज त्यांना वारंवार मौलिक सूचना देऊन त्यांच्याकडून साधना व इतर कार्य करून घेत होते. त्या सूचनांप्रमाणे काणे महाराजांनी गोशाळा सुरू केली. ते पण श्रीमहाराजांप्रमाणे कसायाकडून गाई सोडवून आणत असत. काणेबुवांना अनुग्रह दिल्यानंतर थोड्याच दिवसांत श्रीदामोदरबुवांचे देहावसान झाले. त्यानंतरचे बरेच मार्गदर्शन योगानंदांचे कडून झाले. काणेबुवांच्या साधनेच्या काळात प्रत्यक्ष श्रीगोंदवलेकर महाराजांचे दर्शन त्यांना झाले व श्रीरामाचे दर्शनही त्यांना महाराजांनी घडविले असे काणेबुवांनी त्यांच्या शिष्यांना सांगितल्याचा उल्लेख सापडतो.

श्रीमहाराजांनी काणेबुवांच्या हातून मौलिक लेखनही करवून घेतले. श्रीसमर्थांच्या मनाच्या श्लोकावरील काणे महाराजांनी केलेले विवेचन श्रीमहाराजांचे आज्ञेवरून आहे असे काणे महाराजांनी म्हटले आहे.

श्रीमहाराजांनी काणे बुवांना इतरांना अनुग्रह देण्याची परवानगी दिली व त्यानंतरच ते इतरांना अनुग्रह देऊ लागले. मंत्र देण्यापूर्वी काणे महाराज साधकाकडून श्रीगोंदवलेकर महाराजांची पूजा करवून घेत असत व श्रीमहाराजांच्या आज्ञेने मंत्र देत असत. श्रीकाणेबुवा सर्वकाही श्रीमहाराजांचे आज्ञेनेच करीत असत, असे त्यांनी वारंवार म्हटले आहे व तसा उल्लेख त्यांच्या चरित्रातही मिळतो.

श्रीकाणे महाराजांनी प्रसिद्ध पुढारी लोकनायक श्री. बापुजी अणे यांना एक पत्र [९] लिहिले होते. त्यात त्यांनी श्री. अणे यांना आपल्याजवळ असलेल्या युद्धवशविद्येचा उपयोग करून दुसऱ्या महायुद्धात कठीणप्रसंगी दैवी उपायांनी शत्रूचा हल्ला परतवून लावण्याची परवानगी मागितली होती. ही विद्या व राजवशविद्या आपल्याला श्रीगोंदवलेकर महाराजांनी दिल्या असल्याचे स्पष्टपणाने म्हटले आहे. या विद्या कशा वापरायच्या व केव्हा वापरायच्या हे पण गुरूंनी सांगितल्याचे म्हटलें आहे. या पत्रावरून दोन गोष्टी सिद्ध होतात. एक म्हणजे श्रीगोंदवलेकर महाराजांचा योगविद्येतील अधिकार मोठा होता व त्यांची आणि काणे महाराजांची वैचारिक पातळीवरची देवाण-घेवाण श्रीगोंदवलेकर महाराजांच्या देहावसनानंतरही सुरू होती. या तऱ्हेच्या आध्यात्मिक विचारांचे संक्रमण श्रीमहाराज आपल्या इतर शिष्यांच्या बरोबरही करीत असल्याचे उल्लेख मिळतात.

श्रीगोंदवलेकर महाराजांनी रामनामाच्या प्रसाराचे काम कर्नाटकात ब्रह्मानंदानंतर काणेमहाराजांकडून करवून घेतले. श्रीकाणेबुवांचे बेळगाव, आसपासच्या भागात व महाराष्ट्रात बरेच शिष्य आहेत. श्रीकाणेबुवांनी श्रीमहाराजांचे आज्ञेवरून भागवताचे हवन, सहस्त्र चंडी हवन, श्रीसूक्ताचे हवन, अयुतरुद्रावर्तने व अनेक नामसप्ताह केले. श्रीकाणे महाराज श्रीगोंदवलेकर महाराजांना गुरुस्थानीच मानीत असत. श्रीकाणेबुवांच्या चरित्रामधून ह्या सर्व गोष्टींची नोंद स्पष्टपणाने सापडते.

आजही बेळगाव इथे श्रीकाणे महाराजांनी स्थापलेल्या मठात श्रीरामाचे मंदिरात रामनामाची उपासना केली जाते. अन्नदान, भजन, कीर्तन अशी नित्य उपासना केली जाते.

सौ. आशा परांजपे
ए २२, अभिमानश्री सोसायटी,
पाषाण रोड, पुणे ४११ ००८.

**७. श्री. वसंतराव गोखले 'परमचैतन्य सद्‌गुरु श्री. काणे महाराज चरित्र' गुरुदरबार सेवा मंडळ, बेळगाव. १९९४, पृ. ४६.**
**८. तत्रैव, पृ. २२६.**
**९. श्री. वसंतराव गोखले 'परमचैतन्य सद्‌गुरु श्री. काणे महाराज चरित्र' गुरुदरबार सेवा मंडळ, बेळगाव, १९९४, पृ. २३१.**

# श्रीसद्गुरु ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांनी सांगितलेले स्वानंदाचे तत्त्वज्ञान


**डॉ. मधुसूदन बागडे**

*एम्.एस्सी. (गणित व संख्याशास्त्र), पीएच.डी.(व्यवस्थापनशास्त्र), चार्टर्ड इन्स्टिट्यूट ऑफ ट्रान्सपोर्ट (लंडन) चे सदस्य. पोस्ट डॉक्टोरेल ट्रेनिंग इन् मॅनेजमेंट (स्वीडन), आय्.एल्.ओ. (फेलोशिप) पुणे विद्यापीठाला संलग्न असलेल्या इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट एज्युकेशन (एम्.बी. ए. इत्यादी) चे संचालक, केन्द्रिय वाहतुक संशोधन संस्थेचे सहसंचालक. भारत सरकार व महाराष्ट्र सरकार यांनी नेमलेल्या अनेक तज्ज्ञ समितीचे सदस्य. श्रीगोंदवलेकर महाराजांचा अनुग्रह १९७५*


श्रीसद्‌गुरु महाराजांचे इतका, खरोखर, परमार्थ कोणी सोपा करून सांगितला नसेल. सामान्यातल्या सामान्य माणसाला व अडाण्यातल्या अडाण्याला तो त्याच्या परीने सांगत असत. ते म्हणत, 'ज्ञान तीन प्रकारचे. जे जसे आहे ते तसे कळणे हे ज्ञान, जे जसे आहे ते तसे न कळणे हे अज्ञान व जे जसे आहे ते त्या ऐवजी भलतेच वाटणे हे विपरीत ज्ञान होय.' या तीन प्रकारांमध्ये ज्याला ज्ञान म्हटले आहे ते तत्त्वज्ञान, तत्त्वाचे ज्ञान ते तत्त्वज्ञान. हे जे ईश्वरी किंवा परमात्म तत्त्व विश्वामध्ये भरून राहिले आहे ते 'सत्' आहे. ते कधीही बदलत नाही म्हणून तत्त्वज्ञानसुद्धा स्थल, काल, परिस्थिती यामध्ये कितीही फरक पडला तरी ते बदलत नाही. ते सदैव तेच ते असते. स्थल व कालानुरूप त्याची परिभाषा बदलेल पण तत्त्व बदलत नाही. म्हणूनच ५,००० वर्षांच्या कालखंडामध्ये वेद, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे, भगवद्‌गीता, 'ज्यू' चा जुना करार, बायबल, अवेस्ता, कुराण तसेच ७०० वर्षांनंतर ज्ञानेश्वरी व ३०० वर्षांनंतर दासबोध, तुकाराम गाथा हे वाङ्मय स्थलकालातीत आहे.

मनुष्य हा प्राणी आहे पण तो विचारशील प्राणी आहे. इतर काही प्राण्यांमध्ये काही प्रमाणात का होईना विचारशक्ती आढळते मात्र माणसाचे वैशिष्ट्य हे की मनुष्याला आपण माणूस आहोत ही जाणीव आहे तशी इतर कोणतेही प्राण्याला नाही. मनुष्य आपले ध्येय ठरवू शकतो. इतर सर्व प्राणी जन्माला येतात आणि मरेपर्यंत जगतात ते जन्मभर फक्त क्षुधा, तृष्णा, निद्रा, आळस, मैथुन व भय एवढ्याच गोष्टी जगण्याठी त्यांना लागतात. सर्व चराचर सृष्टी निर्माण करूनसुद्धा ईश्वराचे समाधान झाले नाही त्याला ते अपूर्ण वाटले. त्याला पूर्णत्व देण्यासाठी ईश्वराने मनुष्य निर्माण केला तो स्वतःचे अंशामधून (तत् अंशेन) निर्माण केल्यामुळे त्याला ईश्वरीय अंशमात्र शक्ती प्राप्त झाल्या. त्यामध्ये ईश्वराची निर्मितीची शक्ती प्राप्त झाली म्हणजेच निर्मितीसाठी आवश्यक असणारी प्रेरणा किंवा इच्छा, प्रज्ञा किंवा बुद्धी व सत्ता याचे वरदान प्राप्त झाले.

मानवाच्या या शक्तिमुळे त्याने काही अंशी निसर्गावर विजय मिळवला. उत्तम दळण-वळण साधण्यासाठी त्याने स्वयंचलित वाहने, रेल्वे व आकाश मार्गासाठी विमाने निर्माण केली. उत्पादन वाढवण्यासाठी विविध प्रयोग करून बी-बियाणे, खते निर्माण केली. कापूस बाजूला ठेऊन कृत्रिम धाग्यातून वस्त्र निर्मिती केली. शहरात भूमी कमी पडते म्हणून अनेक मजली सिमेंटची घरे निर्माण केली. आरोग्य व आयुष्य वाढीसाठी विविध औषधे निर्माण केली. करमणुकीसाठी आकाशवाणी, दूरदर्शनची सोय झाली. विज्ञान आणि तंत्रज्ञानाने ईश्वरासारखी प्रतीसृष्टी निर्माण करणेची किमया केली व सर्व सुखाची साधने निर्माण केली. या सर्वांचा केंद्रबिंदू म्हणजे 'मी' आणि 'माझा देह' व माझ्या देहाचे सुख ते माझे सुख. माझ्या सुखाची ती सर्व चांगली व माझ्या सुखाला अडथळा आणणारी ती सर्व वाईट (दुष्ट). निसर्गावरील विजय व आधुनिक विज्ञानाने मानव जडवादी (मटेरिॲलिस्ट) झाला. भोगवाद हा भौतिकवादाशी संलग्न असल्याने विज्ञानाचे प्रगतीबरोबर घट्ट होत जातो.

अशा प्रकारे माणूस हा जास्त जास्त आत्मकेंद्रित होऊ लागला व अत्यंतिक स्वार्थी आणि संकुचित वृत्तीचा झाला. ज्या वेळी हा स्वार्थ पराकोटीचा बळावतो तेव्हा स्वार्थ पुरवण्यासाठी तो कोणत्याही थराला जाऊ शकतो. आजच्या जीवनामध्ये स्पर्धा, संघर्ष व असुरक्षितता एवढी आहे की माणसामधील 'माणूसपण' शोधावे लागते. त्यामुळेच भ्रष्टाचार, अनाचार, वैराचार, सुडाचार व स्वैराचार यांनी मानवी जीवन प्रदूषणयुक्त झाले आहे. शुचिता आणि मूल्ये यांना मूठमाती मिळाली आहे. सुखाची साधने जमा करणे यातच सुख आहे अशी धारणा झाली आहे व ती मिळवण्यासाठी जे प्रमुख साधन लागते तो म्हणजे 'पैसा' आणि हाच 'साध्य' झाला आहे. या पैशातून सुखोपभोग, ऐषाराम व त्यातून पोसणारा चंगळवाद हे आजचे ब्रीद झाले आहे. कोणाला कोणासाठी वेळ नाही व विज्ञानाने जीवनाला गती लाभली व अधिकाधिक सुखाच्या साधनासाठी 'रॅट रेस' (उंदरांची शर्यत) सुरू झाली. या तथाकथित 'फास्ट लाईफ' बरोबर दुसरी म्हणजे 'डिस्पोजेबल' (वापरा व फेकून द्या) संस्कृती पण आली. आपल्याला जन्म देणारे आई-वडीलसुद्धा 'डिस्पोजेबल' संस्कृतीत बसू लागले. या सर्व प्रकारामुळे माणूस हा स्पर्धा, संघर्ष व असुरक्षितता यांनी ग्रासून त्याचे सुखाऐवजी काळजी, दुःख आणि भ्रम हे त्याचे वाट्यास येते.

आयुष्यात यश म्हणजे काय व ते मिळाल्यावर समाधान व्हायला पाहिजे पण तसे होत नाही याचे मूळ आणि महत्त्वाचे कारण म्हणजे कितीही प्रयत्न करून आपल्याला जे हवे ते मिळेलच याची शाश्वती नाही व आपल्याला जे नको आहे ते टाळता येईल याची खात्री नाही.

ज्या वेळी माणसाची सुखाची साधने मिळवताना दमछाक होते व ती साधने एकत्र करूनसुद्धा 'सुखच' पाठ फिरवते तेव्हा आपले काहीतरी चुकते आहे अशी माणसाला खात्री पटते. श्रीसद्‌गुरुमहाराज म्हणतात, 'ज्याप्रमाणे शंभर वेडे एकत्र जमा केले तर त्यातून एक शहाणा होत नाही. त्याप्रमाणे सुखाच्या अनेक अपूर्ण वस्तू जमा करून त्यात पूर्ण सुख व समाधान कसे मिळणार ?' मग खरे पूर्ण सुख, समाधान किंवा शांती असते तरी कोठे ?

आपण ज्याला पूर्णसुख म्हणतो त्याला संत सर्वसुख असे म्हणतात. सर्वसुख म्हणजे ज्यामध्ये दुःखाचा लवलेशही नाही असे. या सर्वसुखाचा शोध संतांनी लावला. समर्थ रामदास स्वामी म्हणतात, 'जगी सर्व सुखी असा कोण आहे । विचारी मना तूचि शोधूनि पाहे ॥' सर्वसुखाचा शोध लावलेले संत तुकाराम म्हणतात,

१) 'तुका म्हणे माझे हेचि सर्वसुख पाहीन श्रीमुख आवडीने ।

२) सर्वसुखाचे आगर बाप रखमा देवीवर

श्रीज्ञानेश्वर महाराज हे प्रत्यक्ष भगवान विष्णूचे अवतार, ते म्हणतात, 'सुखाचे जे सुख श्रीहरीमुख आणि पसायदानात त्यांनी सर्वसुखाचा शोध सांगितला आहे.

किंबहुना 'सर्वसुखी' पूर्ण होवोनि तिन्ही लोकी ।
भजी जो आदी पुरुखी, अखंडीत ॥

श्रीमहाराज हे वारकरी कुळात जन्माला आले. अनेक जन्मांची पुण्याई फळाला आली. लहान वयातच गुरुशोधार्थ त्यांनी घर सोडले. अनेक संतांच्या भेटी घेऊन शेवटी श्रीसद्‌गुरु तुकामाईंची भेट झाली. श्रीसद्‌गुरु तुकामाईंनी त्यांच्या अनेक प्रकारे परीक्षा घेतल्या आणि सात-आठ महिन्यांच्या सहवासानंतर आणि सेवेनंतर श्रीतुकामाईंनी त्रयोदाशाक्षरी श्रीराम मंत्राचा रामनवमीच्या दिवशी अनुग्रह देऊन 'ब्रह्मचैतन्य' ही पदवी दिली. सामान्य माणसाचा सुखाचा पाठलाग व शोध यातून निर्माण होणारे दुःख पाहून श्रीमहाराजांनी संतांनी वर सांगितलेल्या सर्वसुखाचा शोध घेतला व प्रत्यक्षामध्ये ते अनुभवले. त्या मार्गाची जेव्हा त्यांना प्रत्यक्ष खात्री पटली तेव्हा केवळ दयार्द्र बुद्धीने सर्वसामान्य संसारी माणसांना त्यांनी तो मार्ग सांगितला. श्रीसमर्थ हे श्रीराम प्रभूचे 'रामदास' झाले तसे श्रीमहाराज हे ब्रह्मचैतन्याचे 'दीनदास' झाले. हे केवळ सर्वसामान्य संसारी माणसासाठी झाले. नाहीतर ते सिद्ध पुरुष होऊन कोठेतरी हिमालयात एकांतात गेले असते.

श्रीमहाराजांनी ज्या स्वानंदसुखाचा अनुभव घेतला तो सामान्य माणसांनी कसा प्राप्त करून घ्यावा याचे ज्ञान व मार्गदर्शन लोकांना दिले. या ज्ञानालाच त्यांनी 'स्वानंदाचे तत्त्वज्ञान' हे नाव दिले. श्रीमहाराजांना विचारले की, 'आपण सांगत आहात ते स्वानंदाचे तत्त्वज्ञान तर मग श्रीज्ञानेश्वर महाराजांनी सांगितलेल्या तत्त्वज्ञानाला काय म्हणता येईल ?' श्रीमहाराज चटकन म्हणाले, 'श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान हे 'आत्मानंदाचे' तत्त्वज्ञान आहे.' 'सामान्य जनांसाठी' स्वानंदापासून अध्यात्म किंवा परमार्थ सुरू होतो व जीव हा आत्मस्वरूपाकडे प्रवास करू लागतो. आत्मस्वरूपाचा खरा शोध लागल्यावर लक्षात येते की आत्मस्वरूप व परमात्मस्वरूप यामध्ये काही भेद नाहीच. ज्ञानेश्वरीत म्हटल्याप्रमाणे हे जीव आणि शिव हे झाडावर बसलेले दोन पक्षी नाहीतच. आत्मस्वरूप हेच परमात्म स्वरूप व सच्चिदानंद स्वरूप आहे आणि या अनुभवाच्या जाणिवेमध्ये जो परमानंद आहे तोच आत्मानंद होय. तो निवृत्त, निर्वासन व निरामय आनंद आहे. तेथून खाली येणेच नाही. श्रीमहाराज म्हणाले की, आपण प्रथम सुख कोठे असते ते पाहू.

१) राजाच्या राणीला बारा वर्षांनी मुलगा झाला म्हणून हत्तीवरून पेढे वाटले. त्याच राजाच्या राजवाड्यात काम करणाऱ्या माळ्याच्या बायकोलासुद्धा बारा वर्षांनी मुलगा झाला म्हणून त्याने शेजाऱ्यांना साखर वाटली. बारा वर्षांनी मुलगा झाला याचा राणीचा आनंद आणि माळीणीचा आनंद तोच आहे जरी एकाची परिस्थिती गरीब व एकाचे राजाश्वैर्य.

२) कोट्याधीशाचे मुलीला अब्जाधीश जावई मिळाला व स्टेडीयमवर लग्न लागले. सामान्य कामागाराचे मुलीला अधिकारी नवरा मिळाला व दारात मांडव घालून लग्न लावले. आपले परिस्थितीचे मानाने सरस जावई मिळाला हा कोट्याधिशाचा आनंद व कामगाराचा आनंद तोच पण परिस्थिती भिन्न.

३) आपल्या अत्यंत प्रिय व्यक्तीचा मृत्यू झालेवर भूक असतानासुद्धा सुग्रास अन्न गोड लागेल का ?

४) परदेशात अत्यवस्थ मुलगा आहे असे कळल्यावर वातानुकुलीत मास्टर बेडरुममध्ये सुखद शय्येवर झोप लागेल का ?

वरील उदाहरणांवरून असे दिसते की सुख किंवा दुःख हे परिस्थिती पैसा, सुखाची साधने यावर अवलंबून नाही मग सुख किंवा दुःख भोगणारा 'मी' खरा कोण आहे. आपल्याला पुष्कळ वेळा असे दिसते की एखाद्या कामगाराला जे सुख असते ते उद्योगपतीला असत नाही. कामगार जर संतुष्ट वृत्तीचा असेल व मिळणाऱ्या पगारात जर समजून प्रपंच करीत असेल तर तो पैसा, सत्ता,मान, तृष्णा, आसक्ती किंवा हाव असणाऱ्या उद्योगपतीपेक्षा निश्चितपणे जास्त समाधानी असतो. श्रीमहाराज म्हणतात, 'ज्याची हाव जास्त, तो दरिद्री.'

सर्वसाधारणपणे असे दिसते की जे आपले जवळ नाही म्हणून दुःख वाटते पण ते दुसऱ्याजवळ असूनही तो सुखी नाही हे आपण पाहतो. तरीसुद्धा ती वस्तू आपलेकडे नाही म्हणून आपण दुःख करतो त्याला काय करावे ? काही दुःखे आपण आपली दुसऱ्याशी तुलना करून ओढवून घेतो. तसेच पुष्कळ वेळा दुसऱ्याचे जेवढे चांगले आहे तेवढेच आपण बघतो. त्याच्या इतर कमी प्रतीच्या बाबीकडे दुर्लक्ष करून तुलना करतो. वास्तविक सर्व बाजूंनी सर्व गोष्टी एखाद्याकडे असणे शक्य नसते. कोठेतरी उणीव असायची हे प्रपंचाचे स्वरूप आहे. श्रीमहाराज म्हणाले, 'खरे सुख हे वस्तू किंवा बाह्य परिस्थितीवर नसून ते घेणाऱ्यामध्येच असते. यासाठी सुख-दुःख म्हणजे काय ? शांती-अशांती म्हणजे काय ? व संतोष व असंतोष म्हणजे काय? हे समजले पाहिजे.

**१) सुख-दुःख म्हणजे काय ?**

शास्त्रीय परिभाषेमध्ये सुख = $\frac{\text{प्राप्तफल}}{\text{अपेक्षा}}$ याचा अर्थ असा की,

अ) जेवढ्या अपेक्षा जास्त तेवढे सुख कमी (दुःख जास्त)

ब) जेवढ्या अपेक्षा कमी तेवढे सुख जास्त (दुःख कमी)

प्राप्तफल हे वासना किंवा इच्छापूर्तीवर अवलंबून असून त्याला स्वप्रयत्न व बाह्य परिस्थिती किती अनुकुल आहे त्यावर अवलंबून आहे. अनंत अपेक्षा असतील तर सुख शून्य व पूर्ण दुःखच अनुभवाला येईल. येथे 'मन' हे कार्यरत असते.

**२) शांती - अशांती म्हणजे काय ?**

शास्त्रीय परिभाषेमध्ये शांती = सुसंवाद / विसंवाद = स्थिर आंतरमुख वृत्ती / चंचल बहीर्गामी वृत्ती

चित्तामध्ये वासना वृत्तीरूप होतात म्हणूनच योग म्हणजे चित्तवृत्तीचा निरोध असे म्हटले आहे. चित्तात उठणाऱ्या वृत्ती जर एकमेकांना पोषक असतील तर त्यात सुसंवाद असेल व द्वंद राहणार नाही. द्वंद नाही म्हणजे शांती आहे. वृत्ती जर सैरभैर होत असल्या (चंचल असल्या) तर मनाची शांती ढळते. स्थिर आत्मसंयमीवृत्ती असेल तर शांती मिळते. विसंवाद हा कधी कधी बाह्य परिस्थितीवर अवलंबून असू शकतो. कारण बाह्य परिस्थिती प्रतिकूल बनू शकते.

**३) संतोष व असंतोष म्हणजे काय ?**

शास्त्रीय परिभाषेत संतोष = प्रत्यक्ष उपभोग / आसक्ति, तृष्णा, लोभ म्हणजे

माणसाची आसक्ती (ॲटॅचमेंट) तृष्णा (लस्ट) व लोभ (ग्रीड) जेवढी जास्त तेवढा संतोष कमी. यामध्ये अहंकार (मी-मी) व मामकार (माझे-माझे) हा कार्यरत असतो. ज्या माणसाची हाव कमी व तृप्ती असेल तर माणूस संतोषी राहू शकतो. बाह्य परिस्थितीनुरूप माणसाची आसक्ती, तृष्णा व लोभ यावर परिणाम होऊ शकतो. जर खरे सुख हे माझ्यामध्येच असेल तर बाह्य परिस्थिती, शरीर व इंद्रिये यांच्या कमी-जास्त होणाऱ्या सुख-दुःखापेक्षा परिस्थिती निरपेक्ष अशी काही स्थिती असली पाहिजे म्हणजेच ह्या हेलकाव्यातून अलिप्त होता येत असले पाहिजे. माझ्यातील 'मी' हा सुखदुःखातीत रहातो म्हणजे माझे अंतःकरण (मन, बुद्धी, चित्त, अहंकार व आत्मतत्त्व) हे अलिप्त अवस्थेत राहिले पाहिजे.

श्रीमहाराज नेहमी सांगत की कितीही उपभोग घेऊनसुद्धा तृप्ती होत नाही किंवा अतृप्तीच राहते तेव्हा संतांनी 'समाधाना'चा शोध लावून अनुभव घेतला आणि समाजाला मार्गदर्शन केले. याबाबत श्रीमहाराजांचे स्वानंदाचे तत्त्वज्ञान तीन शब्दांत व्यक्त होते १) समाधान, २) (प्र) शांती व ३) आनंद.

हे सर्व अंतःकरणाशी संबंधीत असून अवस्थारूप असतात.

**१) समाधान**

सुख = प्राप्तफल / अपेक्षा

अपेक्षाशून्य अवस्था म्हणजे 'जे घडले ते' अशा वेळी काहीही घडले तरी 'समाधाना'त फरक पडत नाही. ही मनाची अवस्था आहे.

**२) (प्र.) शांती**

शांती = सुसंवाद / विसंवाद

परिस्थिती कशीही असो त्याच्याशी सुसंवाद असेल व वत्तृी आंतरमुख असेल तर (प्र म्हणजे प्रकर्षाने मिळणारी सर्वोत्तम) शांती लाभेल. ही चित्ताची अवस्था आहे. योगी अरविंद म्हणतात, 'All problems of existance are the problems of disharmony'

**३) आनंद**

संतोष = प्राप्त उपभोग / आसक्ती, लोभ, तृष्णा

जर मुळातच अनासक्ती, निर्लोभ व नैसर्गिक तृप्ती असेल तर निरंतर आनंदच आहे. ही आनंदावस्था आत्म्याची आहे.

समाधान ही दुःखशून्य अवस्था आहे. त्यालाच संत 'सर्वसुख' म्हणतात.

प्रशांती ही कधीही न ढळणारी शांती तेथे विसंवादाचा लवलेशही नाही.

आनंद कोणत्याही परिस्थितीत अतृप्ती, असंतुष्ट व लोभ याचा स्पर्श नाही.

ह्यावरील स्थितीत पूर्णत्व आहे म्हणूनच ते अवस्थारूप आहे. त्यात आणखी काही मिळवावयाचे बाकी रहात नाही. त्याचप्रमाणे बाह्य परिस्थिती, व्यावहारिक यश, अपयश व सुख-दुःखादी द्वंद्वावर समाधान अवलंबून नसून आत्मस्थिती म्हणजे अंतःकरणाच्या अवस्थेवर ते अवलंबून असते. समाधान, शांतीचा मार्ग शोधायचा असेल तर, ज्यांनी ते मिळवले आहे व जे दुसऱ्यास मिळवून देऊ शकतात अशा दयासिंधू ज्ञानी सद्गुरुंकडे गेले पाहिजे. श्रीसद्गुरु ब्रह्मचैतन्य महाराजांनी अनेक शिष्यांना आणि भक्तांना अशा प्रकारे समाधान व शांती मिळवून देऊन त्यांचा उद्धार केला. आजच्या कालातसुद्धा अनेक साधक श्रीसद्गुरु ब्रह्मचैतन्य महाराज यांनी सांगितलेल्या स्वानंदाचे तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून व साधना करून आपले पारमार्थिक जीवनाचे सार्थक करून घेत आहेत.

श्रीमहाराजांना सर्वसामान्य माणूस जेव्हा प्रापंचिक समस्या सांगत असत त्या वेळी त्यांना त्यांच्या धडपडीचे मनात हसू येत असे याचे कारण म्हणजे - 'माया' - ही माया माणसाला कशी खेळवते.

१) 'मी' हा सर्वांचे परिचयाचा असूनसुद्धा 'मी' चे खरे स्वरूप माणसाला समजत नाही.

२) जीवनाचे सर्व व्यवहार 'मनाच्या' द्वारे चालतात. सुख-दुःख, माणूस मनाचेद्वारे भोगतो ते मन काही ताब्यात येत नाही.

३) क्षणोक्षणी प्रपंचात सुख नाही अशी तक्रार सर्वच करतात. पण असा प्रपंच सोडायला कोणी तयार होत नाही.

श्रीमहाराज सांगतात की, परिस्थितीचा, यश-अपयशाचा, श्रीमंती-गरिबीचा आनंदावर परिणाम होत नाही. कारण तो भोगणारा 'मी' हा माझे शरीर व इंद्रिये यापासून वेगळा आहे. जोपर्यंत 'मी' म्हणजे माझे शरीर व इंद्रिये म्हणजेच देह (देहबुद्धी) ही खोटी कल्पना आपण सोडून देत नाही तोपर्यंत सुख-दुःखाची बाधा, अशांती व असंतोष राहणारच.

कारण माझ्या 'मी' मधील माझा अहंकार, कर्तेपण व आसक्ती ही सतत परिस्थितीच्या रेट्याने दुःखाचे ताट सतत माझेपुढे वाढून ठेवणार.

श्रीमहाराज सांगतात की तू 'तो' म्हणजे देहबुद्धीने मानलेले शरीर व इंद्रिये असा नसून सत्-चित्-आनंदरूप आत्मा आहेस. तुझे आत्मरूप हे परमात्म स्वरूप अंश असल्याने तुझ्यामध्ये शाश्वत समाधान, शांती व आनंद मुळातच आहेत. तू त्या मुळ स्वरूपाला विसरलास व अज्ञानाने देहालाच 'मी' व 'माझे' मानलेस म्हणून हे दुःख भोगत आहेस. त्यामुळेच तू शाश्वत समाधान, शांती आणि आनंदाला मुकला आहेस. वास्तविक तुझे हातात काय आहे ? तुझा जन्म, तुझी परिस्थिती, मोठेपणी शिक्षण, पत्नी, सहकारी, मुलेबाळे, दुखणे-बहाणे, घरदार व संपत्ती ही तू मिळवली आहेस काय ? का तुझ्या इच्छेने घडले आहे काय ? मग तू स्वतःला कर्ता कसा समजतोस ? हे विश्व अत्यंत नियमबद्ध रीतीने चालले आहे. त्यामध्ये सुसूत्रता आहे. त्याचा जो सूत्रचालक, निर्माता व नियंता आहे तोच खरा कर्ता आहे. ज्या कर्माचा कर्ता म्हणून तू मिरवतोस व ते अपेक्षेप्रमाणे घडले नाही म्हणून दुःख करतोस जर अपेक्षेप्रमाणे घडत नसेल तर स्वतःला त्याचा कर्ता म्हणणे योग्य वाटते काय ?

१) जे विश्व ईश्वरी सत्तेने व इच्छेने चालले आहे असे असताना मी हे करीन, मी ते करीन हा माणसाचा अहंकार जात नाही.

२) सारे जग हे मृत्यूकडे धाव घेत आहे. माझे मागचे गेले. पुढचे गेले. लहान-मोठे गेले, मित्र गेले, शत्रू गेले व आपणही त्या मार्गावर आहोत हे कळूनसुद्धा आपण कायम राहणार आहोत ह्या अविर्भावात आपण रहात असतो.

(३) खूप पैसा मिळवूनसुद्धा कोणी सुखी झाला नाही, हे पाहूनसुद्धा पैशाचे मागे लागतो. गरजेपुरते अर्थार्जन करणे गैर नाही पण हव्यासापोटी त्याचे मागे लागणे हे दुःखाला आमंत्रण देते.

अशा भ्रमात असलेल्या भक्तांना आणि शिष्यांना श्रीमहाराज जागे करतात व त्याचेवर कृपा करून मार्गदर्शन करतात.

सद्गुरु म्हणे ऊठ लवलाही, ज्ञानदीपाचे प्रकाशे पाही ।
वस्तू आपुली शोधूनी घेई, मग पावसी निजसुखा ।।
सद्गुरु राजवैद्य पूर्ण, रामनामाचे रसायन ।
स्वहस्ते मम मुखी पाजून, केले सावध स्वरूपी ।।
नेत्रीं घातले बोधांजन, भवरोग काढीला मूळीहून ।
मूर्ती दाविली सगुण, ते रूप वर्णिले न जाय ।।

श्रीमहाराजांनी स्वानंद सुखसागरात जेथे काळजी, दुःख व भय नाही तेथे आनंदात क्रीडा करण्यासाठी ज्ञानदीप लावून वस्तू शोधून दिली. श्रीरामनामाचे रसायन पाजून आमच्या बेशुद्ध आणि भ्रमीं अवस्थेतून सावध करून स्व-स्वरूप दाखवले. ज्या भवरोगाने ग्रासला होतो तो मूळापासून काढून टाकून डोळ्यात बोधांजन घालून सगुणाची उपासना दिली. स्वानंदाचे तत्त्वज्ञानातून केवळ श्रीराम नामाच्या आणि सगुणाच्या उपासनेनेच समाधान, शांती व आनंद मिळेल.

डॉ. मधुसूदन बागडे
३८३ शुक्रवार पेठ, पुणे ४११ ००२. फोन नं. : ४७२६१५

# श्रीरामरायाचा दीनदास - प. पू. श्रीगोंदवलेकर महाराज


**डॉ. प्रभाकर म. उपाध्ये**

*बी. ए. प्रथमवर्ग प्रथम, भाऊदाजी व आचार्य पारितोषिक विजेते. एम.ए. (संस्कृत) झाला. वेदान्त पारितोषिक, जैन रामायणावर पीएच. डी. प. पू. प्रा. गुरुदेव रानडे यांचा साक्षात् संबंध. संस्कृत, प्राकृत व संत साहित्यावर लेखन. ४२ वर्षे संस्कृत-पाली, प्राकृत भारतीय संस्कृतीचे प्राध्यापक ५-७ विद्यार्थी पीएच. डी. झाले. प.पू. गुरुदेव चरण दासानुदास.*


भारतभूमी ही संतांनी भूषित केलेली असल्यामुळे प्रत्येक प्रांतांत वेळोवेळी संत निर्माण झाले. त्यांनी भक्तिपंथ स्थापन करून समाजातील विविध थरांतील स्त्री-पुरुषांना ईश्वरोन्मुख केले व त्यांना समाधानाचा मंत्र-मार्ग दाखवून देऊन त्यांचे जीवन धन्य केले. अशाचपैकी १९ व्या शतकातील पूर्वार्धात एक महात्मा जन्माला आला. तेच पुढे प्रसिद्धीस आलेले संत श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज होत. प्रत्येक संतांचे वैशिष्ट्य असे की त्यांनी भक्तिकार्य करीत असताना योग्य ती 'उपाधि' - नाम लावून घेतले. श्रीसमर्थांनी 'रामदास' ही पदवी भूषविली तर श्रीतुलसीदास 'रामभरोसे' नावाने ओळखले जाऊ लागले. 'एका जनार्दनी' असणारे संत श्रीएकनाथ, 'निवृत्तिदास' असणारे श्रीज्ञानेश्वर महाराज अशा अनेक संतांचा त्यांच्या नाममुद्रांतून परिचय होतो. या उपाधी खऱ्या अर्थाने शब्दशः व गुणतः योग्य होत्या हे त्या त्या संतांच्या चरित्रावरून लक्षात येईल. श्रीगोंदवलेकर महाराज हे स्वतःला 'दीनदास' म्हणवून घेत असत. त्यांच्या नावावर जे अभंग आहेत त्यात ते स्वतःला 'दास' किंवा 'दीनदास' म्हणून संबोधतात. खरे पाहिले तर ते 'ब्रह्मचैतन्य' या त्यांच्या सद्‌गुरुंनी त्यांना दिलेल्या नामाभिधानाने ओळखले जात. तरीपण अगदी विनम्रभावाने ते स्वतःस 'दास' किंवा 'दीनदास' म्हणवतात हेच त्यांचे वैशिष्ट्य आहे. त्यांचे संपूर्ण जीवन दीनांची सेवा करण्यात गेले आहे. त्यांचे पट्टशिष्य श्रीब्रह्मानंद महाराज म्हणत की महाराज म्हणजे दयासिंधूच होते. तर दुसरे शिष्य श्रीआनंदसागर महाराज म्हणत की श्रीमहाराज म्हणजे जीवांना वासनेच्या घाणीतून बाहेर काढून नामाचे स्नान घालणारे प्रत्यक्ष श्रीमारुतिरायाचे अवतारच होत. असा महापुरुष दयासिंधु व दीनदास असणारच यात शंका नाही. श्रीगोंदवलेकर महाराज हे कलियुगातील प्रभु रामरायाचे श्रीमारुतीरायानंतर आलेला दिव्य अवतारच मानणे सार्थ ठरेल.

श्रीमहाराजांना लहानपणापासूनच ईश्वराची आवड होती व त्यांची वृत्ती पण अध्यात्माकडे सहजच वळत असे. वयाच्या १५ व्या वर्षी त्यांनी सिद्धावस्था प्राप्त करून घेतली व ब्रह्मानन्दाचा साक्षात् अनुभव उपभोगला. हे ध्येय प्राप्त करून घेण्यासाठी या महामानवाने सर्वस्वाचा त्याग केला. गुरुवचन प्रमाण मानले व अनुसंधान कधीच चुकू दिले नाही. त्यामुळे त्यांच्या आचार, विचार व कृति यांत अहंपणा आला नाही. त्यांचे जीवनातील मुख्य ध्येय होते की जगाचे कल्याण व्हावे. 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति' हीच त्यांची भावना होती. याचसाठी त्यांनी सर्वांना - अज्ञ,पापी, दुराचारी, निंदक इत्यादी सर्वांना जवळ केले व त्यांचा उद्धार केला. असा प्रापंचिक लोकांसाठी प्रयत्न करीत असता त्यांना अकारण शत्रुत्व, निंदा, अपमान, शारीरिक छळ सहन करावा लागला. तरीपण शेवटचा श्वास असेपर्यंत त्यांनी सर्वांना कळकळीने भगवंताचे नाम घ्यावे म्हणून प्रार्थना केली. 'जेथे नाम तेथे माझे प्राण' असे ते म्हणत असत.

श्रीमहाराजांचे चरित्र वस्तुतः ईश्वरी लीलाच आहे. त्यांच्या प्रत्येक शब्दांतून व कृतींतून ही लीला प्रकट होई. अशांचे दिव्य चरित्र म्हणजे अध्यात्मदर्शनच म्हणावे लागेल. त्यांनी आधी केले व मग सांगितले. 'यः क्रियावान् स पण्डितः - पंडित म्हणजे क्रियाशील, ब्रह्मज्ञानाचा अनुभव घेणारा महामानव.'

त्यांच्या लहानपणी त्यांच्या आजोबांनी गणूला म्हणजे बाल महाराजांना विचारले, 'बाळ गणू, तुला जर हंडा भरून मोहरा दिल्या तर तू काय करशील ?' बाल महाराज म्हणाले, 'त्या मोहरा मी अंध, पंगु, रोगी, भिकारी यांना वाटून टाकीन'.असा विचार संत महात्मेच करू शकतात.

श्रीमहाराज शिकवणूक देताना म्हणतात, 'माझा राम सखा मी रामाचा दास नित्य बोलावे.' श्रीमहाराजांच्या जीवनात ते नर्मदेच्या किनाऱ्यावरून जात असताना एक विचित्र प्रसंग घडला. त्यांची दोन मांत्रिकांशी भेट झाली व त्यांनी त्यांना मंत्रतंत्र सांगण्यास विनंती केली. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'मला मंत्रतंत्र येत नाही. मी फक्त एक रामनाम जाणतो. मी रामाचा दीनदास आहे.' श्रीमहाराज आपल्याला मंत्रतंत्र सांगत नाहीत म्हणून त्या मांत्रिकांनी श्रीमहाराजांना नागपाशबंधाने बांधून टाकले. पण त्यातून श्रीमहाराजांनी आपली सुटका करून घेतली. मग त्या दोन मांत्रिकांना श्रीमहाराजांनी क्षमा केली व राममंत्र देऊन भगवत्प्राप्तीचा मार्ग दाखविला. अशा दीन लोकांना भगवत्प्राप्तीचा मार्ग दाखविणारे म्हणजेच दीनदास होत.

प्रत्यक्ष सद्‌गुरु श्रीतुकामाईनी श्रीमहाराजांवर कृपादृष्टी केली व त्यांच्या डोक्यावर हात ठेऊन त्यांना समाधिमुख दिले आणि त्यांचे

ब्रह्मचैतन्य असे नाव ठेवले. ब्रह्माच्या चैतन्याची खूण म्हणजे श्रीमहाराज व म्हणून ही पदवी दिली गेली. त्यांना म्हणजे श्रीमहाराजांना त्रयोदश अक्षरांचा 'श्रीराम जयराम जयजय राम' असा मंत्र (लोकांना) देण्याचा अधिकार दिला. सद्गुरु श्रीतुकाई महाराज म्हणाले, की प्रापंचिक लोकांना - विशेषतः मध्यमस्थितीतल्या लोकांना - आपल्या प्रपंचामध्येच परमार्थ कसा करावा हे शिकव. राममंदिराची स्थापना करून श्रीरामनामाचा प्रसार कर. माझे महत्त्व वाढविण्यापेक्षा श्रीसमर्थांचे महत्त्व वाढव. लोकांमध्ये भजनाचे प्रेम उत्पन्न होईल असा मार्ग दाखव. 'जे खरे दीन असतील त्यांची सेवा कर आणि सर्व ठिकाणी प्रेम वाढेल असाच उपाय कर.' हा उपदेश श्रीमहाराजांनी शब्दशः पाळला आणि स्वतःला दीनदास म्हणवून घेतले. त्यांची ही पार्श्वभूमी लक्षात घेतली की, या दीनदासाने त्यांच्या सद्गुरुंचे वचन सार्थ करून दाखविले यातच त्यांच्यातील विभूतिमत्त्व सिद्ध करण्यास समर्थ आहे.

श्रीमहाराजांचे व्यक्तिमत्त्व असे होते की ते दुःखी माणसाला धीर देणारे माय-बापच वाटत. दुसऱ्याचे दुःख कमी करण्याची त्यांची तळमळ पाहिली की अचंबा वाटतो. पण गंमत अशी की सद्गुरुसेवा घडावी म्हणून लोक त्यांच्याकडे जात पण श्रीमहाराजच त्यांचीच सेवा करीत व त्यांना नामाच्या नादी लावीत. ते म्हणत की, जो निरंतर नाम घेतो त्याचा राम मालक होतो. जे कोणी म्हणत की नाम घेणार नाही त्यांना ते म्हणत, 'तू फक्त एकदा 'राम' म्हण. राम कल्याण करील.' 'हाट भरला संसाराचा । नफा पाहावा देवाचा ।।' असे श्रीसमर्थ रामदास म्हणत. श्रीमहाराजसुद्धा सांगत की, प्रापंचिक जीवन व परमार्थाचे जीवन यामध्ये विरोध नसावा. नामस्मरणाने असा अविरोध सहज साधता येतो, हे त्यांनी स्वतःच्या उदाहरणावरून दाखवून दिले. 'नामाचे अखंड स्मरण केल्याने याच जन्मी ईश्वराचा साक्षात्कार', असे त्यांचे जीवन उपदेश देते. श्रीमहाराजांचा राम म्हणजे केवळ दाशरथी राम नसून सर्वांच्या हृदयात असणारा आत्माराम आहे. श्रीमहाराजांच्या मते नामस्मरण म्हणजे पुण्य व त्याचे विस्मरण म्हणजे पाप होय. नामात रंगून जाणारा खरा भाग्यवंत होय. कै. ल. रा. पांगारकर म्हणतात की, 'अलीकडच्या काळात श्रीगोंदावलेकर महाराजांच्या इतके नामाचे महत्त्व दुसऱ्या कोणीही सांगितले नाही.' 'जेथे नाम तेथे माझे प्राण । ही सांभाळावी खूण ।।' हे श्रीमहाराजांचे अखेरचे शब्द म्हणजे श्रुतिवचन होय. भगवंताचे अखंड अनुसंधान घडवून आणणारे संत असतात. या अनुसंधानामुळे देहबुद्धी कमी कमी होत जाते. देहबुद्धि जाऊन आत्मबुद्धी वृद्धिंगत होते. जगाचे कल्याण हीच एकमेव पवित्र धारणा पक्की होते. श्रीमहाराजांनी 'दीनदास' हे सार्थ असे नाव घेऊन अनेकांना ईश्वरचरणी लावले, त्यांना सन्मार्ग दाखविला व त्यांचा उद्धार होण्यास मदत केली.

श्रीमहाराज म्हणत की 'तुम्ही अगदी थोडा वेळ जप करता त्याने तुमचा उद्धार कसा व्हावयाचा ? म्हणून तुमच्या जपाची भरपाई करण्यासाठी मला जप करावा लागतो. नामाचा आनंद भोगण्यासाठी जन्मास येणे यासारखे भाग्य फार थोड्या लोकांना लाभते. पण आश्चर्य असे की श्रीमहाराजांच्या सहवासात आलेल्या स्त्री-पुरुषांना, ते देहात असतानाच नव्हे तर देह ठेवल्यावरही अनेकांना हे भाग्य लाभले आहे. श्री. तात्यासाहेब केतकर, प्रा. केशवराव बेलसरे असे अनेक साधक झाले की ज्यांनी हे भाग्य स्वतःच्या उदाहरणाने दाखविले व इतरांना ते भाग्य मिळविण्यासाठी उद्युक्त केले.

असे श्रीमहाराज स्वतःला दीनदास म्हणून घेतात. कारण त्यांनी त्यांच्या सद्गुरुवचनांचा अर्थ लक्षात घेऊन अनेक स्त्री-पुरुषांचा उद्धार केला व त्यांना नामाच्या नादी लावले. प्रा. बाबूराव अंतरकर यांनी संपादित केलेली 'चैतन्य गाथा' यातील अभंग वाचल्यावर या महामानव दीनदासाचे कर्तृत्व कसे आहे ते लक्षात येईल. सामान्य माणसे विषयवासनांना व विकारांना बळी पडतात. कारण अशी माणसे देहबुद्धीने जगत असतात. श्रीमहाराजांचे अभंग सामान्य माणसाकरता आहेत. श्रीमहाराजांच्या मते विषय-विकारांवर आपले स्वामित्व ठेऊन, परमार्थाला आड न येतील अशा पद्धतीने जरुरीपुरते सेवन करावे व नामात मन रंगून गेल्यावर हळूहळू साधक विषयातीत होतो. हेच खरे शौर्य व पौरुष आहे.

श्रीमहाराजांच्या अभंगांत 'दास म्हणे' तसेच 'दीनदास म्हणे' असे अर्थपूर्ण शब्द असतात. श्रीसमर्थांनी पण (आपल्या) अभंगांत 'दास म्हणे' असेच म्हटले आहे. श्रीमहाराज म्हणत की जो दास झाला त्यालाच बोध होतो / होणार. तद्वत् दीन झाल्याविणा दासभाव येणार नाही व दासभाव आल्याविना भगवंताची भक्तिपण होणार नाही. या दृष्टीने श्रीमहाराजांनी जे 'दीनदास' नाव घेतले त्यातच त्यांच्या अध्यात्माचे - भक्तीचे रहस्य दडलेले आहे. श्रीमहाराजांना 'नाम' म्हणजे स्वतःचे काळीजच वाटे. ते नामच बोलले, त्यांनी नामच ऐकले, नामच पाहिले असे हे दीनदास. श्रीप्रभुरामरायाचा दीनदास नामातच जगला, दीनांना नामामृत देऊन (त्यांना) धन्य करणारा झाला अशी भाविकांची अतूट श्रद्धा आहे.

त्रयोदश मंत्रासंबंधात ते म्हणतात, 'दीनदास म्हणे तुम्हा बोधियलें। रामाशी आगळें कांहीं नाहीं ।।' किंवा 'दीनदास म्हणे स्मरे रघुनाथा । संसाराची चिंता त्यासी नसे ।।', 'दीनदासाचे बोल मानू नका फोल । भक्तवत्सल राम हृदयीं धरा ।।' असे कळकळीचे शब्द ऐकून दगडालाही पाझर फुटावा. मग त्यांच्या संगतीत येणारा बद्ध असला तरी बदलेल यात काय विशेष आहे ? श्रीमहाराजांचा उपदेश असा की, प्रपंच करीत असताना रामाचे अखंड चिंतन-भजन-नामस्मरण करावे. हा सामान्य-दीन माणसांना तरून जाण्याचा व निकोप आध्यात्मिक जीवन जगण्याचा एकमेव मार्ग आहे, असे ते वारंवार सांगतात. तत्त्वज्ञानाची व्यवहाराशी सांगड घालून व्यवहाराला पारमार्थिक वळण लावण्यासाठी संतांनी प्रयत्न केला. श्रीमहाराजांनी 'दीनदास' होऊन व्यवहारातील अनेक गोष्टींची परमार्थाशी सहजरीत्या सांगड घातली व लोकांना ईश्वरोन्मुख केले. श्रीमहाराज सांगतात की जगाची अशी विपरीत दशा आहे की कोणी (ही) कुणालाही बरे म्हणत नाही. बोलणे व वागणे यांतील विसंगती म्हणजेच मिथ्याचार. श्रीमहाराज म्हणत की, 'दास म्हणे दोष नाही गेला । दोष नाहीं हो जगाला ।।' श्रीमहाराज विनम्र

होऊन म्हणतात की, 'माझेजवळ साधूचा कोणताच गुण नाही.' तरी माझेकडे येऊ नका. 'दीनदास तुम्हा सांगतसे लोकां । माझ्याकडे नका येऊं कोणी ॥' पण श्रीमहाराजांचे जनप्रियत्व असे होते की सर्व थरांतील स्त्री-पुरुष त्यांच्याकडे भक्तिभावाने जात. काहीजण कामनायुक्त (होऊन) जात असत. परंतु श्रीमहाराजांनी त्यांचा अव्हेर केला नाही. लोकांचे दोष ओळखूनसुद्धा इतरांना न समजेल पण दोषी माणसाला समजेल अशा वाक्चातुर्याने ते दोषी लोकांना मार्ग दाखवीत. ते रामरायांना सांगतात की, माझे काहीही होऊ दे. पण मला रामनामात प्रेम येऊ दे. कारण त्यांना असे वाटते की, 'दास म्हणे रामनामापुढे । ब्रह्मपद तें बापुडें ॥' अभंगांत ते 'दिनदासाची विनवणी ।', 'दिनदासाचे भजन ।', 'दीनदास करी विनंति ।' 'दीनदास म्हणे नाम सुलभ । देवादिकांना दुर्लभ ॥' अशा शब्दांत सांगतात. यावरून त्यांचे 'दीनदास' हे नाव सार्थ व त्यांच्या जीवनाचे मर्मच आहे, अशी श्रद्धा योग्यच आहे.

परमेश्वराचे व्यक्त स्वरूप म्हणजेच संत आहेत. तरीपण श्रीमहाराजांसारखे संत देवापेक्षा अधिक श्रेष्ठ मानले जातात. कारण देवाच्या देवत्वाची ते ओळख करून देतात. श्रीसमर्थांनी व दीनदास असणाऱ्या श्रीमहाराजांनी रामाची म्हणजे चराचर व्यापणाऱ्या आत्मारामाची ओळख करून दिली. संतांजवळ दिव्यदृष्टी असतेच पण त्याचबरोबर मानवी दृष्टीही असते. म्हणून ते लोककल्याणाकरता झटतात. संतांचे कार्य म्हणजे समाजाला ईश्वरोन्मुख करणे व पापवासनेतून सोडवणे. यातूनच दिव्य, आदर्श समाज निर्माण होईल. प. पू. गुरुदेव रानडे म्हणत की, माणसाचे मनुष्यत्व जर पाहावयाचे असेल तर त्यांनी ईश्वरोन्मुख होणे व या जीवनातच ईश्वरी साक्षात्कार करून घेणे यातच पाहावे. मनुष्याचे हेच खरे ध्येय असले पाहिजे. त्यातूनच एक देव, एक धर्म व एक जग किंवा वैश्विक माणुसकी निर्माण होऊन आदर्श समाज निर्माण होईल. या दृष्टिकोनातून सर्व संत ईश्वराच्या संकेतानुसार कार्य करतात. श्रीमहाराजांनी पण हे भव्यदिव्य कार्य केले. त्यांच्या चरित्रात त्यांनी सामान्य, मध्यम स्थितीतील लोकांना - विषयापुढे दीन होणाऱ्या व विकारांना वश होणाऱ्या लोकांना प्रेमळपणे जवळ करून आत्मकल्याणाचा मार्ग दाखविला. असे स्वतःला दीनदास म्हणवणारे श्रीरामप्रभूचा नवा अवतारच मानावे लागतील.

'दीनदास' शब्दाचा अर्थ असा की, 'दीनाचा दास, जे दीन होऊन विषयवासनेत अडकतात त्यांच्यासाठी दासाप्रमाणे कार्य करून - मदतीचा हात पुढे करून निष्काम बुद्धीने कल्याणाचा मार्ग सांगणे.' श्रीमहाराजांनी हेच कार्य केले. 'दीनदास' याचा दुसरा अर्थ असा की, 'प्रभु रामचंद्रापुढे दीन होऊन त्याच्याच म्हणजे ईश्वरेच्छेने वागणारा, कार्य करणारा दास.' श्रीमहाराज प्रभुरामाजवळ दीन होऊन त्याला शरण जाऊन भक्ती करीत, दास्य स्वीकारीत. त्यांचे आयुष्य रामनामानेच भरून गेल्यामुळे ते दास झाले व अफाट कार्य करून त्यांनी अनेकांना भक्तिपंथाला लावले. अशा या रामप्रभूंच्या दीनदासरूपी संताला माझे हजारो प्रणाम ! श्रीमहाराजांनी (सर्वांनाच म्हणून) जो आशीर्वाद दिला आहे त्याचेच आपण मनन, चिंतन करून (त्यांचे जवळच) रामप्रेम मागू या.

'अखंड संतति संपत्ति । तुम्हां असो जयप्राप्ति ॥ १ ॥
सदा घडो भगवद्‌भक्ति । मनीं वसो ही विरक्ति ॥ २ ॥
ऐसें वांछित आहे मन । कृपा करील रघुनंदन ॥ ३ ॥
दीनदासाचे हे शब्द । तुम्हां माझा आशीर्वाद ॥ ४ ॥

या आशीर्वादातच श्रीमहाराजांचे लोककल्याण हेच ध्येय दिसून येते. असा हा महापुरुष महाराष्ट्रातच जन्मला. त्यांनी या भूमीतच दिव्य कार्य केले व अजूनही - ब्रह्मीभूत होऊनसुद्धा - तेच ते कार्य करीत आहेत हे त्यांचे वैशिष्ट्य होय.

(ऋणनिर्देश : हा छोटा लेख लिहिताना ज्यांच्या सहवासात मी अनेक वर्षे राहिलो ते म्हणजे देवाप्रमाणे असणारे ती. तात्यासाहेब केतकर महाराज, तसेच माझे प्राध्यापक - ज्यांनी मला मुलाप्रमाणे मानले ते म्हणजे प्रा. के. वि. बेलसरे यांच्या संभाषणातून व ग्रंथांतून मला विशेष मदत मिळाली. त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. हे ऋण न फिटणारे आहे. तसेच श्रीमहाराज व ती. तात्यासाहेब केतकर यांचा निकट सहवास लाभलेले त्यांचे शिष्य प्रा. वा. रा. अंतरकर यांनीपण मला वेळोवेळी आठवणी सांगून त्यांनी संपादित केलेली श्रीमहाराजांची 'चैतन्यगाथा' (त्यांच्या अभंगांचा संग्रह) मला दिली. त्यातूनच हा लेख लिहिला गेला. त्यांचाही मी ऋणी आहे. जे काही चुकीचे असेल ते माझे आहे. इतरांचे नाही, ही भावना व्यक्त करून श्रीमहाराजांच्या साधक बंधु-भगिनींनी दोषांबद्दल क्षमा करावी, हीच विनंती. श्रीमहाराजांनी सर्वांना रामप्रेम द्यावें हीच त्यांच्या चरणकमली माझ्यासारख्या अज्ञ साधकाची विनंती.)

डॉ. प्रभाकर म. उपाध्ये,
(प. पू. गुरुदेवचरण दासानुदास),
१० स्नेहवर्धिनी, गोरेगाव पूर्व, मुंबई - ६३.

## सखा तो माझा गुरु

सुशांत बैसलो मी नाम चालले परेत
जाणीव ती अंतरात सुखावूनी नेई
प्रसन्नतेची भांडारे प्राप्त सहज होती
अकिंचनाची क्षिती दूर दूर जाई
सखा तो माझा गुरु, सम्राट मी मनाचा
लौकिक धनमानाचा, वीट पुरा येई

**यशवंत माणकीकर**

# गोंदवल्याचा नामदीप

**सौ. वीणा तळघट्टी**

*बी. ए. (ऑनर्स), एम्.एड., न्यू इंग्लिश स्कूल रमणबाग प्रशालेत शिक्षिका. धार्मिक वाङ्मयाची आवड. त्यानुसार काही स्फुट लेख मासिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. यंदाचा अखिल भारतीय जैन संघटनेतर्फे 'आदर्श शिक्षिका' म्हणून पुरस्कार मिळाला. समर्थ व्यासपीठाशी संबंध. शालेय विद्यार्थ्यांवर संस्काराच्या बाबतीत विशेष लक्ष.*

उपासनेला दृढ चालवावे । भूदेव संतासी सदा लवावे ।
सत्कर्मयोगे वय घालवावे । सर्वांमुखी मंगल बोलवावे ।।

श्रीसमर्थरामदासांनी या श्लोकात आवर्जून भूदेव संतांना सदैव नमन करण्यास सांगितले आहे. त्यांना शरण जाण्याचे सांगितले आहे. या ठिकाणी 'भूदेव संत' याचे दोन अर्थ होतात. १) भूदेव आणि संत व २) भूदेव संत. दुसऱ्या अर्थात 'भूदेव' हे संताचे विशेषण होते. भूदेव आणि संत यातील भूदेव म्हणजे ब्राह्मण. कारण ब्राह्मणाला त्याच्या दैवीगुणांमुळे 'पृथ्वीवरील देव' ही पदवी प्राप्त झाली होती. दैवी गुणांचा परमोत्कर्ष ज्याच्यामध्ये झालेला आहे तोच खऱ्या अर्थाने ब्राह्मण या पदवीस पात्र होय. समर्थांचीच व्याख्या द्यायची झाल्यास 'करिती ब्रह्म निरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण । तेचि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद् ।' (दा. बो. ६.२४) थोडक्यात ज्याला ब्रह्मसाक्षात्कार किंवा आत्मसाक्षात्कार झाला तोच ब्राह्मण.

संतांचे लक्षणही हेच असल्याचे आपणास दिसून येते. फरक एवढाच की आत्मज्ञानाने ते स्वतः तर मुक्त झालेले असतात पण त्याचबरोबर 'आपणासारिखे करिती तात्काळ ।' या संतांच्या वचनाप्रमाणे संत इतरांनाही उद्धरून नेतात. म्हणून त्यांना 'भूदेव' ही पदवी विशेषत्वाने शोभते. खरे तर ईश्वरापेक्षाही संत माहात्म्य आगळे आहे. कारण ईश्वराची ओळख माणसाला होते ती संतांमुळेच. म्हणून प्रस्तुत लेखाच्या संदर्भात 'भूदेव संतासी सदा लवावे' या उक्तीमध्ये भूदेव आणि संत असा अर्थ न घेता भूदेव असलेले संत असा अर्थ घेऊन संतांचे चरित्राचे गायन करणे इष्ट ठरेल.

संत कोण ? ह्या प्रश्नाचे एक उत्तर आपण पाहिले आणि ते म्हणजे संत हे स्वतः मुक्त पुरुष असून ते मोक्षाचा प्रसाद सामान्य जनाला देत विचरत असतात. आद्य शंकराचार्यांनी त्यांना वसंतऋतूची उपमा दिली आहे. विवेकचूडामणीमध्ये आचार्य सांगतात :

'शांता महात्मो निवसंति संतो । वसंतवल्लोकहितं चरंतः
तीर्णाः स्वयं भीमभवार्णवं जतान् । अहेतुनान्यानपि तारयन्तः ।।

असे हे संत भूलोकातील साक्षात देवाचीच रूपे होत - म्हणजेच भूदेव होत. ही गोष्ट ज्ञानेश्वरांनी आपल्या खास शैलीतून सांगितली आहे. ते म्हणतात, 'आत्मज्ञाने चोखडी । संत हे माझें रूपडीं ।। अशा संतांच्या चरित्राचे व कार्याचे वर्णन करणे ही सोपी गोष्ट नाही. त्यासाठी काही प्रमाणात तरी संतवृत्ती ही लेखकामध्ये असायला हवी. तरच लेखक संतांचे अंतरंग उलगडून दाखवू शकेल. 'संत' ही व्यक्ती नसून संत ही सद्-आचार-विचाराने प्रेरित झालेली वृत्ती आहे. सर्वसामान्य माणसाच्या डोळ्यांपुढे संत म्हटला की, भगवी वस्त्र नेसलेली, समाजात न मिसळणारी, दूर एकांतात राहणारी व्यक्ती उभी रहाते. सहाजिकच अशा संतांपासून चार हात दूर राहण्याची वृत्ती समाजाची आहे. वास्तविक संत ही वृत्ती म्हटल्यावर कोणतीही व्यक्ती प्रपंचात राहून संत होऊ शकते आणि ही वृत्ती होण्यासाठीच संतांची नितांत गरज आहे. म्हणूनच ते या भूलोकावरील देव आहेत. तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे 'काय वानू मी या संतांचे उपकार । मज निरंतर जागवीती ।।'

अशा संतांचे चरित्रगुणवर्णन ही परमेश्वराच्या गुणसंकीर्तनाप्रमाणे कीर्तनभक्ती या स्वरूपात स्वीकारून वाणी व मन पवित्र करण्यासाठी संतचरित्राचा अभ्यास कोणीही करू शकेल आणि त्याच भूमिकेतून सद्गुरु ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज या संतश्रेष्ठाच्या चरित्र व कार्याचा धावता आढावा घेण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

महाराष्ट्र ही संतांची भूमी आहे. श्रीसंत ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव, चोखामेळा, एकनाथ, मुक्ताबाई हे सर्व वारकरी संप्रदायातील संत सर्वांनाच परिचित आहेत. छत्रपती शिवाजीराजे यांच्या काळातील समर्थ रामदास ज्यांनी रामदासी पंथ निर्माण करून सर्वत्र समाजजागृती केली हे सर्वांना माहिती आहेत. या पूर्वीच्याच संतांनी घालून दिलेल्या मार्गाने ज्यांनी आपली वाटचाल केली असे अनेक संत महाराष्ट्रात होऊन गेलेत व आजही ज्यांना संत म्हणावे असे कितीतरी थोर पुरुष महाराष्ट्रात आहेत. कारण वर लिहिल्याप्रमाणे संत ही वृत्ती आहे.

सर्वच संतांनी मोक्षप्राप्तीसाठी भक्तीमार्गाचाच पुरस्कार केला आहे. ही भक्ती नवविधा असल्याचे श्रीमत् भागवतात सांगितले आहे. भक्तीचे ते नऊ प्रकार म्हणजे - श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन हे होत. संतांनी मात्र यापैकी नामजपाच्या रूपामध्ये स्मरणभक्तीवर जास्त जोर दिलेला दिसतो. ज्ञानेश्वरादी संतांचे हरिपाठ, अभंग हे प्रसिद्धच आहेत. आधुनिक काळात नामस्मरणावर संपूर्ण भिस्त ठेऊन नाममाहात्म्य जीवनभर ज्यांनी गायिले त्या श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांना, रामनामावरील त्यांच्या भक्तीमुळे 'नामावतार' ही शोभून दिसणारी पदवी प्राप्त झाली. त्यांनी नाम हे वाचेने घेतले, कानाने ऐकले व मनाने चिंतले. नव्हे 'रामनाम' हे त्यांनी त्यांच्या जीवनाचे सर्वस्व मानले. हे महाराजांचे वैशिष्ट्य होय. नाम आणि नामी म्हणजे ईश्वर ही एकरूप होत. ईश्वराची प्राप्ती करून घ्यायची असेल तर त्याच्या नामाला धरले की काम झाले ही स्वतः

महाराजांची धारणा. तत्त्वतः नाम म्हणजे 'ओंकारस्वरूप ब्रह्म' ! योगदर्शनात 'तस्य वाचकः प्रणवः' असे म्हटले आहे. परंतु साधनभक्तीच्या दृष्टीने नामाचे माहात्म्य अलौकिक आहे. केवळ नामस्मरणाने ईश्वरप्राप्ती करून घेणे ही महाराजांची सर्वसामान्य माणसाला झेपेल अशी शिकवणूक होती. त्यांच्याच शब्दांत सांगायचे झाले तर त्यांनी सामान्य माणसासाठी नाम सिद्ध करून दिले. अशा महाराजांच्या चरित्राचा वेध घेणे म्हणजे त्यांनी साधकावस्थेतून सिद्धावस्थेपर्यंत केलेल्या आध्यात्मिक प्रवासाचा मागोवा घेणे होय. कोणत्याही संताच्या लौकिक चरित्रापेक्षा त्यांचे अंतरंग, आध्यात्मिक चरित्र अधिक महत्त्वाचे आहे व ते मार्गदर्शकही असते. या दृष्टीनेच श्रीमहाराजांचे चरित्र आपणास बघावयाचे आहे.

लौकिक दृष्ट्या महाराजांचा जन्म सातारा जिल्ह्यातील वावर हिऱ्याच्या कुलकर्णी वंशी गोंदवले येथे माघ शुद्ध १२ शके १७६६ म्हणजे सन १८४५ साली झाला. महाराज शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण व त्यांचे गोत्र वसिष्ठ आणि आडनाव घुगरदरे. परमेश्वराच्या आणि संतांच्या अवतारासंबंधी आढळून येणारे संकेत म्हणजे 'शुचीनाम् श्रीमताम् गेहे योगभ्रेष्टोऽभि जायते ।' याचा भावार्थ सत्पुरुषांचा जन्म हा सत्शील आणि पावन अशा कुळात होत असतो. महाराजांच्या घराण्याचे मूळ पुरुष रुद्रोपंत. हे विठ्ठलाचे उपासक. त्यांच्या घरात पंढरीची वारी होती. महाराजांचे आजोबा लिंगोपंत भगवत्भक्त. समर्थांच्या उक्तीप्रमाणे त्यांनी नेटका संसार व परमार्थविवेक हे दोन्हीही करून दाखविले होते. वृत्तीने ते प्रामाणिक, परोपकारी, सत्त्वशील असे होते. त्यामुळे गावातील लोक त्यांच्याकडे आदराने बघत. हे सारे करीत असताना त्यांना विठ्ठलाचा कधीही विसर पडला नाही. घराण्यात परंपरेने चालत आलेली पंढरीची वारीही त्यांनी कधीही चुकविली नाही. पण वयोमानाप्रमाणे थकल्यावर वारीला जाता येत नाही. आता आपल्याला विठ्ठलाचे दर्शन होणार नाही, ही व्याकुळता त्यांच्या मनाला लागली. पण पांडुरंगावरील नितांत श्रद्धेमुळे खुद्द पांडुरंग ह्या भक्ताच्या हाकेला धावून आला आणि त्यांना स्वप्नात हात धरून त्यांच्या शेतात 'इथे खण मी इथेच आहे' असा साक्षात्कार झाला आणि खरोखरीच खणल्यावर तिथे विठ्ठल-रुक्मिणीची सुंदर मूर्ती सापडली. गोंदवल्यात आज ही मूर्ती आहे. ही खरी श्रद्धा. महाराजांच्या आजीचे नाव राधाबाई. या दांपत्याच्या पोटी रावजी कुलकर्णी - म्हणजे महाराजांचे वडील यांचा जन्म झाला. हे घराणेच एकूण धार्मिक वृत्तीचे, वैराग्यशील असे होते. लिंगोपंताप्रमाणेच रावजींची धार्मिक वृत्ती कांकणभर जास्तच. पूजा-अर्चा, एकांतातील चिंतन, नामस्मरण, पांडुरंगाच्या चरणी लीन होणे हे रावजींचे प्रमुख विशेष होत. त्यांच्या सहधर्मचारिणीचे नाव गीताबाई. सासू-सासऱ्यांची अत्यंत लाडकी सून. घरातल्यांचे, बाहेरच्या येणाऱ्या-जाणाऱ्यांचे त्या मनापासून करीत. आळस त्यांना माहीत नव्हता. रावजींचे प्रपंचात फारसे लक्ष नव्हते. पण ती जबाबदारी गीताबाईंनी स्वीकारली. गावातल्या लोकांना अडीअडचणींच्या वेळी मदत करणे, स्त्रियांची बाळंतपणे करणे, औषधोपचार, दीनदुबळ्यांना जेवण, कपडालत्ता देणे हे त्या मनापासून करीत. गोंदवल्याची ती साक्षात रुक्मिणी होती. आपल्यासाठी ही माय-माऊली किती कष्ट करते हे गोंदवलेकरवासीयांना कळत होते. तिचे उतराई कसे व्हावे ? हा प्रश्न त्यांना असायचा आणि ते सारे त्यांना विचारीत असत. तेव्हा त्या म्हणायच्या 'मला काय कमी आहे. तुम्ही रोज एक हजार नामाचा जप करायचा नियम करा म्हणजे मला सर्व काही मिळाले.' अशा ह्या गीताबाईंचे महाराजांच्या वेळेचे डोहाळे फार विलक्षण होते. डोहाळे लागताच मुखातून 'श्रीराम श्रीराम' हे शब्द निघाले. दासबोध श्रवण करावासा वाटू लागला. पुष्कळदा तंद्रीत बसल्या की आपल्या कानात कोणीतरी 'रामनाम' घेत आहे असा त्यांना भास होई. मुलाचे पाय पाळण्यात दिसतात असे म्हणतात. इथे मात्र डोहाळ्यात मुलाचे पाय दिसू लागले, असे म्हटले तर फारसे वावगे ठरणार नाही.

'पवित्र ते कुळ पावन तो देश । जेथे हरीचे दास जन्म घेती ।' अशा पवित्र पुरुषाच्या जन्माने ते कुळ, तो देश पवित्र होतात. आजोबांच्या संगतीत त्यांचे बालपण गेल्यामुळे ते जे करतील तसे महाराज करीत असत. लहानपणीच ते गीता म्हणू लागले. जप करू लागले. त्यांची वृत्तीच सात्त्विक व परोपकारी होती. लहानपणापासून त्यांचा ओढा परमार्थाकडे दिसून येत होता. त्यांच्या ह्या वृत्तीकडे पाहूनच लिंगोपंतांना आपल्या वंशात जन्मलेली अमृतवेली आहे, पांडुरंगाच्या कृपेने ती आपल्याला लाभली आहे, हा कोणीतरी योगभ्रष्ट पुरुष असावा, असे वाटत होते. जनरीतीप्रमाणे मौंज झाली. या संस्कारामुळे ते अधिकच अंतर्मुख बनले. ध्यानाचे वेडही त्यांचे वाढत गेले. संसारात लक्ष लागेल म्हणून त्यांचे लग्नही करण्यात आले. इथे श्रीसमर्थ रामदासांची आठवण झाल्याशिवाय रहात नाही. 'चिंता करतो विश्वाची' असे म्हणणाऱ्या समर्थांचाच महाराज हे अवतार होते असेही म्हटले जाते. समर्थांनी जे कार्य केले तेच कार्य महाराजांनी पुढे केले आहे. दोघेही रामभक्त, जगाची चिंता वहाणारे. 'श्रीराम, जयराम जय जय राम' या त्रयोदशाक्षरी रामनामाच्या जपात रमणारे, राम कर्ता, करविता यावर विश्वास आणि तोच तारणार पण त्याच्यावर नितांत श्रद्धा ठेवा - 'यत्न तो देव जाणावा' असे दोघेही मानणारे. समर्थांसारखीच महाराजांनी अनेक ठिकाणी राममंदिरे उभारली. म्हणून त्या दोघांत साम्य आढळते. महाराज प्रापंचिक होते. एक नव्हे तर दोन विवाह झाले होते. पहिला विवाह गोंदवल्याजवळील खातवळ गावातील गोडसे यांच्या कन्येशी झाला. महाराजांनी त्यांना रामनामाकडे वळविले होते. अत्यंत सात्त्विक अशा सरस्वतीबाई बाळंतपणातच देवाघरी गेल्या. आईच्या हट्टासाठी दुसरा विवाह केला. पण तो एका अटीवर केला - स्वतःच्या पसंतीची मुलगी करीन म्हणून. ही मुलगी म्हणजे आटपाडीच्या सखारामपंत देशपांडे यांच्या अनेक मुलींपैकी जी आंधळी होती, जिला आयुष्यात कोणी विचारणार नाही, पुसणार नाही, तिला त्यांनी आपली सहधर्मचारिणी म्हणून स्वीकारले. तिचेही त्यांनी नाव सरस्वतीच ठेवले. हा त्यांचा लौकिक परिचय.

ह्या प्रपंचात त्यांचे मन रमेना. उलट ते अधिकच ध्यानमग्न होऊन बसू लागले. त्यांच्या मनाला लागलेली तळमळ कोणालाच समजू शकत नव्हती. तेवढी कोणाचीच पात्रता नव्हती. शेवटी ते एका रात्री गुरूच्या शोधार्थ बाहेर पडले.

'सद्‌गुरुवाचोनी सापडेना सोय । धरावे ते पाय आधी आधी ।'

उपनिषदात सांगितल्याप्रमाणे 'उत्तिष्ठत । जाग्रत । प्राप्य वरान् निबोधत ।'

अर्थात उठा, जागे व्हा आणि श्रेष्ठांकडून बोध प्राप्त करून घ्या. श्रेष्ठ म्हणजे गुरु.

गुरूच्या शोधाची लागलेली त्यांची व्याकुळता, तळमळ फार मोठी होती. त्यासाठी ते खूप हिंडले. या पायी प्रवासात अनेक संत त्यांना भेटले. अक्कलकोटकर स्वामी, माणिक प्रभु, काशीमध्ये तैलंग स्वामी. काशीमधून बाहेर पडल्यावर नैमिषारण्यात अनेक योगी भेटले. कलकत्त्याला श्रीरामकृष्ण भेटले. या सर्वांनी आपल्याला फक्त आशीर्वादच दिला असे त्यांना समजले. आपले काम झाले नाही. मनाला शांती लाभत नव्हती. दक्षिण हिंदुस्थान पालथा घालावा म्हणून तिकडे वळणार तितक्यात श्रीसमर्थ संप्रदायातील मोठे सत्पुरुष श्रीरामकृष्ण प्रकट झाले व त्यांनी येहले गावच्या तुकाराम चैतन्यांकडे जा. तिथे तुझ्या मनाचे समाधान होईल, असे सांगून ते पहाता पहाता नाहीसे झाले. हे तुकाराम चैतन्य म्हणजे तरी कोण ? संतसुद्धा दोन प्रकारचे असतात. एक विरक्त, समाजाला सहसा जवळ न करणारे. अवधूत, बाल, पिशाच्च वृत्तीनं वागणारे या वर्गात मोडणारे. या वर्गात मोडणारे एक अक्कलकोटकर स्वामी व दुसरे तुकाराम चैतन्य आणि दुसरा वर्ग म्हणजे अधिकाराचा विचार न करता सर्वसामान्य जनाला जवळ करणारा, मातेच्या कळवळ्याने काळजी वाहणारा. महाराज हे दुसऱ्या वर्गात मोडतात.

गुरुसेवेचा आदर्श ज्ञानेश्वरांनी १३ व्या अध्यायातील 'आचार्योपासना' यावरील भाष्यात उत्कृष्टपणे उभा केला आहे.

गुरुकृपा संपादन करण्यासाठी महाराजांना खूप हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या. त्यात तुकाईसारखे पहिल्या वर्गात मोडणारे अवधूत, संत त्यांची कृपा संपादन करायची म्हणजे मोठी अवघड गोष्ट. पाणी भरणे, घर-अंगणे झाडणे, तुकामाईला खाऊ घालणे, झोपेपर्यंत वारा घालणे, पाय चेपणे, एवढे करूनही तुकाई त्यांना चारचौघात शिव्या घालीत, मारीतसुद्धा. पण न बोलता महाराज सहन करीत. पुढे तुकाईला काय लागते हे समजल्यावर आधीच त्यांच्या पुढे त्या गोष्टी आणून ठेवीत आणि हळूहळू त्यांच्या सान्निध्यात राहिल्यावर त्यांच्या प्रेमास महाराज पात्र होऊ लागले. शेवटी तुकाईने मी हे असे का वागलो याचे स्पष्टीकरण महाराजांना दिले. तुला समाजात वावरताना सारा अपमान, निंदा जिरविता आली पाहिजे. तो अपमान, छळ, निंदा पचवून जगाचे आघात शांतपणे गिळून पुन्हा आपली निष्ठा जशीच्या तशी ठेवणे यालाच परमार्थ म्हणतात.

अशा रीतीने साधन काळात महाराजांनी निमिषारण्यात योगादी साधनेही केली होती. त्यांना सिद्धीही प्राप्त झाल्या असाव्यात, असे त्यांच्या चरित्रावरून समजते. परंतु हा मोठा मार्ग सामान्य माणसाला न पेलणारा असल्याने सामान्याला जमेल, पेलवेल असा भक्तिमार्गच योग्य आहे, असे त्यांना वाटले. त्यातही नाममार्ग. 'यथा सांग ते कर्म काही घडेना' असे रामदासांनी सांगून ठेवले आहे. याचा अर्थ यज्ञयागादी कर्माचा मार्ग अनुसरणे आजच्या काळात अशक्य आहे. शक्य झाले तरी भक्तीशिवाय ते व्यर्थ आहे.

महाराज स्वतः गृहस्थ असल्याने कौटुंबिक अडीअडचणी त्यांना माहिती होत्या. सामान्य माणसाला विरक्त होऊन आत्मज्ञानाची साधना करणे शक्य नाही हेही ते जाणून होते. म्हणूनच त्यांनी समाजाला नामस्मरणासारखा सोपा पण खात्रीचा मार्ग दाखविला. ते स्वतः आयुष्यभर गोंदवलेसारख्या खेड्यात राहिले. कीर्तन, प्रवचनांद्वारे अत्यंत सोप्या भाषेत उपदेश करून त्यांनी लोकांना भक्तिमार्गाकडे वळविले. विशेषतः रामनामाकडे वळविले.

वेदांत हा केवळ पांडित्याचा विषय नसून तो दैनंदिन जीवनात आचरावयाचा असतो आणि ते आचरणही नामानेच सुलभ होते, हे त्यांनी सतत सांगितले. आल्या अतिथा अन्न द्यावे व अखंड रामनाम घ्यावे, असा त्यांचा सोपा संदेश आहे.

महाराज हे रामदासांचेच अवतार समजले जातात. रामभक्तीचा प्रसार करून लोकांना नामाला लावणे हेच त्यांचे अवतार कार्य होय. हे काम माणसाला प्रपंचात राहूनही करता येते. त्यांनी समर्थासारखी अनेक राममंदिरे स्थापली. मंदिरांपेक्षा तेथली उपासना अधिक महत्त्वाची, अशी त्यांची दृढ धारणा असल्याने मंदिराचे बाह्यांग फारसे भपकेबाज आढळत नाही. फक्त ते स्वच्छ, पवित्र असावे व त्यात निष्ठेने अखंड उपासना चालावी यावर त्यांचा कटाक्ष होता.

प्रपंचात राहून दैनंदिन कर्तव्ये पार पाडीत असताना तो परमार्थाची साधना करू शकतो हे त्यांनी - 'आधी केले मग सांगितले' - स्वतः आचरून सांगितले. सदाचार किंवा नैतिक चांगुलपणा हा परमार्थाचा पाया आहे. त्यामुळे आपल्या कर्तव्यात आपण चुकता कामा नये. मात्र आपण जे जे करतो त्यात राम कर्ता आहे ही भावना ठेवली पाहिजे. माझे जे आहे ते रामाचेच आहे. त्याच्याच कृपेने मला सर्व काही मिळाले आहे. मी रामाचा व राम माझा हा अद्वैती व्यवहार त्यांनी लोकांना शिकविला. माझ्या नसानसात राम आहे. माझ्या श्वासात राम आहे. रामाशिवाय मी पळभरसुद्धा राहू शकत नाही. एवढी जेव्हा दृढ श्रद्धा निर्माण होईल तेव्हाच माणूस त्याच्या दैनंदिन व्यवहारातील सुख-दुःखे पचवू शकेल. श्रीमहाराजांची ग्रंथसंपदा खूप मोठी आहे. पण त्यांनी केलेले काही अभंग, रामपाठ आणि शिष्यांना लिहिलेल्या पत्रात आपणास त्यांनी 'नामजपाची'च शिकवण दिली आहे. विशेषतः कीर्तन, प्रवचनातून त्यांनी रामनामाचाच प्रसार केला आहे.

श्रीमहाराजांनी आपले अवतारकार्य गोंदावले मुक्कामी राहूनच पार पाडले आणि त्यामुळे गोंदावल्याला क्षेत्राचे माहात्म्य प्राप्त झाले. गोंदावल्यावरूनही ते दोनदा तीर्थयात्रेस जाऊन आले. आपल्या मातोश्रींनाही तीर्थयात्रेस नेऊन पुत्रकर्तव्य पार पाडले. बाकीचा पुढील काळ त्यांनी गोंदावल्यालाच काढला. असे असले तरी त्यांच्या कीर्तीचा सुगंध दूरवर पसरून त्यांच्या दर्शनासाठी व प्रेमळ उपदेशाने मिळणाऱ्या मनःशांतीसाठी दूरवरून लोक गोंदावल्यास येत असत. त्यात त्यांचे अंतरंग व अधिकारीही होते. स्वतः श्रीब्रह्मानंद महाराज, डॉ. कूर्तकोटी शंकराचार्य (महाभागवत), श्री. आनंदसागर इ. अधिकारी शिष्य गोंदावल्यास महाराजांच्या सेवेसाठी राहिले. श्रीब्रह्मानंदांना तर त्यांनी नाम देण्याचा अधिकार दिला होता. महाभागवत तर पुढे कूर्तकोटी - शंकराचार्य म्हणून प्रसिद्धीस आले. महाराष्ट्रातच नव्हे तर महाराष्ट्राबाहेर कर्नाटक , मध्यप्रदेश इ. ठिकाणी महाराजांचा शिष्यपरिवार आहे. गोंदवल्याचे वैशिष्ट्य म्हणजे तिथे

महाराजांची गादी अशी नाही तर त्यांची समाधी हेच गुरुपीठ आहे. आजही हजारो लोक समाधीवरून 'नामदीक्षा' घेतात. श्रीमहाराजांच्या चैतन्यशक्तीचा अनुभव आणि प्रचीति आजही भक्तांना येत असल्याने गोंदावल्याचे समाधी-मंदिर म्हणजे जागृत 'नामशक्तिपीठ' म्हटले तर वावगे होणार नाही. श्रीमहाराजांना योगसिद्धी प्राप्त असूनही ते चमत्कार दाखविणे हे त्यांच्या स्वभावात नव्हते. मात्र शिष्यांची घेतलेली जबाबदारी गुरु या नात्याने पार पाडण्यासाठी त्यांनी थोडा उपयोग केला. त्यांनी हजारो लोकांना नामाला लावले हाच मोठा कलीयुगातील चमत्कार होय.

महाराजांचे व्यक्तित्त्व आईसारखे होते. त्यांच्या दर्शनाला येणाऱ्यांचे स्वागत 'या बरं बाळ !' या संबोधनाने होई आणि त्यातील मातेसारख्या प्रेमाने माणूस भारावून जाई. नामाचा उपयोग सांसारिक दुःखे दूर करण्यासाठी न करता भगवंताच्या प्राप्तीसाठीच करावा अशी त्यांची शिकवण होती. तरी नामाने सांसारिक दुःखेही दूर होतात याची प्रचीति लोकांना दिली. शेवटी त्यांना हिंग-मिऱ्याच्या गिऱ्हाईकांपेक्षा नामासाठी नाम घेणारे कस्तुरीचेच गिऱ्हाईक हवे होते. गाईवर त्यांचे विशेष प्रेम होते. कसायाला विकल्या जाणाऱ्या गायी ते स्वतः विकत घेत व त्यांचे रक्षण करीत. नामाबरोबर त्यांनी अन्नदानाचेही महत्त्व आवर्जून सांगितले. माणदेशचा बाजार गोंदावल्याला भरविण्यामागे महाराजांचा महत्त्वाचा उद्देश म्हणजे लोकांना 'अन्न आणि नाम' या दोघांची सोय उपलब्ध व्हावी हाच होता.

महाराज हे ब्रह्मचैतन्यस्वरूप असले तरी ते देहधारी असल्याने जन्म, जरा, व्याधी आणि मृत्यू या उपाधी त्यांनाही लागल्या. त्यांचा दम्याचा विकार पुढे वाढत गेला. त्यांच्या कार्याचा व्याप व लोकसंग्रह वाढतच होता. त्यामुळे विश्रांतीची आवश्यकता असूनही त्यांनी ती घेणे शक्य नव्हते. हळूहळू ते निर्वाणाची कल्पना लोकांना सूचकपणे देऊ लागले. परंतु ते समजणे अवघड होते. सर्वांचा निरोप घेण्यासाठी त्यांनी सुरुवात केली होती. त्यात त्यांचा 'बताशा' घोडाही आला. श्रीब्रह्मानंदांशी बोलणे पंढरपुरातच झाले होते आणि शेवटी गोंदवल्याचा हा नामदीप २२ डिसेंबर १९१३ या दिवशी पहाटे आपले सीमित अस्तित्व विसर्जित करून अखंड तळपळणाऱ्या चित्-सूर्यामध्ये विलीन झाला. संताला देहात पाहू नये तर त्यांच्या उपदेशात पहावे, असे महाराज सांगत असत. महाराजांचे निर्वाणापूर्वीचे शब्द होते :

'जेथे नाम तेथे माझे प्राण । ही सांभाळावी खूण ।' महाराजांच्या चैतन्यस्वरूपाची प्रचीति आजही सर्व भक्तांना नामाच्या स्वरूपात येत असल्याचे दिसून येते. महाराज म्हणजे साक्षात नामब्रह्म होत. त्यांच्या जीवन व कार्याचे सार ज्या सुप्रसिद्ध श्लोकात व्यक्त झाले आहे त्या श्लोकाने प्रस्तुत लेखाला पूर्णविराम देते.

जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला ।<br>
जयाने सदा वास नामात केला ।<br>
जयाच्या मुखीं सर्वदा नामकीर्ती ।<br>
नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ती ।।

सौ. वीणा शं. तळघट्टी<br>
चैतन्य, २, गणंजय हौ. सोसायटी, कोथरुड, पुणे २९.

# कर्नाटकातील गोंदवले - 'हेब्बळ्ळी'

श्री. ना. वा. अत्रे

*निवृत्त शिक्षक, एम. ए., (पुणे विद्यापीठ) इतिहास हा खास विषय. वृत्तपत्रे, नियतकालिके, मासिके यातून इतिहास विषयावर लेखन,पुणे आकाशवाणीवरून ऐतिहासिक विषयांवर भाषणे. शैक्षणिक व सांस्कृतिक कार्याबद्दल पुरस्कार, सांस्कृतिक कार्यक्रमात कथाकथन.*

भारताचे माजी उपराष्ट्रपती श्री. जत्ती श्रीगुरुदेवांच्याकडे निंबाळला मधून मधून येत असत. त्यांच्याशी सुखसंवाद करीत असताना श्रीगुरुदेव म्हणाले, 'अहो ! विजेचा प्रवाह जसा असतो तसा अध्यात्माचा प्रवाहसुद्धा असतो. पावसाचे पाणी जसे जमिनीत झिरपते तसा हा अध्यात्माचा विद्युत प्रवाहसुद्धा जमिनीतून खोलवर झिरपत जातो. ह्या प्रवाहाचा साठा व शक्ती भिन्न स्थळी बदलत असते. कधी हा आध्यात्मिक प्रवाह अगदी जमिनीच्या पृष्ठ भागालगत असतो. अशा वेळी कोणी साक्षात्कारी अधिकारी पुरुष जर त्या जागेवरून जात असेल तर अशी पारमार्थिक शक्ती एखाद्या चुंबकीय क्षेत्राप्रमाणे आपल्या पावलांना खाली खेचते आहे, असे त्याला वाटते. अशा पवित्र ठिकाणी संतांचे आश्रम उभारले जातात किंवा देवदेवतांची मंदिरे बांधली जातात.'

## बिदरहळ्ळीच्या सोहळ्यास श्रीमहाराजांची उपस्थिती

श्रीमहाराजांचे शिष्य श्रीब्रह्मानंद, श्री. हणमंतराव कुलकर्णी, श्री. कृष्णशास्त्री उप्पिनबेट्टिगिरी, डॉ. कूर्तकोटी, श्री. भीमराव गाडगुळी, श्री. नारायणाप्पा कुंदकोळ ही सर्व मंडळी कर्नाटकातीलच. श्रीब्रह्मानंद महाराजांनी सन १९०९ मध्ये बिदरहळ्ळीला श्रीराम नामाच्या तेरा कोटी जपाचा सांगता यज्ञ मोठ्या वैभवाने साजरा केला. या यज्ञास श्रीमहाराजांनी उपस्थित रहावे असे आग्रहाचे प्रार्थनापत्र त्यांनी श्रींना गोंदवल्यास पाठविले. श्रींनी त्यास अनुमती दिली. त्या वेळी त्यांची प्रकृती बरी नसताही ते बिदरहळ्ळीला निघाले. हुबळी येथे आल्यावर तेथील श्री. तबीब आणि श्री. करी यांच्या प्रार्थनेला मान देऊन तेथे श्रीरामाची प्रतिष्ठापना केली. नंतर ते बिदरहळ्ळीला आले. सांगता समारंभासाठी भव्य सभामंडप घातला होता. श्रींचे तेथे अपूर्व स्वागत झाले. त्यांच्या दर्शनाने सर्व साधक भारावून गेले. नामस्मरण आणि अन्नदान हे या सोहळ्याचे वैशिष्ट्य होते. श्रीब्रह्मानंद महाराज जातीने लक्ष घालीत होते. त्यांची योजकता आणि शिस्त अपूर्व होती. हे सर्व पाहून श्रीमहाराज प्रसन्न झाले. हा भव्य सोहळा प्रतिपदेपासून षष्ठीपर्यंत चालला. सप्तमीला श्रीमहाराज हुबळीला आले. तेथील रामनवमी व दशमीचा पारणा संपवून ते हेब्बळीला निघाले.

## श्रीमहाराजांच्या पुण्य पदन्यासाने पावन झालेली हेब्बळ्ळी

हुबळी येथील श्रीरामनवमीचा कार्यक्रम संपवून श्रीमहाराज रेल्वेने निघाले. कुसुगल स्थानकावर उतरताच हेब्बळ्ळीच्या नागरिकांनी त्यांचे अभूतपूर्व स्वागत केले. त्या वेळी श्रींच्या समवेत बरीच मंडळी होती. हेब्बळ्ळीचे श्री. नाडगीर यांनी शंभरावर बैलगाड्या श्रीमहाराजांची मंडळी व त्यांच्या सामानासाठी पाठविल्या होत्या. हेब्बळ्ळीचे वातावरण श्रीरामनामाच्या अखंड उद्घोषाने भारून गेले होते. तेथील श्री. नाडगीर यांच्या वाड्यात श्रींचा मुक्काम होता. श्री. वेंकनगोंडा नाडगीर हे श्रीमहाराजांचे शिष्य. ते कूर्तकोटीला पोलीस पाटील होते. मागे श्रीमहाराज एकदा कूर्तकोटीला गेले असता तेथील बाजारात गायी कसायास विकल्या जात असल्याचे दृश्य त्यांनी पाहिले. त्यांनी श्री. नाडगीर यांना बोलाविले व 'कसायास गायी देऊ नका' असे त्यांना सांगितले. त्यांनी श्रीमहाराजांचे ऐकले. श्रीमहाराजांवर त्यांची श्रद्धा बसली. ते पुढे गोंदवल्यासही जात होते. कर्नाटकात याल तेव्हा हेब्बळ्ळीस अवश्य यावे, अशी त्यांनी श्रींना प्रार्थना केली. त्यांनी श्री. नाडगीरांना होकार दिला होता. ते स्मरून श्रीमहाराज हेब्बळ्ळीला आले. त्या दिवशी एकादशी असल्याने अखंड नामस्मरण चालू होते. अवघी हेब्बळ्ळी या आनंद सागरात न्हाऊन निघाली.

## पादुकांवर श्रींनी पाय ठेवले

> आपले चित्त नामात गुंतले म्हणजे देहाला प्रारब्धाच्या स्वाधीन करता येते. ही युक्ती ज्याला साधली त्याला सुख-दुःखाची बाधा उरत नाही. व्यवहाराचे मार्गाने जात असता भगवंताचे नाम कधी विसरू नये. आपल्या प्रयत्नाला जे फळ येईल ती भगवंताची इच्छा समजून जे पदरात पडेल त्यात समाधान मानावे. आपण प्रपंची लोक आहोत म्हणून प्रपंचाला उचित असणारा प्रयत्न केल्यावाचून कधी राहू नये. पण प्रपंच हेच आपले सर्वस्व आहे असे न मानता त्यामध्ये भगवंतास विसरू नये.
>
> - श्रीब्रह्मचैतन्यमहाराज गोंदवलेकर

दुसऱ्या दिवशी द्वादशीला श्री. नाडगीरांनी श्रीमहाराजांना उच्चासनावर विराजमान केले. त्यांनी आधीच तयार करून आणलेल्या शिलापादुका श्रींच्या पायाखाली ठेवल्या. त्यांची यथाविधी पूजा केली. त्या वेळी श्री. एकनाथ गौडा व त्यांच्या पत्नी सौ. कमलाबाई यांनी पुण्याहवचन केले. त्या दिवशी अन्नदानही खूप केले. नंतर त्या शिलापादुका विधीपूर्वक वाड्याच्या परसात एका छोट्या राऊळात श्रीमहाराजांच्या उपस्थितीत स्थापन झाल्या. सध्या हेबळ्ळीच्या शानदार मंदिरात स्थापिलेल्या ह्याच त्या पादुका होत. अवघ्या भारतातील हे एकमेव स्थिर पादुका मंदिर होय. छोट्या राऊळात असलेल्या ह्या पादुका पुढे कालाच्या ओघात स्मृतिआड झाल्या.

## अध्यात्मिक शक्तीचे पुनरुत्थान

सन १९८३ मध्ये पूजनीय श्री. बाबा बेलसरे श्रीगोपालकृष्णाच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करण्यासाठी बंगलोरला गेले होते. त्या ठिकाणी त्यांना हेब्बळ्ळी येथील श्रींच्या पादुकांसंबंधी वृत्त कळले. हेब्बळ्ळीला येऊन त्यांनी श्रींच्या पादुकांचे दर्शन घेतले. नंतर त्यांनी गोंदवले येथील विश्वस्तांना हे वृत्त कळविले. विश्वस्तांनी या स्थानास भेट देऊन नित्य पूजा-अर्चा याची व्यवस्था केली. श्री. नाडगीर यांच्या परसातच ह्या छोट्या राऊळाचे स्थान असल्याने ते त्यांच्या खाजगी मालकीचे होते. सन १९८४ मध्ये या मंदिराला पंच्याहत्तर वर्षे पूर्ण झाल्याबद्दल तेथे अमृत महोत्सव मोठ्या थाटाने संपन्न झाला. यातूनच या मंदिराचे विश्वस्त संस्थेत रूपांतर झाले. श्री. नाडगीर यांनी मंदिरासकट आपली वास्तू विश्वस्त संस्थेस दिली. येथून पुढे या मंदिराची कीर्ती, उत्कर्ष व प्रसार झपाट्याने होऊ लागला.

## उपासनेचा मोठा आश्रयो

सध्या हेब्बळ्ळीस असलेले श्री. दत्तण्णा हे मूळचे कर्नाटकातील रहिवासी. जीवनातील योगायोगाने ते गोंदवल्यास आले. तेथे साधन झाल्यावर त्यांना श्रींचा अनुग्रह मिळाला. नंतर ते नेमावरला गेले. तेथे उग्र साधना करीत असताना अध्यात्मात त्यांचे सखोल चिंतन झाले. पुढे गोंदवल्यास आल्यावर श्रीमहाराजांच्या शिकवणुकीचा प्रसार करणे हे एकमेव जीवनकार्य त्यांनी निश्चित केले. श्रीशंकराचार्यांच्या जवळ त्यांचा पूर्वी झालेला वेदान्ताचा अभ्यास, उदंड पाठांतर, सखोल चिंतन, हिंदी, कन्नड भाषेवरील प्रभुत्व, अध्यात्मिक विषय सोपा करून सांगण्याची हातोटी, अत्यंत साधी राहणी इत्यादीमुळे त्यांना प्राप्त होत असलेली लोकप्रियता जाणून गोंदवल्याच्या विश्वस्तांनी त्यांना हेब्बळ्ळीला पाठविले. छोट्या राऊळातील श्रींच्या पादुका, परिसर यांची स्वच्छता करून पादुकांचे त्यांनी पूजन केले. त्याच ठिकाणी ते साधनेला बसले. श्रींच्या आदेशानुसार तेथे उपासनेस प्रारंभ केला. श्रींच्या पादुकांवर सध्या गाभारा, पुढे सभामंडप, स्वतंत्र मोठा हॉल, कोठी, स्वयंपाकघर, निवासासाठी खोल्या, चोवीस तास पाणी अशा सुविधा झाल्या आहेत. आजपावेतो त्रयोदशी अक्षर या तारक मंत्राच्या तेरा कोटीची एक अशा एकोणचाळीस आवृत्त्या झाल्या आहेत. हेब्बळ्ळी येथील पहाटे काकड आरतीपासून रात्री शेजारती पर्यंतची सर्व उपासना मराठीतून होते. कारण ती आपल्या सद्‌गुरुंची भाषा होय. ही सर्व उपासना तेथील साधक अत्यंत तन्मयतेने आणि प्रेमाने करतात. श्री. दत्तण्णा तेथील साधकांना रुद्र आणि उपासना शिकवितात. गावातील मुले साप्ताहिक आश्रमात येतात. त्यांच्याकडून अर्धा तास मोठ्याने त्रयोदशाक्षरी मंत्र म्हणून घेतला जातो. प्रसाद म्हणून प्रत्येकाला पाव किलो तांदळाची पिशवी दिली जाते. गोंदवल्याप्रमाणे हेब्बळ्ळीलाही गोशाळा आहे. दूध, तूप बाहेरून घ्यावे लागत नाही. तसेच आश्रमाची थोडी शेती असल्याने भाजीपालाही मिळतो. विविध तऱ्हेच्या सुवासिक फुलझाडांनी समृद्ध अशी पुष्पवाटिकाही आहे. कर्नाटकातून तसेच इतर प्रांतांतून भक्तगण श्रींच्या पादुकांचे दर्शनार्थ येतात. तेथे साधना करतात. भक्तिरसाने ओथंबिलेले असे आश्रमाचे वातावरण आहे.

## नामसाधना अभ्यास शिबिरांची योजना

गोंदवल्याप्रमाणे हेब्बळ्ळी येथेही पूज्य बाबा बेलसरे यांच्या मार्गदर्शनाखाली नामसाधना अभ्यास शिबिरे झाली. भाषेची अडचण वाटली नाही. पू. बाबा निरूपण करीत असता मध्ये थोडे थांबत आणि श्री. दत्तण्णा त्याचा अनुवाद सुंदर आणि यथोचित शब्दात करीत. सध्याही काकड आरती झाल्यावर श्री. दत्तण्णांचे एक तास ज्ञानेश्वरीवर निरूपण होते. हेब्बळ्ळीला जप आणि चिंतन यांचा सुरेख समन्वय साधला गेला आहे. पू. बाबा बेलसरे यांनी लिहिलेले श्रीमहाराजांचे चरित्र आणि वाङ्मय आणि त्यांच्या सर्व ग्रंथांचे कानडीत रूपांतर श्री. दत्तण्णांनी केले आहे. श्रींच्या प्रवचनाच्या ग्रंथाचेही कानडीत रूपांतर झाले असून या सर्व ग्रंथांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत. श्री. दत्तण्णांची उपासना व ते करीत असलेले श्रींचे कार्य पाहून पू. बाबा बेलसरे यांना धन्यता वाटे. श्री. दत्तण्णा यांनी सध्या क्षेत्रसंन्यास घेतल्याने ते बारा वर्षे हेब्बळ्ळीच्या बाहेर जाणार नाहीत. नामसाधनेवरच त्यांनी आपले लक्ष केंद्रित केले आहे.

## हेब्बळ्ळीत दुमदार मंदिरांची उभारणी : श्री गणपती मंदिर

हेब्बळ्ळी नजिक नरेन्द्र नावाचे खेडे आहे. त्या गावानजीक असलेल्या ओढ्यात एक भला मोठा दगड होता. गावातील परीट रोज त्यावर धुणे बडवीत असे. एक दिवस त्याला स्वप्न पडले. 'माझ्या पाठीवर धुणे बडविल्यामुळे माझी पाठ दुखत आहे.' परीटाने ही घटना श्री. दत्तण्णांना सांगितली. तेव्हा ते काही साधकांसह दोर, फावडी, पहारी घेऊन तेथे पोहोचले. दगडाबाजूची जमीन मोकळी करून त्याभोवती दोर आवळला आणि सर्वांनी खेचला. तो काय आश्चर्य ! दगडाच्या दुसऱ्या बाजूस एक देखणी श्रीगणपतीची मूर्ती निघाली. याच वेळी धारवाडला मोठा यज्ञसोहळा आयोजित केला होता. तेथे ही मंगलमूर्ती नेऊन विराजमान करण्यात आली. श्रीमंगलमूर्तीची षोडषोपचारे पूजा होऊन तिच्या आशीर्वादाने यज्ञयागाची सांगता झाली. त्यावेळी एक लक्ष मोदकांचे हवन झाले. हेब्बळ्ळीचे एक जुने मंदिर होते. त्यात देवही नव्हता. मंदिराच्या मालकाने ती वास्तू घेण्याबद्दल श्री. दत्तण्णांना विचारले, त्या वेळी संस्थानकडे तशी आर्थिक तरतूद नव्हती. अखेर त्याने मंदिराचे दानपत्र संस्थानकडे सादर केले. श्रीमंगलमूर्तीने स्वतःसाठी स्थान शोधले. या मंदिराचा जीर्णोद्धार करण्यात आला. श्रीमंगलमूर्तीची तेथे प्राणप्रतिष्ठा करण्यात आली. समोर २१' × २१' आकाराचा सुरेख सभामंडप बांधण्यात आला. त्यात अष्टविनायकांची छायाचित्रे लावण्यात आली. श्रीमंगलमूर्तीची रोज सकाळ-सायंकाळ पूजा-अर्चा होते.

## श्रीचिदंबर मंदिर

श्रीचिदंबर स्वामी नावाचे एक थोर सत्पुरुष कर्नाटकात सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेले. ते स्मार्त होत. सावित्री व सरस्वती ही त्यांच्या पत्नींची नावे. त्यांनी हेब्बळ्ळीला एका लिंगाची स्थापना केली. ह्या जागेला पू. बाबा बेलसरे यांनी भेट दिली तेव्हा ते म्हणाले, 'ही जागा साधनेसाठी उत्तम आहे.' श्री दत्तण्णांनी त्या जागेवर मंदिर

बांधण्याचा संकल्प केला. ११' × ११' चा गाभारा तयार करून त्यात श्रीचिदंबर स्वामींची सुरेख मूर्ती तयार करून तिची प्राणप्रतिष्ठा करण्यात आली. त्यांच्या दोन्ही बाजूस त्यांच्या पत्नी सावित्री आणि सरस्वती यांच्या मूर्ती बसविण्यात आल्या. गाभाऱ्यासमोरचा मंडप २२' × २२' आकाराचा असून तो बदामी दगडाचा बांधलेला आहे. त्याच्या बाहेर ३३' × ३३' आकाराचा मोठा मंडप असून त्याचेही बांधकाम बदामी दगडाचे आहे. या बांधकामाचे वैशिष्ट्य म्हणजे श्री. दत्तण्णा व आश्रमातील साधकांनी श्रमदानाने या मंदिराची उभारणी केली आहे. हे मंदिर आणि सभोवतालचा परिसर अत्यंत रमणीय आहे. नजिक असलेली सागांची झाडे आणि फळा-फुलांनी नटलेली पुष्पवाटिका प्रसन्नेत भर घालते. या मंदिरानजिकच श्री. दत्तण्णांनी आपल्या साधनेसाठी एक गुहा आणि त्या शेजारी छोटेखानी सभामंडप बांधला आहे. दुरून आलेल्या साधकांची भेट साधनेला जाण्यापूर्वी येथे होते.

नामस्मरण, अन्नदान यांचे ऐश्वर्य श्रीक्षेत्र गोंदवले येथे दिसून येते तसे साधनेचे ऐश्वर्य हेब्बळ्ळी येथे दिसून येते.

ना. वा. अत्रे
८९७ आमराई, भांडरकर रस्ता, पुणे ४११ ००४.

## श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज

ओंकाराचे रूपचि दुसरे राम नाम आहे ।
रामोच्चारे सकल विश्व हे सुखी होत आहे ।।
या तत्त्वाला जाणून ज्याने राम जपा केले ।
आणि जगाला राम जपाचे वेड लावियेले ।। १ ।।
त्या धर्म मूर्तिस विनम्र भावे ।
जप राम नामा करूनी भजावे ।।
दुजा मारुती लाभली ज्यास कीर्ति ।
नमस्कार त्या ब्रह्म चैतन्य मूर्ति ।। २ ।।

**ग. प्र. वाघ**



श्रीराम मंदिर मांडवे



श्री. वि. गो. चिवटे यांजकडील कमंडलु

# श्रीसद्गुरु गोंदवलेकर महाराजांच्या पुण्यस्मृती

**श्री. वि. गो. चिवटे**

*एम. ए. एल. एल. बी, ॲडव्होकेट. १७-१८ वर्षे वकिली व्यवसाय. लालबाग औद्योगिक इस्टेट व्यवस्थापन - २० वर्षे. प. पू. संत जनार्दनस्वामी खेर यांचे चरित्र लेखन. श्री गोंदवलेकर महाराज स्मरणिकेत लेख. संतांचा सहवास.*

पूर्व पुण्याईने आणि भाग्याने माझा जन्म अशा कुटुंबात झाला की त्यामध्ये मातृ-पितृ आणि श्वशूर घराण्यात प. पू. गोंदवलेकर महाराज यांनी अनुग्रहीत केलेल्या घराण्यामध्ये अखंड पारमार्थिक व अध्यात्मिक उपासना चालू होती. विशेषतः मातृ घराण्यात मांडवे, ता. माळशिरस, जि. सोलापूर येथे सद्गुरु गोंदवलेकर महाराजांनी स्थापन केलेल्या श्रीराम मंदिरामध्ये गोंदवले येथे होणाऱ्या उपासनेप्रमाणे पारमार्थिक उपासना गेली ९५/९६ वर्षे चालू आहे. हे श्रीराम मंदिर स्थापन करण्यापूर्वी श्री. गोविंदराव मांडवेकर आणि श्री. विष्णूपंत मांडवेकर यांचे कुटुंबीयांकडून ३॥ कोटी रामनाम जपाचा संकल्प श्रींनी करून घेतला. श्रीराम मंदिर स्थापनेनंतर गोंदवले येथील श्रीराम मंदिरात चालत असलेली उपासना या मंदिरामध्ये सुद्धा चालू रहावी म्हणून श्रीशंकरशास्त्री म्हासुर्णेकर यांना तेथे पाठवून त्यांचेमार्फत मांडवेकर कुटुंबातील सर्व मंडळींना पूजा-अर्चा व इतर उपासना शिकवली. अशा रीतीने हे सर्व कुटुंब अहोरात्र रामोपासनेस व नामस्मरणास लावले. या मंदिरासंबंधीची व श्री. गोविंदराव व श्री. विष्णूपंत मांडवेकर यांचे संबंधीची तपशीलवार माहिती 'श्रीराम चैतन्य १९९८' या स्मरणिकेत दिली आहे. माझ्या मातोश्री कै. सत्यभामाबाई व थोरले मामा कै. श्रीधरपंत मांडवेकर यांचेकडून काही घटना आठवणींच्या रूपाने आणि प्रत्यक्ष अनुभवाने वेळोवेळी सांगितल्या आहेत. माझ्या कै. मातोश्री व कै. श्रीधरपंत मांडवेकर हे दोघेही श्रीमहाराजांचे अनुगृहीत आणि कृपांकित होते. ते दोघेही दीर्घायुषी होते (अनुक्रमे ८९ वर्षे व ९२ वर्षे वयात त्यांनी देह ठेवला.) मला लहानपणापासून मांडवे येथील श्रीराममंदिराची उपासना आणि नामस्मरण याबद्दलचे आकर्षण आणि गोडी निर्माण झाली.

## मांडवेकर व चिवटे कुटुंबीय यांचे संबंध

श्रीसद्गुरु गोंदवलेकर महाराज यांचे सांगणेवरून माझे वडील व मातोश्री यांचा विवाह गोंदवले येथे थोरले राममंदिरात झाला. या विवाहामुळे सद्गुरुंच्या अनुगृहीत आणि उपासनेत असलेली दोन कुटुंबे एकत्रित आली. माझे आजोबा कै. लक्ष्मण अनंत उर्फ दाजी चिवटे हेसुद्धा सद्गुरुंची कृपा होऊन अध्यात्मिक मार्गात उच्च साधक झाले होते आणि ते वेळोवेळी श्रीसद्गुरुंचे भेटीस गोंदवलेस जाऊन रहात असत. आजोबांनी देह ठेवला त्या वेळी मी बी. ए.च्या वर्गात होतो. एकदा ते पुण्यास आले असताना श्री. तात्यासाहेब केतकर यांचा मुक्काम श्री. गणपतराव दामले यांचेकडे होता. श्री. तात्यासाहेब केतकर यांचे मुखातून श्रीसद्गुरु गोंदवलेकर महाराज बोलतात म्हणून त्यांना भेटण्यासाठी (सन १९३६) मी माझे आजोबांना घेऊन श्री. गणपतराव दामले यांचे घरी गेलो होतो. त्या वेळी श्री. तात्यासाहेब यांचे मुखातून श्रीमहाराज व माझे आजोबा हे सुमारे पाऊणतास बोलत होते. या प्रत्यक्ष भेटीत अनेक जुन्या आठवणींचा उल्लेख झाला होता, त्यावरून श्रीमहाराज पुन्हा प्रकट झाले असून ते श्री. तात्यासाहेब केतकर यांचे मुखातून बोलतात याबद्दल आजोबांची खात्री पटली. त्यांनी मला सांगितले की ज्या ज्या वेळी श्री. केतकर महाराज पुण्यास येतील त्या वेळी श्रीमहाराजांचे भेटीसाठी आणि दर्शनासाठी अगत्याने जा आणि आशीर्वाद घेत जा. तेव्हापासून मी श्री. तात्यासाहेबांना म्हणजेच श्रीमहाराजांनाा भेटण्यास जाऊ लागलो.

## माझे आजोबा कै. लक्ष्मण अनंत उर्फ दाजी चिवटे यांची आठवण

माझे आजोबा ज्या ज्या वेळी श्रीसद्गुरु महाराजांचेबद्दल आठवणी सांगत असत त्यापैकी एक हृद्य आठवण :

श्रीसद्गुरु महाराजांना भेटण्यासाठी माझे आजोबा गोंदवले येथे गेले होते त्या वेळी श्रीमहाराजांचेकडे बऱ्याच स्त्रिया / भगिनी आल्या होत्या व त्यांचेबरोबर श्रीमहाराज शेजघरात बोलत बसले होते तेव्हा श्रीमहाराज मोकळे होण्याची वाट पहात आजोबा श्रीराम मंदिरात बसून राहिले. त्या वेळी त्यांचे मनात श्रीमहाराजांचे विषयी या स्त्रियांबाबत किंचित विकल्प आला होता. थोड्या वेळाने त्या स्त्रिया श्रीमहाराजांचे खोलीतून बाहेर पडलेवर ते उठून श्रीमहाराजांचे शेजघरात जाऊ लागले. शेजघराचा दरवाजा उघडून आत जाणार तो श्रीमहाराज संपूर्ण स्त्रीवेषात असलेले दिसले. तेव्हा खोलीत आणि कोणी स्त्री आहे असे समजून परत फिरणार तोच श्रीमहाराजांचीच हाक त्यांना ऐकू आली, 'दाजी, मी खोलीत एकटाच आहे, तेव्हा तुम्ही आत या.' आणि आत गेल्यावर श्रीमहाराज पुन्हा म्हणाले, 'ज्या ज्या वेळी स्त्रिया मला एकांतात भेटतात त्या त्या वेळी मी ह्या तुम्ही पाहिलेल्या स्वरूपातच असतो.' हे ऐकून श्रीदाजींना खूप वाईट वाटले आणि पश्चात्ताप झाला. त्यांनी श्रीमहाराजांचे पाय धरून मागणे मागितले की, 'अशा तऱ्हेचे विकल्प मनात येण्याचे जाळून टाका आणि साधक अवस्थेमध्ये मन स्वच्छ राहण्याचा आशीर्वाद द्या.'

माझे मामा कै. श्रीधरपंत मांडवेकर यांना दीर्घायुष्य लाभले आणि त्यांनी मांडवे येथील श्रीराम मंदिरामध्ये भजन, पूजन व नामस्मरण करून मोठ्या प्रमाणावर उपासना वाढवली. त्यांच्या अंतःकाळची विशेष हकिगत म्हणजे सन १९८८ चे डिसेंबर महिन्यातील श्रीसद्‌गुरु गोंदवलेकर महाराजांचा अमृत महोत्सवी पुण्यतिथीचा गोंदवले येथे उत्सव सुरू होता, त्या उत्सवासाठी मी सहकुटुंब गोंदवलेस गेलो होतो. त्या वेळी गिरवी व मांडवे येथील काही भक्तमंडळी उत्सवानिमित्त गोंदवलेस आली होती. त्यांचेपैकी मांडवेकर मंडळींकडून मला समजले की श्री. श्रीधरपंत मांडवेकरांची प्रकृती खूप बिघडली आहे व त्यांचा भरवसा वाटत नाही. हे समजलेवर मी माझे सौभाग्यवतीसह खासगी गाडी करून ताबडतोब मांडवे येथे त्यांना भेटण्यास गेलो. त्यांची प्रकृती खूपच अशक्त झाली होती व मी तेथे जाण्यापूर्वी डॉक्टर नुकतेच येऊन गेले होते. आम्ही दोघे उभयतां त्यांचे खोलीत गेल्यावर आम्ही त्यांचे पायांवर डोके ठेऊन नमस्कार केला व गोंदवलेहून नेलेला अंगारा त्यांना लावला. त्याबरोबर ते अत्यंत क्षीण आवाजात मला म्हणाले, 'तुम्ही श्रीसद्‌गुरुमहाराजांचा अमृतमहोत्सवी उत्सव सोडून मला भेटण्यासाठी का आलात ? मी या उत्सवामध्ये मरणार नाही. व श्रीमहाराजही मला मरू देणार नाहीत. माझे अखंड नामस्मरण चालू असलेमुळे ते माझे जवळच आहेत. तेव्हा तुम्ही परत गोंदवलेस जा.' त्याच दिवशी संध्याकाळी आम्ही गोंदवलेस परत आलो. पुढे पुण्यतिथीचा दिवस २ दिवसांवर होता आणि खरोखर त्याप्रमाणे अमृत महोत्सवी पुण्यतिथीच्या तिसरे दिवशी त्यांनी देह ठेवला. श्रीमहाराजांचे वचनाप्रमाणे श्रीमहाराज नामसाधकाचा अंतःकाल साधतात हे प्रत्यक्ष आमचे अनुभवास आले.

## माझ्या सासूबाई कै. कमळाबाई देशपांडे यांचा अंतकाल

माझ्या सौभाग्यवतीचे मातोश्री कै. कमळाबाई देशपांडे ह्या हुबळीचे चिदंबर नाईक करी यांची ज्येष्ठ कन्या होत. त्यांचा विवाह आटपाडीचे कै. नागेशराव देशपांडे यांचे थोरले चिरंजीव श्री. माधवराव यांचेशी झाला होता व हे लग्नसुद्धा श्रीसद्‌गुरु महाराजांचे सूचनेप्रमाणे व आशिर्वादाने झाले. ह्या लग्नास श्रीमहाराज स्वतः हजर होते. कै. माधवराव हे श्रीमहाराजांचे अनुगृहीत होते आणि त्यांचे ज्योतिष शास्त्रावर उत्तम प्रभुत्व होते. सुरवातीस ते लग्नास अनुकूल नव्हते. आपण अल्पायुषी आहोत याचे त्यांना ज्ञान झाले होते म्हणून त्यांनी श्रीमहाराजांना लग्नाआधी आपली ही शंका बोलून दाखवली. त्यावर श्रीमहाराज आश्वासून म्हणाले की, 'तुझा संसार तू करणार नसून रामराया करणार आहे. तेव्हा काळजी करू नये.' ह्या बोलण्यानंतर हा विवाह संपन्न झाला. ही हकिगत कै. कमळाबाईकडूनच आम्हास समजली. त्या मोठ्या कर्तबगार होत्या. पतीच्या निधनानंतर त्यांनी आटपाडी येथील घर, शेती आणि इनामदारी वतन भरभराटीस आणले होते.

कै. कमळाबाई यांना पुढे कर्करोगाची बाधा झाली व त्यासाठी उपचार करण्यास त्यांना मुंबईस आमचेकडे यावे लागले. सुमारे १॥ वर्षे उपचारानंतरही प्रयत्न करूनसुद्धा फारसा उपयोग झाला नाही. अंतःकाली त्यांची प्रकृती फार बिघडलेवर उपचारासाठी डॉक्टरांचे सल्ल्यावरून सायन हॉस्पिटलमध्ये नेले होते. हॉस्पिटलमध्ये ऑक्सिजनवर ठेवले होते. आम्ही दोघेही व त्यांचे धाकटे दीर कै. इंदुकांत देशपांडे असे तिघे कॉटशेजारी उभे होतो. त्या परिस्थितीतही त्यांचे नामस्मरण चालू होते. अत्यंत क्षीण आवाजात हाताने खूण करून आम्हास जवळ बोलावले व म्हणाल्या की, श्रीसद्‌गुरुमहाराज इथे आले आहेत, त्यांना नमस्कार करा.' आणि हे सांगत असतानाच त्यांचा शेवटचा श्वास गेला. हे आम्ही प्रत्यक्ष ऐकले आणि पाहिले आहे. श्रीमहाराज नामसाधकाचा अंतःकाल साधतात याचे हे उत्तम उदाहरण आहे. त्यांचे निधन सन १९६७ साली वयाचे ६६ व्या वर्षी झाले.

## कै. श्री. चिदंबर नाईक - करी

हे हुबळीचे प्रख्यात व्यापारी होते. त्यांची मोठ्या प्रमाणावर उलाढाल करणारी १० लाख रुपयांची पेढी होती. हे सद्‌गुरु ब्रह्मानंद महाराजांचे मुळे श्रीसद्‌गुरु गोंदवलेकर महाराजांचे सहवासात आले व त्यांनी गोंदवले येथे येऊन अनुग्रह घेतला. त्या वेळी श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंद महाराजही हजर होते. श्रीगोंदवलेकर महाराजांनी अनुग्रहाचे वेळी श्रीब्रह्मानंद महाराजांना ह्या करी कुटुंबावर लक्ष देऊन त्यांचेकडून उपासना आणि नामस्मरण करवून घ्या म्हणून सांगितले. पुढे हळूहळू हे कुटुंब उपासनेला आणि रामनामाला श्रीब्रह्मानंद महाराजांनी लावले. श्री. चिदंबर नाईकांचे पेढीमध्ये लाखो रुपयांचा दररोज व्यवहार होत असे व ह्या व्यवहारामध्ये व्यापारी पद्धतीप्रमाणे धर्मादाय खाते म्हणून काही व्यवहारातील अर्धा ते एक टक्का म्हणून खरेदी विक्रीवर आकारून बाजूला ठेवत असत. त्या वेळेस तशी व्यापारी पद्धतही असे. श्रीसद्‌गुरु गोंदवलेकर महाराजांचेकडून अनुग्रह मिळाल्यानंतर सदर धर्मादाय खात्यातून येणाऱ्या रकमेचा विनियोग हुबळी येथे श्रीराम पंचायतन मंदिर स्थापन करण्यासाठी आणि गोंदवले येथील राममंदिराच्या उत्सव आणि इतर कामासाठी विनियोग करण्याचे ठरवले. अशा प्रकारे बरीच मोठी रक्कम जमा होत असे.

पुढे पहिल्या महायुद्धाचे समाप्तीनंतर सन १९२१ सालापासून फार मोठ्या जागतिक मंदीची लाट सुरू झाली. ह्या मंदीच्या लाटेचा परिणाम श्री. चिदंबर नाईक - करी यांचे पेढीवरही होऊ लागला आणि १९२१/२२ चे सुमारास या पेढीला फार मोठ्या प्रमाणावर धक्का बसून पेढीची आर्थिक स्थिती पूर्ण खालावली व पेढीच्या देणेकऱ्यांनी पेढीवर व त्यांच्या मालकावर कायदेशीर दावे चालू केले व त्याचा परिणाम श्री. चिदंबर नाईक यांना नादारी घेण्यात आला. पण ही नादारी घेण्यापूर्वी पेढीच्या व्यवहारामधील धर्मादाय खात्यामध्ये जमा असलेली रक्कम हुबळी येथील श्रीराम पंचायतन मंदिर स्थापन करण्यासाठी व गोंदवले येथील रामनवमी आणि श्रीसद्‌गुरुंचे उत्सवासाठी जमा असलेली सर्व रक्कम आपले बहिणीचे यजमान श्री. तबीब व गोंदवलेसाठीची रक्कम कै. श्री. गणपतराव दामले यांना बोलावून घेऊन त्यांचे हवाली केली व श्रीसद्‌गुरुंच्या ऋणातून श्रीसद्‌गुरुंनीच

मला मुक्त करावे अशी इच्छा प्रकट करून त्यांचे हवाली केली व त्यानंतर त्यांनी आपली सर्व इस्टेट, घर-दार कोर्टाचे ताब्यात देऊन आपण नादारी पत्करली.

लक्षावधी रुपयांचा व्यवहार करणारे मालक श्री. चिदंबर नाईक यांना आपल्या कुटुंबीयांचा चरितार्थ व भविष्यकाळ संपूर्ण अंधःकारमय असताना पेढीतील पूर्णपणे बाजूला काढलेली रक्कम श्रीराम पंचायतन मंदिर बांधण्यासाठी व श्रीसद्गुरुंच्या गोंदवले येथील राममंदिर आणि इतर उत्सवासाठी बाजूला काढलेली रक्कम स्वतःचे कुटुंबासाठी किंवा कोणत्याही स्वकीय कार्यासाठी न घेता ती श्रीसद्गुरुंच्यावरील निष्ठेने व स्वसंकल्पीत पारमार्थिक कार्यासाठीच या रकमांचा विनियोग केला व त्याचा कुठलाही उल्लेखही करू दिला नाही व त्याबद्दलचा आनंद अथवा खेदही वाटू दिला नाही. ही सर्व हकिगत कै. श्री. गणपतराव उर्फ तात्यासाहेब दामले यांचेकडून कळली. हा उल्लेख मी त्यांचा नातजावई असलेमुळे कर्नाटकातील सद्गुरु ब्रह्मानंद महाराजांच्या कार्याचा विषय व अनुभव सांगत असताना त्यांनी केला.

श्री. चिदंबर नाईक हे पेढीच्या नादारी अर्जाचा निकाल झालेनंतर काही वर्षे गोंदवलेस समाधी मंदिराचे परिसरात राहिले होते. त्याच वेळी त्याचेबरोबर माझ्या सासूबाई कै. कमळाबाई देशपांडे पती निधनानंतर आपल्या दोन मुली व एक मुलगा यासह त्यांचे बरोबर रहात होत्या. हा ही मोठा आकस्मित आघात त्यांना सोसावा लागला. त्याही परिस्थितीत ते मोठ्या धैर्याने मन आवरून श्रीमहाराजांचे चरणी सेवाभाव ठेवून राहू लागले. पुढे काही काळानंतर श्री. चिदंबर नाईक यांचे थोरले चिरंजीव श्री. शिवरामपंत यांना धुळे येथील बँकेत नोकरी मिळालेवर हे कुटुंब धुळ्यास रहाण्यास गेले. माझे लग्नानंतर सन १९४१ साली मी सहकुटुंब धुळे येथे गेलो. त्या वेळी प्रथम कै. चिदंबर नाईक यांची माझी भेट झाली. अखंड नामस्मरण, चिंतन याशिवाय त्यांचे तोंडून दुसरा विषयच ऐकण्यास मिळाला नाही. ते आत्मानंदी तृप्त होते. अत्यंत गोरेपान, बेताची उंची पण ओसंडून वहात असलेले अध्यात्मिक समाधान त्यांचे चेहेऱ्यावर दिसत असे. अजूनही माझे डोळ्यासमोर त्यांची तेजःपुंज मूर्ती उभी रहाते.

## श्रीसद्गुरु महाराजांचा प्रसाद

सन १९६१ सालात मी मुंबईस होतो त्या वेळी मुंबईत रहाण्याचे जागेअभावी पत्नी आणि मुले पुण्यास रहात होती व आठवड्यातून एकदा मी पुण्यास येत असे. एके दिवशी दुपारी १।।-२ चे सुमारास पुणे येथील आमचे घरी एक खूप वयस्कर असे संन्यासी आले.
त्या वेळी मुले शाळा-कॉलेजात गेली होती व पत्नी विश्रांती घेत होती. दरवाजा उघडून साधू-संन्यासी आलेले पाहून त्यांना काही दक्षिणा देण्यासाठी पत्नी आतील खोलीत जाणार तेवढ्यात ते संन्यासी साधू म्हणाले, 'मी गणपतीबुवा. माझे वय ११० वर्षांचे असून मी तुला ओळखतो. पण तू मला ओळखत नाहीस. मी मुद्दाम तुमची चौकशी करण्यास आलो आहे आणि तुझ्याकडे जेवणार आहे. मला दक्षिणा वगैरे काही नको.' त्यावर पत्नीने त्यांचे पायावर डोके ठेऊन त्यांना विनंती केली की मी ताजा स्वयंपाक करते तोपर्यंत आपण थोडी विश्रांती घ्यावी. त्यावर स्वामींनी होकार दिला आणि दोघेही स्वयंपाकघरात आले. आमचे देवघर स्वयंपाक घरातच एका कोपऱ्यात होते. तेथे स्वामींना बसावयास पाट दिला व पत्नी स्वयंपाकास लागली. स्वयंपाक चालू असताना स्वामींनी प्रश्न विचारून कुटुंबाची सद्यः परिस्थितीची माहिती करून घेतली. त्या वेळी आमच्या प्रापंचिक अडचणी, विशेषतः असलेला आर्थिक कर्जाचा बोजा वगैरे उल्लेख करून स्वामींना निवेदन केले. स्वयंपाक तयार झालेनंतर पत्नीने स्वामींची पाद्यपूजा केली. त्यानंतर स्वामींनी पत्नीस मूठभर कणीक घेऊन त्यात पाणी घालून गोळा तयार करण्यास सांगितले व देवघरातील देवापुढे नैवेद्य म्हणून ठेवून उदबत्ती लावून १० मिनिटे नामस्मरण करण्यास सांगितले. त्याप्रमाणे पत्नीने केल्यावर स्वामींनी त्या कणकेच्या गोळ्याकडे बोट दाखवून घरातील सर्वांना ७ दिवस प्रसाद म्हणून ग्रहण करण्यास सांगितले. पत्नीने त्या गोळ्याकडे पाहिले असता त्या गोळ्याचे खडीसाखरेच्या मोठ्या खड्यात रूपांतर झालेले दिसून आले. थोडी विश्रांती घेतल्यावर स्वामींनी आपले जवळ असलेला 'कमंडलू' आमचे घरीच ठेवला व म्हणाले तुझ्या मुलाला रु. ५००/- पगार होईल त्या वेळी मी पुन्हा येईन तेव्हा हा 'कमंडलू' घेऊन जाईन व यात्रेकरता रु. ५००/- देशील का ? एवढे विचारले आणि ते निघून गेले. त्यानंतर स्वामी आमचेकडे आले नाहीत व 'कमंडलू' मात्र अद्यापही आमचेकडे स्वामींचा प्रसाद म्हणून देवघरात ठेवला आहे. प्रत्यक्ष श्रीसद्गुरु ब्रह्मचैतन्य महाराजच स्वामींचे रूपात आमचे घरी येऊन प्रसाद आणि आशीर्वाद देऊन गेले आणि त्याची आठवण म्हणून हा 'कमंडलू' आमचेकडे ठेवला आहे. पूजा, नामस्मरण आणि इतर उपासना करताना श्रीसद्गुरुंचे आठवणीने ह्या 'कमंडलू'कडे पाहून हृदय भरून येते.

पुढे आमची राहाण्याची सोय म्हणून लालबाग इंडस्ट्रियल इस्टेटचे डायरेक्टर्स यांनी इस्टेटमधलाच एक मध्यभागी असलेल्या बागेचा प्लॉट होता त्यावर इस्टेटचे ऑफिस व मॅनेजरला राहण्यासाठी जागा म्हणून एक दोन मजली इमारत बांधली व त्यामध्ये ऑफिस आणि शेजारी राहण्याची जागा देऊन आमची राहण्याची सोय केली. राहाण्याचे घर आणि माझे ऑफिस हे दोन्ही एके ठिकाणी मुंबईसारखे ठिकाणी कुठलाही आर्थिक बोजा न पडता मिळणे हे श्रीसद्गुरुंचे कृपेशिवाय होणे नाही. अशा प्रकारे १९६४ साली आम्ही पुण्याहून मुंबईस सहकुटुंब राहावयास आलो. १९६४ ते १९७५ या काळात आमच्या सर्व प्रापंचिक अडचणी दूर होऊन मुला-मुलींची लग्ने झाली आणि आर्थिक स्थैर्य लाभले. या काळातच हळूहळू आमची उपासना, नामस्मरण आणि सद्ग्रंथांचे वाचन सुरू झाले.

## संत मंडळींचा सहवास आणि मार्गदर्शन

या काळातच म्हणजे १९६५ ते १९८४ आम्ही मुंबईस असताना साक्षात्कारी संत आणि स्वामी यांच्याही प्रत्यक्ष सहवासाचा आणि सत्संगाचा

लाभ मिळाला. ऋषीकेषच्या प. पू. शिवानंदांचे शिष्य प. पू. श्रीरामानंद सरस्वती हे वर्षातून डिसेंबर-जानेवारी या दरम्यान एक महिना आमचे घरी मुक्कामास येत असत. त्यामुळे आम्हास त्यांच्या सत्संगाचा, अनुभवाचा आणि मार्गदर्शनाचा लाभ मिळत असे. त्यांचे बरोबर गोंदवले, पंढरपूर, मंत्रालय (कर्नाटक) या ठिकाणीही मी त्यांना घेऊन जात असे. ते गोंदवलेसही आमचे बरोबर येऊन ८-१० दिवस रहात असत. गोंदवलेमधील श्रीसमाधी मंदिरात पूजा-अर्चा, ध्यान आणि नामस्मरण करीत असत. त्यांनी मला एकदा सांगितले की त्यांनी समाधी मंदिरात त्यांचे गुरुचे (प. पू. स्वामी शिवानंद महाराज) दर्शन झाले. त्याच वेळी ते म्हणाले की, मी संन्यासी काय देणार ? परंतु माझी इच्छा आहे की दरवर्षी गोंदवले येथील पुण्यतिथी उत्सवात श्रीमहाराजांचे समाधीवर अभिषेकासाठी ऋषीकेषहून गंगेच्या पाण्याचा डबा रेल्वेने पाठवीन तो तुम्ही उतरून घेऊन उत्सवासाठी गोंदवलेस आणावा. त्याप्रमाणे दरवर्षी त्यांचेकडून ऋषीकेषहून गंगेच्या पाण्याचा डबा रेल्वेने मुंबईस येत असे आणि तो डबा घेऊन आम्ही गोंदवलेस पुण्यतिथी महोत्सवास जात असू. अशा प्रकारे गंगेच्या पाण्याचा डबा प. पू. रामानंद स्वामींकडून १९८० सालापर्यंत म्हणजे त्यांचे हयातीपर्यंत येत असे.

याशिवाय आमची उपासना चालू असताना वेळोवेळी मालाड येथील प. पू. तात्यासाहेब केतकर महाराज व प. पू. केशवरावजी बेलसरे यांचे दर्शनास आणि मार्गदर्शनास जात असे.

सन १९७५ मध्ये बडोदे येथील प. पू. श्रीजनार्दन स्वामी खेर यांचाही सहवास, सत्संग आणि मार्गदर्शन याचा लाभ सुरू झाला. सुरुवातीस ते दर महिन्याला मुंबईस येत असत व आमचेकडे रहात असत. त्यांच्यामुळे ध्यानधारणा व जपाची बैठक यामध्ये प्रगती होऊ लागली. प. पू. श्री. जनार्दनस्वामींचे सहवासात अनेक ठिकाणी जाण्याचा योग आला. त्यांना घेऊन गोंदवले, पंढरपूर, अक्कलकोट, गाणगापूर, माचणूर, नगर, औरंगाबाद येथे जाण्याचा योग आला आणि संतसहवासाचा आनंद लुटता आला. प. पू. जनार्दन स्वामी हे ५-६ वेळा गोंदवलेस येऊन प्रत्येक वेळी ६-७ दिवस रहात असत. त्या वेळी आम्हीपण त्यांचेबरोबर रहात असू. त्यावेळेस ते नेहमी आम्हास म्हणत की, श्रीमहाराजांचे समाधीस्थान अत्यंत जागृत आहे. येथे येणाऱ्या नामसाधकाला आणि साक्षात्कारी पुरुषांना त्याची प्रचिती आलीच पाहिजे, असे हे पवित्र स्थान आहे.

पुढे सन १९८४ मध्ये आम्ही सहकुटुंब मुंबई सोडून पुणे येथे येऊन स्थायिक झालो. प. पू. श्रीजनार्दनस्वामी हे वेळोवेळी पुण्यास आल्यावर आमचेकडे अद्यापही प्रेमाने येत आहेत. सन १९८६ मध्ये श्रीसमर्थ अक्कलकोट स्वामी महाराज यांच्या पुण्यतिथी दिवशी जमलेल्या स्वामींच्या शिष्य आणि भक्तांच्या सभेत प. पू. जनार्दन स्वामींच्या षष्ठ्यब्दीपूर्ती समारंभानिमित्त त्यांचे जीवनचरित्र व प्रबोधन याची ग्रंथरूपाने निर्मिती करण्याची संकल्पना मांडली गेली व त्याप्रमाणे श्री. मा. पू. शास्त्री यांचे अध्यक्षतेखाली षष्ठ्यब्दीपूर्ती केंद्रीय समिती स्थापन झाली. या ग्रंथ प्रकाशन समितीने प. पू. स्वामींच्या सूचनेवरून ह्या ग्रंथाचे संपादकीय काम माझ्यावर सोपवले. अशा प्रकारच्या कामाचा पुर्वानुभव नसल्याने हे काम आपले हातून कितपत आणि कसे पार पडेल अशी शंका मी प. पू. स्वामींचेसमोर मांडली. परंतु या कामी मी तुझ्या पाठीशी आहे असे आश्वासन स्वामींनी दिल्यामुळे त्यांच्या उपस्थितीत मी हे काम स्वीकारले. या ग्रंथाची पाच विभागात आखणी केली (१) जीवन चरित्र, (२) अध्यात्मिक अनुभुती आणि प्रबोधन, (३) शास्त्रीय चर्चा व शंका समाधान, (४) शिष्य व भक्तांचे अनुभव, (५) प्रबोधनातील विषयासंबंधी कोष्टके. हे सर्व लिखाण ज्या ज्या वेळी प. पू. स्वामीजी येत असत त्या वेळी त्यांचेबरोबर चर्चा करून या लिखाणाचे कामी मार्गदर्शन घेतले. अशा प्रकारे १॥ वर्षापेक्षा अधिक काळ या ग्रंथाचे लेखन पुरे होण्यास लागला. या कामी लिखाणाचे काम प. पू. स्वामींचे शिष्य श्री. म. वा. खळदकर यांनी ग्रंथ पूर्ण होईतोपर्यंत सद्‌गुरुंचे कार्य आहे असे समजून निष्ठापूर्वक आनंदाने केले. या ग्रंथास प. पू. गुळवणी महाराज यांचे उत्तराधिकारी प. पू. दत्त महाराज कवीश्वर यांनी प्रस्तावना दिली आहे. तसेच पुणे विद्यापीठातील हिंदी भाषेचे प्राध्यापक संत वाङ्मयाचे अभ्यासू व नामदेव अध्यासनाचे प्रमुख डॉ. अशोक प्रभाकर कामत यांनी या ग्रंथाचे समीक्षण करून पुरस्कार वजा प्रस्तावना दिली आहे. श्रीसद्‌गुरु गोंदवलेकर महाराज व प. पू. जनार्दनस्वामी यांच्या कृपाप्रसादानेच हा ग्रंथ पूर्णत्वास गेला.

पुण्यात रहावयास आल्यानंतर येथील प. पू. माधवनाथजी महाराज यांचाही दर्शनाचा व सत्संगाचा लाभ झाला. प. पू. केशवरावजी बेलसरे यांनी सुचवले प्रमाणे अध्यात्मिक मार्गातील साधकांनी मधून मधून सत्संगासाठी एकत्र यावे आणि चिन्तनात्मक विषयांची चर्चा करावी म्हणून महिन्यातून एक दिवस १०-१५ साधकमंडळी आमचे घरी सत्संगासाठी एकत्र येऊ लागलो. हा कार्यक्रम गेले ४ वर्षे चालू आहे आणि विशेष उल्लेखनीय म्हणजे या आमचे कार्यक्रमामध्ये गेले २ वर्षे डॉ. व. दि. कुलकर्णी मोठ्या प्रेमाने आणि आपुलकीने भाग घेऊ लागले आहेत व त्यांच्याकडून ज्ञानेश्वरी, दिव्यामृतधारा, चांगदेव पासष्टी, अमृतानुभव आणि तुकाराम महाराजांचे अभंग यावर प्रवचन करून मार्गदर्शन करतात. हे सर्व श्रीसद्‌गुरु गोंदवलेकर महाराजांच्या कृपेने आणि आशिर्वादाने घडत आहे, अशी आमची दृढ श्रद्धा आहे. आज मितीस माझे वय ८२ वर्षांचे आहे व माझा संपूर्ण दिवस ध्यान, धारणा, नामस्मरण, वाचन आणि चिंतन यामध्ये व्यतीत होत आहे. श्रीसद्‌गुरु कृपेने वयोमानाप्रमाणे माझी प्रकृती उत्तम आहे व त्यामुळे सर्व तऱ्हेचे समाधान आहे.

श्री. वि. गो. चिवटे
१२४४ ब, श्रीराम अपार्टमेंटस्,
आपटे रोड, डेक्कन जिमखाना,
पुणे ४११ ००४, दूरभाष ३२१७६८.

# जगदाकारे व्यापून असलेले सद्‌गुरु श्रीब्रह्मचैतन्य महाराज

**श्री. यशवन्त माणकीकर**

*सेवानिवृत्त राजपत्रित अधिकारी. प्रथम तंत्रशिक्षण विभागाकडे प्रबंधक म्हणून . नंतर नौरोसजी वाडिया महाविद्यालय, पुणे येथेही प्रबंधक म्हणून प्रशासकीय कार्य. १९८८ मधे निवृत्त. १९७६ मधे गोंदवले येथे अनुग्रह. नंतर श्रीमहाराजांवर लेखन, काव्य हा छंद.*

एकोणीसाव्या शतकाच्या अखेरीस व विसाव्या शतकाच्या आरंभकाळात आपल्या महाराष्ट्रात जे संत सत्पुरुष प्रसिद्धी पावले त्यात सद्‌गुरु श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर हे अग्रगण्य आत्मज्ञानी नामयोगी होऊन गेले. 'होऊन गेले' हे म्हणणेसुद्धा चुकीचे ठरेल. कारण आजदेखील ते जगदाकारे व्यापून आहेत याची प्रचीति त्यांच्या भक्तिमार्गास अनुसरून वाटचाल करणाऱ्या साधकास येऊ शकते.

श्रीमहाराजांचे विस्तृत चरित्र पू. केशवराव तथा बाबा बेलसरे (जे याच वर्षी श्रीरामचरणी समर्पित झाले) यांनी ऑक्टोबर १९५७ मध्ये प्रसिद्ध करून आजच्या पिढीला मार्गदर्शनपर सोपानच उपलब्ध करून ठेविला आहे. पू. बाबा आपल्या प्रवचनातून असंख्य वेळा म्हणाले, 'काय वर्णू त्यांची महती ? छेऽ छे छे असा ज्ञानी सत्पुरुष सापडणे कठीण !' श्रीमहाराज लौकिक दृष्ट्या मागच्या म्हणजे १९ व्या शतकातल्या त्या वेळच्या प्राथमिक शाळेच्या चौथीच्या पुढे शिकले नव्हते. परंतु माणदेशासारख्या दुष्काळी भागातल्या अति लहान अशा गोंदवले या आपल्या जन्मगावी त्यांनी जी 'नामगंगा' निर्माण केली तिचा ओघ संपूर्ण महाराष्ट्र, मध्य प्रदेश, गुजराथ, कर्नाटक अशा दूरवर पसरलेला पाहून मन थक्क होऊन जाते. त्यांचेजवळ काय होते ? पैशाची मोठी श्रीमंती होती ? की प्रकांड पांडित्याची पदवी होती ? का ते फर्डे लेखन करणारे लेखक होते ? यापैकी त्यांचेजवळ काहीही नव्हते. तरीदेखील ते सर्वांना आपलेच कोणी जीवलग मित्र, आप्त नव्हे प्रत्यक्ष परमेश्वरच वाटतात ! याचे कारण एकच, त्यांनी आत्मज्ञान प्राप्त करून घेतले होते. हे आत्मज्ञान त्यांनी केवळ स्वतःच्या प्रपंचासाठी किंवा स्वतःच्या मनःशांतीसाठी संपादन केले नव्हते. तुमच्या आमच्यासारख्या मध्यमवर्गीय समाजाला या कलियुगात भयानक हिंसाचारी, भ्रष्टाचारी, अधर्म-अनीतीने बरबटलेल्या वातावरणात समाधानी जीवन सहजतेने कसे जगावे हे शिकवण्यासाठी यंत्र, तंत्र यापेक्षा 'रामनाम' हा तारकमंत्र किती श्रेष्ठ आहे हे त्यांनी आपल्या अडुसष्ट-एकोणसत्तर वर्षे आयुष्यातील आचरणातून जगाला पटवून दिले.

अगदी बालवयापासून ते वयाच्या एकोणसत्तर वर्षी अखेरचा श्वास सोडेपर्यंत नामाची महती त्यांनी सांगितली. बालपणी प्राथमिक शाळेत शिकत असताना त्यांना शिकवणारे त्या काळाचे पंतोजी श्री. अण्णा खर्शीकर यांचेकडील सर्व लौकिक विद्या अगदी अत्यल्प काळात त्यांनी आत्मसात केली. शिकण्यासारखे काहीच उरले नाही; तेव्हा ते शाळेतील आपल्या सवंगड्यांना बरोबर घेऊन भजन करीत. त्यांना बालपणापासूनच भजनाची, चिंतनाची मोठी ओढ होती. गोंदवल्यासारख्या टिंबायेवढ्या खेडेगावात ही चिंतनाची तहान शमणारी नव्हती.

गावातील मारुतीच्या मंदिरात नेहमीच वाटसरू १-२ दिवस मुक्कामास रहात व मार्गस्थ होत. एका मुक्कामात भगवी वस्त्रे धारण केलेले एक वृद्ध असे रामदासी दीक्षा घेतलेले वाटसरू उतरले असताना बाल श्रीमहाराजांना त्यांचेबद्दल कुतुहल वाटले व त्यांनी त्या रामदासीबोवांना चौकसपणे प्रश्न केले. त्यांच्या उत्तरांतून श्रीमहाराजांना (त्यावेळचे गणपती रावजी घुगरदरे कुलकर्णी या बालकाला) कळले की ते रामदासी देवदर्शन प्रत्यक्ष व्हावे म्हणून सद्‌गुरुंच्या शोधार्थ भ्रमंती करत होते. त्यांचे उत्तर ऐकून श्रीमहाराजांच्या मनाला आपल्यालाही असा सद्‌गुरु भेटावा अशी तळमळ लागली. ती तळमळ इतकी वाढली की वयाच्या बाराव्या वर्षी घरदार, आई-वडील, नऊ-दहा वर्षे वयाची पत्नी असा प्रपंच सोडून एकटेच केवळ एका लंगोटीनिशी गृहत्याग करून सद्‌गुरु-शोधार्थ बाहेर पडले; आणि सुमारे १०-११ वर्षांनी घरी परतले.

या दहा वर्षांच्या कालावधीत ऊन, वारा, पाऊस, निवारा, खाणे-पिणे याची पर्वा न करता हा कोवळ्या वयातील मुलगा पायी भ्रमंती करीत सद्‌गुरुच्या शोधार्थ अक्षरशः भारतभर फिरला. त्या वेळची सामाजिक स्थिती लक्षात घेतली तर तो काळ इंग्रजाविरुद्धच्या १८५७ सालच्या बंडाचा होता. ना धड रस्ते, सगळाच खडतर अनवाणी प्रवास.

त्या काळातील जे जे सत्पुरुष त्यांना माहीत होत गेले व ज्या साध्वी स्त्रिया होत्या अशा सर्वांना ते भेटले. आपले ईप्सित त्यांचेकडून साध्य होत नाही असे समजल्यावर पुढे जात. गिरी कंदरात, हिमालयात, नैमिष्यारण्यातही ते गेले. तेथे सिद्धयोगी भेटले. त्यांचेकडून त्यांनी योगविद्या प्राप्त करून घेतली; पण सद्‌गुरुभेटीची तळमळ वाढतच गेली. अखेर त्या काळच्या मोगलाई राज्यात येहळे गावी त्यांची तुकारामचैतन्य या सत्पुरुषाशी गाठ पडली. त्यांची वृत्ती, वागणे पिशाच्चवत् वाटले तरी श्रीमहाराजांनी अखंड नऊ महिने त्यांची सेवा केली. ती सेवा कष्टप्रद होती. उपास-तापास घडत. धड झोपही मिळत नसे. अपमान, शिव्या मारही त्यांना सहन करावा लागला. अखेरीस गुरुकृपा होऊन त्यांना अनुग्रह लाभला व त्यांचे ब्रह्मचैतन्य असे नामकरण झाले. अनुग्रहानंतर त्यांना श्रीतुकाराम चैतन्य तथा तुकामाईनी रामदासी दीक्षा दिली. रामनामाचा तारकमंत्र दिला व आदेश दिला की मी तुला दिलेले आत्मज्ञान चांगले मुरण्यासाठी

एकांतवासांत राहून साधन कर. नंतर तीर्थयात्रा करून आपल्या कुटुंबात जा; आणि रामनामाचा प्रसार कर, श्रीरामाची मंदिरे उभार व अन्नदान कर. अनुग्रह देण्याचा अधिकार दिला.

सद्‌गुरूंचे आदेशानुसार श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनी आचरण केले. प्रपंचात राहून परमार्थ कसा करावा याची शिकवण त्यांनी स्वतःच्या जीवनातून समाजाला दिली. अयाचित वृत्तीने ते राहिले. आपल्या कार्याचे कर्तेपण त्यांनी श्रीरामावर सोपवून आपण बाजूला राहिले. अहंकारविरहित राहिल्याने त्यांचा लोकसंग्रह वाढला. गुरुआदेशाप्रमाणे प्रपंचात राहूनही ते त्यात आसक्त राहिले नाहीत. कोणाजवळ काही मागितले नाही किंवा हे मी करतो असे म्हणून जीभ विटाळली नाही. भेटीला दर्शनाला येणारे लोक आपणहून जे द्रव्य त्यांचेपुढे ठेवीत त्या सर्वांचा विनियोग ते अन्नदान व श्रीराममंदिरासाठी करत. त्यांनी अनेक राममंदिरे उभारली. लोकांना अनुग्रह देऊन रामनामास लावले. ते सांगत माझा प्रपंच कोणाचा मिंधा नाही. माझा दाता श्रीराम आहे. त्यांनी वाचेने कोणालाही दुखावले नाही. अगदी त्यांना विष देणाऱ्या माणसाचे अंतःकरणही त्यांनी दुखावले नाही. त्यांचे ते आचरण पाहून मन थक्क होऊन जाते. जगात घडणाऱ्या प्रत्येक घटनेस ते श्रीरामाची इच्छा मानत. त्यामुळे सुख-दुःखाचा लवलेशही त्यांना चिकटला नाही. अशा या परमात्मस्वरूप सत्पुरुषाने अनेक स्त्री-पुरुष, दरिद्री-श्रीमंत, अडाणी-विद्वान, दुष्ट-सुष्ट इत्यादींना आपलेसे करून घेतले. अगदी मुक्या जनावरांनाही आपले प्रेम लावले.

'जेथे नाम तेथे माझे प्राण' हे त्यांचे आप्त वाक्य अगदी हृदयावर कोरून ठेवणारे आहे. आपल्या अगदी निकटच्या सर्वश्रेष्ठ निष्ठावान साधकास, श्री. भाऊसाहेब केतकर यांना पूर्वसूचना देऊन त्यांनी इच्छामरण पत्करले. मार्गशीर्ष वद्य १० दिनांक २२ डिसेंबर १९१३ रोजी सूर्योदयाचे वेळी नामस्मरण करत देह ठेवला.

त्यांनी देह ठेवला तो लौकिक अर्थाने, याची प्रचीति एका तपानंतर म्हणजे १९२५ सालापासून लोकांना म्हणजे त्यांच्या भक्तमंडळींना आली. सन १९२५ ते १९६७ या बेचाळीस वर्षांच्या कालावधीत ते 'वाणी' रूपाने प्रगट झाले. वर उल्लेखिलेले श्री. भाऊसाहेब केतकर यांचे चिरंजीव श्री. रामचंद्र तथा तात्यासाहेब केतकर यांच्या मुखाने श्रीमहाराज बोलू लागले. श्रीमहाराजांच्या आविष्कारात श्री. तात्यासाहेब केतकर यांनी जो उपदेश भक्तांना, साधकांना वेळोवेळी निरनिराळ्या स्थळी केला, त्याची टिपणे संकलित करून तीनशे सहासष्ट दिवसांचा 'श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर' यांची प्रवचने हा ग्रंथ साकार झाला. त्यासाठी श्री. गो. सी. तथा नानासाहेब गोखले यांनी फार कष्ट वेचले. हा ग्रंथ म्हणजे भक्तिमार्गातील सर्वश्रेष्ठ वेदांत त्यात साठविलेला आहे. त्याची भाषा सोपी, अनेक दृष्टांत यामुळे आतापर्यंत त्याच्या अठरा आवृत्त्या निघाल्या. तसेच कानडी, गुजराथी, हिंदी, इंग्रजी व आता फ्रेंच भाषेमध्येही त्याचे भाषांतर झाले आहे. त्यामुळे हा ग्रंथ विश्ववंद्य ठरून त्यातील वचने, बोध आजही सर्वांना मार्गदर्शन व दिलासा देणारी ठरली आहेत. म्हणूनच श्रीमहाराज आज जगदाकारे व्यापून राहिले आहेत. ते नसून देखील ते सदैव आपल्याजवळ, आपल्या उशाशी आहेत असे खऱ्या नामधारकास जाणवते.

देहात असताना श्रीमहाराज म्हणत, 'आज हा जो नामाचा बाजार गोंदवल्यास भरला आहे त्यात कस्तुरीचे गिऱ्हाईक म्हणजे फक्त नामाच्या, म्हणजेच परमेश्वर प्राप्तीसाठी नाम हवे असे मागणारा भेटत नाही. जे भेटतात ते प्रापंचिक अडीअडचणीच सांगत बसतात. त्यास ते हिंग-जिऱ्याचे गिऱ्हाईक म्हणत. दाता राम आहे. तो कामधेनू देणारा असताना तुम्ही गाढव मागण्यासारखे का वागता ?'

१९६७ ते १९९७ अखेर या कालखंडात नामाचे महत्त्व त्यांनी पू. केशवराव तथा बाबा बेलसरे यांचे मुखातील असंख्य प्रवचनाद्वारे सांगण्याचे कार्य करविले. दिव्याने दिवा लावावा, एका पणतीने दुसरी पणती चेतवावी, त्याप्रमाणे नामप्रसाराचे कार्य श्रीमहाराज चालूच ठेवणार यात शंकाच नाही. कारण ते जगदाकारे व्यापून आहेत. १९१३ ते १९९८ या पंच्याऐंशी वर्षांचे अवलोकन केले असता असे दिसून येते की ते देहात नसताना देखील त्यांची शक्ती श्रीक्षेत्र गोंदवले येथे कार्यरत आहे. त्यांचे अनुग्रहीत्व घेणारा वर्ग सतत वर्धिष्णु आहे. अन्नदान प्रचंड प्रमाणात अखंड चालू आहे. कधीही पाण्याचा दुष्काळ जाणवलेला नाही. आता तर वैद्यकीय सेवा उपलब्ध असून अनेक ख्यातनाम डॉक्टर, वैद्य मंडळी अद्ययावत् उपकरणांनी समृद्ध असलेल्या रुग्णालयात आपली सेवा रुजू करतात. विश्वस्त मंडळीही बिनतोड श्रद्धेची, निष्ठेची लाभल्यामुळे श्रीक्षेत्र गोंदवले म्हणजे कंठावर रामनाम गोंदवल्यासारखे पक्के झाले आहे, यात संशय नाही.

अनेक स्थळी श्रीराम मंदिरे उभारली गेली. तेथे उपासना चालते. अनेक शहरात, गावात अनुगृहीत साधक एकत्र येऊन सत्संग घडवून नामस्मरणावर भर देतात. कोटी कोटी जपाचे संकल्प पूर्णत्वास जातात. गोंदवल्याची माणगंगा एक वेळ आटेल, कोरडे पात्र दिसेल पण श्रीमहाराजांची 'नामगंगा' प्रत्येकाचे हृदयी दुथडी भरून आहे यातच त्यांचे सारसर्वस्व दिसून येते यात शंकाच नाही. म्हणूनच काव्यात्मक शब्दात सांगावेसे वाटते -

'बाजार आहे थाटला, गोंदवले ग्रामी
दुकानदार मोठा आहे एक 'नामी'
नाव त्याचे 'श्रीब्रह्मचैतन्य स्वामी '

दुकानी त्याच्या नसे काहीच माल
कोटी कोटींची परी, 'ओठी' उलाढाल
नसे वजन काटा न कोणी दलाल

न कसली जाहिरात वा शिफारस
यावे, लीन व्हावे श्रीसद्‌गुरु समाधिस
न मागे कोणी दक्षणा, न अन्य सायास

जे येतील कोणी, मिळे त्या महाप्रसाद
श्रींचे मनोगत, 'श्रीराम' स्मरा अविरत
आयुष्यात घुमतील तृप्तीचे निनाद

यशवंत माणकीकर
श्रीरामकृपा, १४ अ, गिरीदर्शन सोसायटी, बाणेर रस्ता, औंध, पुणे ७.

# श्रीमहाराजांचे खरे स्वरूप त्यांच्या स्वतःच्या शब्दात

डॉ. वा. रा. अंतरकर

*एम. ए. एल. एल. बी., पीएच. डी. प्रबंध - श्रीमत् आद्य शंकराचार्यांचा जीवनवृत्तांत. २३ वर्षे खालसा कॉलेज येथे संस्कृत व अर्धमागधीचे प्राध्यापक. ३ पुस्तके प्रसिद्ध.*

गीतेतील १० व्या अध्यायात अर्जुन श्रीकृष्णांना म्हणतात : 'न हि ते भगवन् व्यक्तिं विदुर्देवा न दानवा ॥ १०:१४ : ब

स्वयमेवाऽत्मनाऽऽत्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ॥ १०:१५:अ

भावार्थ : हे भगवन्, तुझे स्वरूप देव किंवा दानव (कोणीही) जाणत नाहीत. तू स्वतःच हे पुरुषोत्तमा, आपल्याला आपणच जाणतोस. श्रीमहाराजांचे खरे स्वरूप काय होते या विषयीही असेच म्हणणे जरूर आहे. श्रीमहाराज खरे काय व कोण होते हे त्यांच्याशिवाय कोणालाच कळले नव्हते. 'मला महाराजांनी अगदी आपल्यासारखे करून टाकले आहे' अशा श्रीब्रह्मानंदांबद्दल श्रीमहाराज म्हणाले, 'मला (म्हणजे मी कोण आहे हे) जर कोणीही रतिभर ओळखले असेल तर ब्रह्मानंदाला.' श्री भाऊसाहेब केतकरांचे ज्येष्ठ चिरंजीव श्री. आप्पासाहेब केतकर यांना 'ओंकार, ओंकार म्हणतात तो मीच आहे.' असे म्हणाले तर धारवाडचे प्रकांड पंडित श्रीकृष्ण शास्त्री उप्पिनबेटगेरी यांनी 'इतर युगात धर्मरक्षणार्थ अवतार झाले परंतु कलियुगात अजून का झाला नाही', असे श्रीमहाराजांना प्रत्यक्ष विचारले असता श्रीमहाराज त्यांना म्हणाले, 'आपण असे का म्हणतां ? एक (आद्य) शंकराचार्य होऊन गेले आणि दुसरा तुह्मांपुढे उभा आहे. परंतु तुम्हास पाहण्याची (म्हणजे ओळखण्याची) दृष्टी नाही त्याला मी काय करू ?'

श्रीमान् तात्यासाहेब केतकरांचे मुखातून श्रीमहाराज पुनः प्रकट होऊन बोलू लागल्यानंतर श्रीमहाराज कधी कधी व निरनिराळ्या प्रकारांनी आपण कोण आहोत हे सुचवीत असत. त्याबद्दलच्या काही हकीकती अशा आहेत.

१) एकदा आमचे वडील मालाडला श्रीमहाराजांकडे गेले असता त्या दिवशी श्रीब्रह्मानंदांची पुण्यतिथी होती. स्वाभाविकच श्रीमहाराज त्या वेळी त्यांचेबद्दल बोलताना म्हणाले, 'ब्रह्मानंदाला तरी माझ्यातील काय मिळाले ? रुपयातील पैसुद्धा सापडली नाही !' (१ रुपया = १९२ पै.) यावरून रुपया म्हणजे श्रीमहाराज केवढे मोठे होते हे कल्पनेनेसुद्धा समजण्यासारखे नाही. घरी आल्यावर हे मला सांगून वडील मला म्हणाले, 'ब्रह्मानंदांनाही पैसुद्धा मिळाली नसेल तर तुला व मला काय मिळणार आहे ?' तेव्हा मी त्यांना म्हटले, याबद्दल आपण विचार करायचा नाही. श्रीमहाराज सांगतात त्याप्रमाणे आपल्याला होईल तितके (साधन = नामस्मरण) करायचे. बाकीचे ते पाहून घेतील. आमचे वडील फार मोठ्या प्रमाणावर नामस्मरण करीत व म्हणून त्यांना ही रास्त शंका आली.

२) श्रीमहाराज म्हणत, 'जो असमाधानी आहे त्याच्याजवळ राहायला मला कष्ट होतात.' महाराज पूर्ण ब्रह्मज्ञानी असल्याने (ते फार ब्रह्मनिष्ठ होते, असे डॉ. कूर्तकोटि - पंडित महाभागवत म्हणत) ते अर्थातच सर्वव्यापी - सर्वान्तर्यामी होते. खरा ब्रह्मज्ञानी पुरुष पूर्णपणे व अखंड समाधानी असतो. किंबहुना पूर्ण व अखंड समाधान हेच त्याचे खरे स्वरूप असते. ज्या माणसाच्या अंतःकरणात असमाधान असते तेथेही ते स्वाभाविकपणे (ह्म. सर्वव्यापी असल्याने) असणारच. परंतु त्यांच्यातील असमाधानामुळे ते तेथे प्रकट होऊ शकत नाहीत. समाधान व असमाधान परस्परविरुद्ध असल्याने तेथे राहायला तर लागते पण राहायला कष्ट होतात' असा त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ.

३) ता. २६ जाने १९३६ रोजी माझी मुंज राहत्या घरी झाली. त्या संदर्भात ती कोठे करावी हे विचारण्याकरिता माझे वडील श्रीमहाराजांकडे गेले. 'आपण राहतो तेथे करावी' असे श्रीमहाराजांनी सांगितले. त्यावर 'आपण असाल तेथे करावी अशी इच्छा आहे' असे वडील म्हणाल्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'तसे नको, कारण मी असेन तेथे तुम्ही येऊ शकालच असे नाही. परंतु तुम्ही असाल तेथे मी मात्र येऊ शकेन.' यात आपले सर्वव्यापित्व श्रीमहाराजांनी सुचवले.

४) एकदा श्रीमहाराज व प्रा. बेलसरे दोघेही पुण्यास होते. काही कारणाने श्रीमहाराज अगोदर तेथून निघून मुंबईस आले. त्यानंतर एक गृहस्थ त्यांना भेटण्याकरता म्हणून तेथे गेले असता प्रा. बेलसरे यांचेकडून ते मुंबईस गेल्याचे कळले. प्रा. बेलसरेही मुंबईस यावयाचे होतेच. त्यामुळे 'तुम्ही मुंबईला गेल्यावर मी येऊन गेल्याचे त्यांना सांगून त्यांना माझा नमस्कार सांगावा' असे ते प्रा. बेलसरे यांना म्हणाले. मुंबईला आल्यावर प्रा. बेलसरे श्रीमहाराजांना भेटले परंतु त्या गृहस्थाचा निरोप सांगावयास मात्र विसरले. काही दिवसांनंतर त्या गोष्टीचे स्मरण झाल्यावर त्यांनी सर्व हकीकत श्रीमहाराजांना सांगितली. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'त्यात काही बिघडत नाही. कारण ज्याला ज्या वेळी जेथे नमस्कार केला त्या वेळी तेथे पोचत नाही तो नमस्कार करायला किंवा करून घ्यायला लायक नसतो.' श्रीमहाराजांची स्पष्ट सूचना अशी त्या गृहस्थांनी त्यांना सांगण्याकरता म्हणून सांगितला त्याच वेळी त्यांना तो पोचला होता आणि म्हणून प्रा. बेलसरे तो सांगण्यास विसरले यात बिघडले असे काही नाही. यातही श्रीमहाराज सर्वव्यापी व सर्वज्ञ होते हे त्यांनी सुचविले.

५) एकदा श्रीमहाराज मला काहीतरी सांगत होते व मी ऐकत होतो. त्या दरम्यान ते मला म्हणाले, 'तुम्हास माझे म्हणणे कसे काय वाटते ?' तेव्हा मी म्हटले, 'आपल्याला (तसे म्हणण्यास) काहीतरी कारण असेल.' त्यावर ते लगेच म्हणाले, 'छे, छे, मला काही कारण नाही.' त्यांनी माझ्या बोलण्याला कलाटणी देऊन मी कारणरहित (uncaused) तत्त्व म्हणजे मूळ परमात्मा आहे हे सुचविले. अर्थात हा त्यांचा भावार्थ पुष्कळ दिवसांनंतर लक्षात आला. ते कारणरहित म्हणजे कालातीत (Timeless) आहेत हे त्यांचे म्हणणे.

वरील ३ गोष्टींवरून ते स्थलकालातीत होते असे त्यांना सुचवायचे होते. ब्रह्मसूत्र शांकरभाष्याचा अभ्यास करीत असताना श्रीशंकराचार्य व श्रीमहाराज यांच्या विचारातील विलक्षण साम्य लक्षात येऊन प्रा. बेलसरे हे श्रीमहाराजांना सांगून त्यांना म्हणाले होते, 'महाराज, आपण साक्षात् ईश्वरच असला पाहिजे.' त्यावर श्रीमहाराजांनी काही प्रतिक्रिया व्यक्त केली नाही.

६) गोंदावल्याचे त्या वेळचे (१९५६-५७) मुख्य पंच श्री. गणपतराव (ह्म. तात्यासाहेब) दामले यांना सुमारे ८२ व्या वर्षी मूत्रपिंडाचा (enlarged prostate) त्रास सुरू झाला होता. त्याला शस्त्रक्रियेशिवाय पर्याय नसतो. परंतु त्याकरता ते हॉस्पिटलमध्ये जाण्यास तयार नव्हते. घरीच तात्पुरती त्यांना Saline देण्याची व्यवस्था करण्यात आली होती. परंतु तेवढ्याने भागण्यासारखे नव्हते. त्या सुमारास श्रीमहाराज त्यांचे घरी आले. त्यांना एकंदर सर्व हकिकत सांगण्यात आली तेव्हा ते म्हणाले, 'तुम्ही त्यांना हॉस्पिटलमध्ये नेण्याची व्यवस्था करा. पुढचे पाहू!' मग ताराचंद हॉस्पिटलमध्ये शस्त्रक्रियेची सर्व व्यवस्था केली गेली आणि श्री. तात्यांना नेण्याकरिता रुग्णवाहिकाही घरासमोर येऊन उभी राहिली. सकाळी ८ ची वेळ होती. मग श्रीमहाराजांना सांगितल्यावर ते श्री. तात्यांना भेटण्याकरिता त्यांचेजवळ येऊन बसले व त्यांनी श्री. तात्यांना त्यांच्या मुलांची इच्छा सांगितली. श्री. तात्यांनी हॉस्पिटलमध्ये जाण्यास नाराजी व्यक्त केली. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'तुमची हॉस्पिटलमध्ये जाण्यास हरकत आहे. पण मीच हॉस्पिटलमध्ये येऊन राहतो. मग ते मंदिर झाले की नाही ? आणि मंदिरात जायला तुमची हरकत नसावीच ! हे ऐकल्यावर श्री. तात्यांचे डोळ्यांत पाणीच आले व ते हॉस्पिटलमध्ये जाण्यास ताबडतोब तयार झाले. त्यानंतर शस्त्रक्रिया वगैरे सर्व होऊन ते घरी आले आणि मग २-२॥ वर्षानंतर त्यांचे देहावसान झाले (१६-२-५९).

७) डॉ. पाथरकर, (एम्.डी., एम्. एस.) हे Liver Sirrhosis च्या विकाराने आजारी होते. ते केतकर मंडळींच्या जुन्या घरातील श्री. तात्यासाहेबांच्या तळमजल्यावरील मागील बाजूच्या खोलीत हॉस्पिटलमधून आणलेल्या, पायाकडे व डोक्याकडे खाली-वर करता येईल अशा एका खास पलंगावर झोपलेले असत. श्रीमहाराज त्यांना बहुतेक रोज रात्री ९ चे सुमारास भेटण्याकरता त्या खोलीत जात असत. एक दिवस ते असेच गेले असताना डॉक्टरांना म्हणाले, 'डॉक्टर, तुम्हाला काही पाहिजे असेल तर मला सांगा. मी ते तुम्हास देतो.' तेव्हा डॉक्टर म्हणाले, 'महाराज, मी आपल्याकरता काय केले आहे म्हणून मी आपल्याकडे काही मागावे ?' तेव्हा श्रीमहाराज त्यांना एकदम म्हणाले, 'डॉक्टर, तुम्ही मला काय व्यापारी समजता का, की एक रुपाया दिला तर १६ आणे देणारा ? तुम्हास काय पाहिजे ते मागा, मी ते द्यायला तयार आहे.'

या सर्वांचे एक संभाव्य स्पष्टीकरण असे आहे :

डॉक्टरांचे २ मुलगे होते - डॉ. राजाभाऊ, एम्.एस्. सध्या पुण्यात स्थायिक व दिवंगत वसंतराव. ते अगदी लहान म्हणजे १२-१४ वर्षांचे असताना दोघांनाही विषमज्वराची बाधा झाली. पण डॉक्टर स्वतः एम्.डी., एम्.एस्. असूनही ते त्या दोघांनाही रोज दोन वेळा श्रींचा अंगारा लावणे व श्रींच्या पादुकांचे तीर्थ देणे याशिवाय काहीही औषध देत नसत. त्याबद्दल कोणीतरी विचारले असता डॉक्टर म्हणाले, 'मुलांना रोग झाला आहे. महाराजांच्या इच्छेने. जायचा असेल तर त्यांच्याच इच्छेने. मग तो औषधाशिवायच जाईल आणि तो जाऊ नये (म्हणजे मुलगे बरे होऊ नयेत) अशी त्यांची इच्छा असेल तर औषध देऊनही काही उपयोग होणार नाही.' 'मग तुम्ही इतरांना औषध का देता कारण त्यांचे बाबतीतही महाराजांच्या इच्छेचा नियम तितकाच लागू असणार.' असे त्यांना विचारले असता ते म्हणाले, त्यांची तशी श्रद्धा नसल्याने त्यांना ही विचारसरणी पटणार नाही. म्हणून त्यांच्या समाधानाकरता व्यवहाराप्रमाणे त्यांना औषधे देतो. शेवटी महाराजांच्या इच्छेप्रमाणे व्हायचे तेच होत असते.' डॉक्टरांची ही श्रीमहाराजांवरील श्रद्धा व त्यांच्या ठिकाणी असलेली अनन्यगतिकता हीच श्रीमहाराजांना खरी अभिप्रेत होती. म्हणजे श्रीमहाराजांना जे खरे हवे होते व हवे असते ते डॉक्टरांनी त्यांना दिले होते आणि म्हणून ते त्याना जे हवे व ते मागतील ते देण्यास तयार असले पाहिजेत.

८) मालाडचे श्री. रामदास तांबे त्यांच्या वयाला ७५ वर्षे पूर्ण झाली म्हणून श्रीमहाराजांना भेटून नमस्कार करायला आले होते. श्रीमहाराजांनी त्यांना त्याबद्दल काही म्हटल्यावर ते म्हणाले, '७५ वर्षे पूर्ण झाली पण सर्व फुकट गेली. कारण तसे काहीच पदरात पडले नाही.' तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'असे का म्हणता ? माझी भेट झाली याला काहीच महत्त्व नाही का ?'माझी भेट झाली आता काही मिळवायचे राहिले नाही असे का वाटत नाही ?' (१९५६ साली श्रीमहाराज व मंडळी त्यात मी होतोच. कर्नाटकात गेली असता श्रीमान् तात्यासाहेबांच्या पत्नी सौ. ताई मला म्हणाल्या, 'महाराजांचा सहवास जितका मिळेल तितका पदरात पाडून घ्या. आयुष्यात बाकी सर्व मिळेल पण महाराजांचा सहवास पुनः मिळणार नाही.')

९) श्रीमहाराजांना गोंदावल्याच्या श्रीरामाचे फार प्रेम व महत्त्व होते. डिसेंबरमधील उत्सवाचे अगोदर थोडे दिवस एक फार मोठे मानले जाणारे श्रीसमर्थपंथी साधक तेथे येऊन गेले होते. श्रीमहाराज तेथे उत्सवाला म्हणून गेल्या वेळी त्या वेळी तेथेच राहात असलेल्या श्री. बळवंत पाठक यांनी ही गोष्ट श्रीमहाराजांना सांगितली. तसेच ते श्रीमहाराजांचे शेजघरात थोडावेळ बसले होते व मालाडलाही येणार असल्याचे श्री. पाठकांनी सांगितले. श्रीमहाराजांनी 'ठीक आहे, येऊ दे.' इतकी प्रतिक्रिया व्यक्त केली. शेवटी ते साधक रामासमोर सभामंडपात २ तास बसले होते, असे श्री. पाठकांनी सांगितले. तेव्हा

श्रीमहाराज म्हणाले, 'त्याने माझ्या रामाकडे नीट पाहिले असेल तर त्याला आपले दोष कळले असतील. माझा राम म्हणजे आरसा आहे. त्यात पाहणाऱ्याला आपले प्रतिबिंब (खरे स्वरूप) बरोबर दिसेल.' मी हे सर्व बाजूला उभा राहून ऐकत होतो. हे ऐकल्यावर माझ्या मनात आले, 'सगळे राम आरसेच आहेत. मग याच रामाचे वैशिष्ट्य काय ?' त्यावर श्रीमहाराज तत्काल आपणहूनच म्हणाले, 'सगळे राम आरसेच आहेत. परंतु त्यांच्या मागचा पारा गेला आहे. या रामाच्या मागचा पारा शिल्लक आहे.'

१०) एकदा श्रीमहाराजांना भेटण्याकरता काही कानडी लोक आले होते. त्यांना मराठी समजत नव्हते व श्रीमहाराजांना कानडी समजत नाही म्हणून एक इसम दुभाषाचे काम करीत होता. श्रीमहाराजांनी मराठीत सांगायचे व ते त्याने त्या लोकांना कानडीत सांगायचे. असे ३-४ वेळा झाल्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'तुम्हास नीट सांगायला जमत नाही. मी एक सांगतो व तुम्ही त्यांना दुसरेच काहीतरी सांगता. भीमराव (गाडगोळी) येथे आहेत का ?' ते मागेच उभे होते व चटकन पुढे झाले. श्रीमहाराज त्यांना म्हणाले, 'त्यांना नीट सांगता येत नाही. तुम्ही सांगाल का ?' तेव्हा श्री. भीमराव म्हणाले, 'प्रयत्न करून पाहतो.' त्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'तुम्हास जमेल. तुम्ही सांगावे.' मग श्रीमहाराज मराठीत सांगत ते श्री. भीमराव त्या लोकांना कानडीत सांगत. थोड्या वेळाने श्रीमहाराज म्हणाले, 'तुम्ही बरोबर सांगता. ते काहीतरीच सांगत होते.' काहीवेळाने ती मंडळी निघून गेली. पण श्री. भीमरावांच्या मनात आले, 'श्रीमहाराजांना कानडी कळत नाही म्हणून दुभाषा बसवला. पण तो जे कानडीत सांगत होता ते बरोबर नव्हते आणि मी सांगत होतो ते बरोबर होते हे त्यांना कसे कळले ?' सर्व लोक गेल्यावर श्रीमहाराज व श्री. भीमराव दोघेच राहिले. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'भीमराव, तुमच्या मनात विचार येतो त्या वेळी तो कोणत्या भाषेत येतो ?' श्री. भीमरावांनी एक मिनिट विचार करून म्हटले, त्या वेळी त्याला भाषा नसते. त्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'म्हणजे विचार हा भाषेच्या अगोदर आहे. मग जो विचाराच्याही अगोदर आहे, त्याला भाषेची अडचण का यावी ? (किंबहुना) तुमच्या डोक्यात विचार येतो तो अगोदर मला कळतो व मग तो तुमच्या डोक्यात येतो.'

एका तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकांनी तत्त्वज्ञानात 'विचार आधी की भाषा आधी' हा विवाद व अनिर्णीत प्रश्न असल्याचे आम्हास सांगितले. परंतु श्रीमहाराजांनी तो आमचेपुरता तरी वरीलप्रमाणे सोडवला आहे व आपण स्वतः सर्व विचाराचे आधी असल्याचे - इतकेच काय तर आपण स्वतः सर्व विचारांचे उगमस्थान व मूलकारण आहो असे आपले स्वरूप असल्याचे सुचविले आहे. गीतेतही श्रीकृष्णांनी 'मतःस्मृतिर्ज्ञानमपोहनं च' (१५:१५) 'मतः सर्व प्रवर्तते' (१०:८) व मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति ।' असे सांगितले आहेच.

डॉ. वा. रा. अंतरकर,
बी - ५, जयराम निवास, ११६ टिळक मंदिर रस्ता,
विलेपार्ले (पू.), मुंबई ४०० ०५७.

## श्रीब्रह्मचैतन्य

नामात जन्मला । नामात राहिला
नामात रंगला । अहर्निश ।।
बाळपणी ज्याचे । चित्त नामापाशी
वदे इतरांसी । नाम घ्या हो ।।
नामाचा महिमा । अगाध वर्णिला
नामे आकळीला । भगवंत ।।
नामाहून ज्याचा । विसंबेना क्षण
नाम जणु प्राण । त्याचा झाला ।।
वेदांचे ते सार । एक रामनाम
साधन सुगम । सांगितले ।।
पवित्र तो देह । नाममय झाला
मंत्र तो भरला । रोमरोमी ।।
ब्रह्मचैतन्याचा । आगळा हा पंथ
झालासे अंकित । रघुनाथ ।।

**सौ. प्रभा टेंभेकर**

## गंगाजलासारखे सुख

तुझ्या समग्र उपदेशाचे करिता चिंतन
चाले मुखी नामस्मरण, जे तुज प्रिय
अनुसंधानी अशी येते सुरम्य प्रसन्नता
मोहूनी टाकतसे चित्ता ती अवर्णनीय
म्हणोनी नासक्या प्रपंची नसे मज दुःख
गंगाजलासारखे सुख वाहते नितांत

**यशवंत माणकीकर**

# श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचा वाणीरूप अवतार सन १९२५ - १९६७

**श्री. प्रभाकर पाटणकर**

बी. ए. बी. कॉम, दुसऱ्या महायुद्धात १९४२ इमर्जन्सी कमिशन. हिन्दी तोफखान्यात कमिशण्ड ऑफिसर पोस्टिंग बलुचिस्तानमध्ये. ४ वर्षे मिलीटरी नोकरी. २५ वर्षे विक्रीकर खात्यात सेवा. उपआयुक्त म्हणून निवृत्त. पदभ्रमण, गिर्यारोहण, पर्यटन प्रेमी. २० हजार फूट उंचीवरून एव्हरेस्ट शिखर पाहणारे पहिले महाराष्ट्रीयन. हिमालयाची झुंज व एव्हरेस्ट दर्शन पुस्तके प्रसिद्ध. थोरा-मोठ्या व्यक्तींच्या साक्षऱ्यांचा संग्रह.

श्रीमहाराजांनी सन १९१३ मध्ये समाधी घेतली. ते गेल्यावर काही वर्षे प्रत्यक्षात मार्गदर्शन करणारा, धीर देणारा, नामस्मरण या साधनेसंबंधी पुन्हा पुन्हा अनेक प्रकारे सांगणारा श्रीमहाराजांच्या तोडीचा कोणी राहिला नाही. त्यांनी देह ठेवला त्याचे किंचित् आधी सुचवून ठेवले होते की, 'आणखी बारा वर्षांनी मी पुन्हा येणार आहे.' आणि तसे ते सन १९२५ मध्ये आले. अर्थात् ज्या देहाचे अवसान झाले त्या देहाने पुन्हा येणे शक्यच नव्हते. ते वाणीरूपाने प्रगट झाले व ती एक अपूर्व घटना घडली. तो अवतार बेचाळीस वर्षे चालू राहिला आणि त्या अवताराने त्यांनी असंख्य लोकांना व्यक्तिशः व प्रवचनाच्या माध्यमातून समुदायाला नामाचे महत्त्व नाना तऱ्हेने पटवून दिले व नामाला लावले. याचा अनुभव गरीब, श्रीमंत, स्त्री-पुरुष, विद्वान-अज्ञानी, आस्तिक-नास्तिक, आपद्ग्रस्त-सुखवस्तु अशा सर्व प्रकारच्या व्यक्तींनी घेतला. त्यात आमच्या महद् भाग्याने मी व माझी पत्नी आहोत. आम्हाला त्यांनी सन १९६२ मध्ये अनुग्रह दिला व त्रयोदशाक्षरी जप सांगितला. अनुग्रह घेण्यापूर्वी माझी श्रीरामाची उपासना होती. अनुग्रह घेतल्यापासून श्रीरामाच्या ठिकाणी आमचे सद्गुरु श्रीमहाराजच झाले. त्यानंतर तो अवतार संपेपर्यंत पाच वर्षे जमेल तेव्हा श्रीमहाराजांना भेटणे, त्यांचे कळकळीचे, प्रेमाचे, उपदेशाचे सांगणे ऐकणे, त्यांच्या सांगण्याप्रमाणे नामस्मरणाचा अभ्यास करू लागणे, स्वतःच्या दोषांची दखल घेऊन सुधारण्याचा प्रयत्न करणे, सर्व कर्तेपण रामाचे आहे हे लक्षात ठेवून काळजी, अभिमान व निराशा न येऊ देणे व गुरुबंधू-भगिनींचा सत्संग करणे, वगैरे उपक्रम आमच्याकडून होऊ लागले. तो अवतार पाहण्याचे व ती अमृतवाणी श्रवण करण्याचे भाग्य ज्यांना लाभले नाही त्यांचेसाठी तो अवतार कसा होता त्याचे वर्णन माझ्या अल्पमतीप्रमाणे येथे करीत आहे.

श्रीमहाराज देहात असताना, त्यांची पूर्ण कृपा संपादन करणारे व त्यांचेवर नितांत श्रद्धा असणारे, श्री. भाऊसाहेब केतकर यांना त्यांचा सहवास नऊ वर्षे घडला. श्रीमहाराज हे देवच आहेत अशी त्यांची श्रद्धा होती. श्रीमहाराज गेल्यावरही, भाऊसाहेबांना महाराजांचे अस्तित्व जाणवत होते व सान्निध्य लाभत होते. सन १९३९ मध्ये वयाच्या ९२ व्या वर्षी ते वारले. अखेरपर्यंत श्रीमहाराजांवर विश्वास ठेऊन ते निर्धास्तपणे समाधानी राहिले. श्री. भाऊसाहेब केतकर यांचे तृतीय चिरंजीव हे श्री. रामचंद्र चिंतामणी (तात्यासाहेब) केतकर. त्यांचे ८२ वर्षांचे लौकिक जीवनचरित्र सकृद्दर्शनी महाराष्ट्रातील एखाद्या मध्यमवर्गीय सद्गृहस्थासारखेच होते. त्यांचा जन्म सन १८८५ मध्ये झाला. त्यांना श्रीमहाराजांचे प्रथम दर्शन सन १९०४ च्या सुरुवातीस गोंदवले येथे झाले व त्यांचीही महाराजांवर अनन्य भक्ती जडली. श्रीमहाराजांनीही त्यांच्यावर इतकी माया केली की, उभयता एकमेकांशी जवळ जवळ एकरूपच होऊन गेले होते हे म्हणण्यात अतिशयोक्ती नाही. सन १९०४ पासून ते आपल्या माता-पित्यांजवळ गोंदवले येथेच राहिले. त्यामुळे पुढील शिक्षण झाले नाही. त्यांचे पुढे कसे होणार याची काळजी त्यांच्या नातलगांना वाटे. पण भाऊसाहेबांनी त्याबाबत कधीच चिंता बाळगली नाही. श्रीमहाराजांनी त्यांना ठेवून घेतले आहे. तेव्हा काय करायचे तेही तेच पाहतील, असा भाऊसाहेबांचा दृढ विश्वास होता. 'तात्याची जबाबदारी मी घेतली आहे' असे श्रीमहाराजही म्हणत.

गोंदवल्यास येऊन राहिल्यावर लवकरच श्रीमहाराजांच्या पसंतीने, गोखले यांच्या कन्येशी तात्यासाहेबांचा विवाह ठरला. गोरज मुहूर्तावर लग्न लागायचे होते. दुपारची जेवणे झाल्यावर श्रीमहाराज आपल्या खोलीत जाऊन झोपले. मुहूर्ताची वेळ जवळ येत चालली तरी ते उठले नव्हते. मुहूर्त टळण्याच्या भीतीने गोखले मंडळी अस्वस्थ झाली. भाऊसाहेब यांस त्यांनी विचारले असता त्यांनी सांगितले, 'श्रीमहाराज आपणहून उठतील तेव्हा उठतील. त्यांना उठवायचे नाही. ते उठल्याशिवाय माझा मुलगा लग्नाला उभा राहणार नाही.' गौरीहरपूजनाला बराच वेळ बसलेली बिचारी नवरी मुलगी, तेथेच झोपून गेली. दिवस मावळून बराच वेळ गेल्यावर श्रीमहाराज उठून खोलीतून बाहेर आले. जणूकाही आपल्याला यातले काहीच माहीत नाही, अशा आविर्भावाने ते म्हणाले, 'मला उठवले का नाही ? चला, चला. आता लवकर आटपा.' नवऱ्या मुलाला म्हणजे तात्यासाहेबांना आपल्या बताशा नावाच्या घोड्यावर बसवून श्रीमहाराजांनी स्वतःच लगाम धरला. होता होता रात्री अकरा वाजून गेल्यावर श्रीराममंदिरात लग्न लागले. ठरलेल्या मुहूर्तावर लग्न न लागल्याबद्दल काही मंडळींत कुजबुज होत होती. पण वधूपक्षाकडील एका जाणत्या माणसाने पंचांग काढून पाहिले तेव्हा आढळून आले की, लग्न लागले ती अमृतवेळ असून तो मुहूर्त सर्वोत्तम होता.

दुसरे दिवशी श्रीमहाराजांनी वधूवरांस श्रीरामनामाच्या त्रयोदशाक्षरी मंत्राचा अनुग्रह दिला व श्रीरामाची मानसपूजा करण्यास सांगितले. पुढे

लवकरच तात्यासाहेब कर्नाटकात बेलधडी येथे गेले असता त्यांची श्रीमहाराजांचे ज्येष्ठ शिष्य ब्रह्मानंद महाराजांशी भेट झाली. त्यावेळी श्रीब्रह्मानंदांनी त्यांना सांगितले, 'श्रीमहाराज प्रत्यक्ष रामच आहेत. तू त्यांचीच मानसपूजा करीत जा.' तात्यासाहेबांना हे फार पसंत पडले व ते त्याप्रमाणे श्रीमहाराजांचीच मानसपूजा करीत असत.

सन १९१३ च्या जून महिन्यात तात्यासाहेबांना माळशिरस येथे पी.डब्ल्यू. डी. खात्यात द. म. पंचवीस रुपये पगाराची नोकरी लागली. पण सरकारने काही कामे काटकसरीसाठी बंद केल्याने ती नोकरी गेली. पुढे त्यांना मिलिटरी अकाऊंट्स खात्यात फेब्रुवारी १९१७ मध्ये नोकरी लागली. त्या खात्यात एकतीस वर्षे नोकरी करून तात्यासाहेब ३ मार्च १९४८ पासून सेवानिवृत्त झाले. लक्षात राहण्यासारखी गोष्ट अशी की, त्या खात्यात हिंदुस्थानात कोठेही बदली होण्यासारखी असूनही त्यांची बदली फक्त पुणे व मुंबई या दोनच ठिकाणी झाली. मात्र अधून-मधून हिशेबतपासणीसाठी नाशिक, देवळाली, बडोदे, अहमदाबाद अशा ठिकाणी त्यांना फिरतीवर जावे लागे. त्यांचे बिऱ्हाड मुंबईत मालाड येथे होते.

तात्यासाहेबांचे चिरंजीव श्री. दिनकरराव यांच्या लहानपणचा एक कसोटीचा प्रसंग तात्यासाहेबांची निस्सीम गुरुनिष्ठा दाखविणारा आहे. मालाडला घरी श्रीगुरुपौर्णिमेचा उत्सव चालू असताना दिनकर आजारी पडला. उत्सवामुळे घरी तर मंडळींची ये-जा सारखी चालू होती. भजनाचा व नामसंकीर्तनाचा सप्ताह चालू होता. पौर्णिमेस तर खूपच गर्दी झाली. पण त्या दिवशीच दिनकरच्या आजाराने तीव्र स्वरूप धारण केले. त्याच्या जीविताची आशा सोडून डॉक्टरही घरी निघून गेले. ते गेल्यानंतर तात्यासाहेब आजारी मुलाच्या खोलीत आले व म्हणाले, 'डॉक्टरांच्या बोलण्यावरून जरा कठीणच दिसते आहे. पण जे घडायचे ते महाराजांच्या इच्छेनेच घडणार आहे. तेव्हा कमी-जास्त झाले तरी मला वाईट वाटणार नाही. मी बाहेर भजनास बसतो. तशीच काही जरूर वाटली तर मला कळवा.' असे सांगून ते बाहेर जाऊन भजनी मंडळीत बसले. 'आजारी दिनकरला त्रास होऊ नये म्हणून 'भजन बंद करायचे का ?' असे कोणी एकाने विचारले. तेव्हा 'भजन बंद केले म्हणजे त्याच्या प्रकृतीला बरे वाटण्याची खात्री आहे का ? महाराजांना काय करायचे ते करतील.' असे उत्तर त्यांनी दिले. रात्री साडेअकराच्या सुमारास दिनकरच्या आजारास उतार पडला. तात्यासाहेबांना गहिवरून आले. ते त्याला म्हणाले, 'बाळ घाबरू नकोस. महाराज आपल्या पाठीशी आहेत. नामस्मरण कर. ते त्यांना आवडेल.'

तात्यासाहेबांच्या जीवनातील सर्वात मोठी घटना म्हणजे सन १९२५ मध्ये त्यांच्या ठिकाणी झालेला महाराजांचा वाणीरूप आविष्कार. त्या वर्षीच्या जून महिन्यात एके दिवशी तात्यासाहेब श्रीमहाराजांचे फोटोसमोर नमस्कार करून एकाग्रचित्त होऊन बसले असता काही वेळ निष्चल झाले व एकदम 'आशीर्वाद' हा शब्द त्यांचे तोंडून निघाला. तेव्हापासून, अशा प्रकारे ते बसले म्हणजे श्रीमहाराज त्यांच्या मुखाने बोलू लागत. ह्या आविष्कारात त्यांच्या तोंडून आत्मसाक्षात्काराने रसरसलेले ब्रह्मज्ञान अमाप प्रमाणात वाहू लागले. श्रीमहाराजांचे हे पुनरागमन अभूतपूर्व असे होते. श्रीमहाराज देहात असताना त्यांचा सहवास झालेल्या शिष्य मंडळींचा ह्या आविष्कारावर एकदम व सहजा सहजी विश्वास बसणे शक्य नव्हते. परंतु त्यांच्यापैकी एकेकजण तात्यासाहेबांचे मुखाने श्रीमहाराज काय सांगतात ते स्वतः ऐकू लागल्यावर आपापली खूण पटू लागली; आणि अशा प्रकारे श्रीमहाराजांना भेटता येते याबद्दल थोड्याच दिवसांत सर्वांची निःसंशय खात्री पटली. याबाबतीत एक उदाहरण सांगण्यासारखे आहे. श्री. नीळकंठबाबा लोखंडे या नावाचे श्रीमहाराजांचे निष्ठावान सेवक होते. महाराजांशिवाय ते कुणालाही मानीत नसत. त्यांना महाराजांनी पंढरपूरच्या राममंदिराची व्यवस्था राखण्यासाठी ठेवले होते. ते स्वतःला श्रीमहाराजांचा फौजदार म्हणवीत. पेटीवरचे श्रीमहाराजांचे बोलणे सुरू झाल्यावर, तिकडे जाऊन श्रीमहाराजांना भेटण्यास ते तयार होत नव्हते. त्यांचे देहावसानाचे अगोदर सुमारे एक महिना श्रीमहाराजांनी पेटीवर एका माणसाकरवी निरोप पाठवून त्यांना बोलाविले. ते प्रथम येण्यास कबूल नव्हते. परंतु आहारी न जाता काय आहे ते एकवार पाहावे अशा इराद्याने ते पुण्यास तात्यासाहेबांचे बिऱ्हाडी आले. पेटीमधील फोटोसमोर बसून तात्यासाहेबांचे म्हणजे श्रीमहाराजांचे बोलणे सुरू झाले. श्री. नीलकंठबाबा लांबूनच काय आहे ते पाहात होते. ते आल्याचे कोणीतरी श्रीमहाराजांना सांगितले. नीलकंठबाबा जवळ येऊ लागले, तेव्हा श्रीमहाराजांनी 'नीलकंठ' म्हणून त्यांना हाक मारली. ती ऐकल्याबरोबर त्यांचे डोळ्यांतून अश्रू वाहू लागले व त्यांनी एकदम साष्टांग लोटांगण घातले व शरणागती पत्करली. त्यानंतर त्यांनी हे असे एकदम का केले, असे लोकांनी विचारले असता ते म्हणाले, 'अहो, महाराज मला जशी हाक मारीत असत, तोच आवाज व आवाजातील तोच प्रेमळपणा ऐकल्याबरोबर मला भानच राहिले नाही. मी तरी काय करू ?'

देहात असताना श्रीमहाराज त्यांना भेटायला येणाऱ्या स्त्री-पुरुषांना जशा प्रकारे कळकळीचा उपदेश करीत, व्यवहारातील मार्गदर्शन करीत, पुढे घडणाऱ्या गोष्टींची अप्रत्यक्षपणे, खुबीदार रीतीने पूर्वसूचना देत आणि कठीण प्रसंगात धीर देऊन उपाय सुचवीत, त्याप्रमाणेच या आविष्कारात त्यांना भेटणाऱ्यांना तात्यासाहेब यांचे मुखाने सर्व होत असे. असे बोलणे संपल्यावर 'या बरं बाळ, या' असे म्हणून तात्यासाहेब श्रीमहाराजांच्यासमोर डोके टेकून मग उठत. तात्यासाहेब हे फक्त माध्यम आहेत अशी सर्व भक्तांची श्रद्धा होती. त्यामुळेच पेटीवरील फोटोसमोर बसून बोलण्यास सुरुवात करण्याचे पूर्वीचे व उठल्यानंतरचे ते तात्यासाहेब केतकर व मध्यंतरी बोलणारी व्यक्ती ती श्रीमहाराज, असेच सर्वजण मानीत असत.

हा व्यवहार अधिकाधिक माहीत होऊ लागला तशी संप्रदायाबाहेरील निरनिराळ्या क्षेत्रातील सामान्य, जाणकार व प्रतिष्ठित माणसेही श्रीमहाराजांना भेटायला येऊ लागली. या स्वरूपात श्रीमहाराज तात्यासाहेबांचे मुखाने भक्तांना अनुग्रह देऊन त्रयोदशाक्षरी मंत्रही सांगत असत. याच स्वरूपात कधी कधी परमार्थावर प्रवचनेही करीत असत. टेपरेकॉर्डिंगची यंत्रे भारतात येऊ लागल्यावर सन १९६० च्या नंतर श्रीमहाराजांचे तात्यासाहेबांचे मुखातून बोलणे व प्रवचनेही काही प्रसंगी रेकॉर्ड करून घेतलेली आहेत. परमार्थाचे तत्त्वज्ञान इतक्या

सोप्या रीतीने, सोप्या भाषेत, प्रेमाने, क़ळकळीने व परिणामकारक पद्धतीने सांगणे, हे श्रीमहाराजांसारख्या आत्मज्ञानी सत्पुरुषाशिवाय कोणाकडून होणार नाही हे ते रेकॉर्ड करून ठेवलेले बोलणे ऐकणारांना आजही अनुभवास येते.

तात्यासाहेब मुंबईत किंवा परगावी कोणाकडे गेले असता भक्तमंडळींना व त्यांच्या कुटुंबियांना तसेच शेजारी वा स्नेहीमंडळींनाही त्यांच्यामार्फत श्रीमहाराजांना भेटावे असे वाटे. ह्याकरिता श्रीमहाराजांचा तो फोटो बरोबर असणे हे स्वाभाविकच अवश्य होते. त्यासाठी बंद करण्याची सोय असलेली लहानशा बॅगेसारखी एक लाकडी पेटी तयार करण्यात आली. तिच्या झाकणाच्या भागात आतल्या बाजूला श्रीमहाराजांचा फोटो लावलेला होता. पेटीच्या खालच्या भागाच्या आत, अक्षरे काढलेला एक कागदाचा तक्ता व त्यावर एक काच ठेवलेली होती. श्रीमहाराज त्यांच्या मुखाने बोलत असता तात्यासाहेबांचा हात त्या काचेवर फिरत असे. ते बहुतेक ठिकाणी ही पेटी बरोबर घेऊन जात. कोणी श्रीमहाराजांना भेटण्याची इच्छा व्यक्त केली की, पेटी चौरंगावर किंवा पाटावर ठेवून, ती उघडून समोर बसून, नमस्कार करून तात्यासाहेब अर्धा-एक मिनिट ध्यान करीत. नंतर डोके टेकून नमस्कार करून काही क्षण निश्चल राहिल्यावर तात्यासाहेबांचा उजवा हात काचेवर फिरू लागे. मग 'आशीर्वाद' हा शब्द मुखातून बाहेर पडल्यावर, थोडे क्षण थांबून नंतर बोलणे सुरू व्हायचे. अशा रीतीने सर्वांना वाणीरूपाने श्रीमहाराजांची भेट होऊ शके. ती पेटी म्हणजे श्रीमहाराजांच्या या अवताराच्या लहानशा सिंहासनासारखीच झाली होती. अशा आविष्कारातल्या अवस्थेत तात्यासाहेबांचे मुखाने श्रीमहाराजांनी काही सांगितलेले असले, की त्याचा उल्लेख 'श्रीमहाराजांनी पेटीवर असे असे सांगितले' असा केला जाई.

श्रीमहाराज तात्यासाहेबांच्या मुखाने बोलत असत, एवढेच नव्हे तर त्यांच्या डोळ्यांनी पाहात व त्यांच्या कानांनी ऐकत. पूर्वपरिचित व्यक्ती भेटायला आली व तिने नमस्कार केला की त्या व्यक्तीने काही बोलण्यापूर्वीच तात्यासाहेबांचे मुखाने श्रीमहाराज त्या व्यक्तीला कुशल विचारीत. भेटणारी व्यक्ती काही सांगत अथवा विचारीत असताना हात काचेवर हलविण्याचे थांबून तात्यासाहेब (म्हणजे श्रीमहाराज) ते ऐकत असत. अशा तऱ्हेचे संभाषण होई. अर्थात्, याही आविष्कारात श्रीमहाराजांचे अंतर्ज्ञान दिसून येईच. त्यांना फारसे सांगावे लागत नसे. भेटणाऱ्यांचे मनोगत जाणूनच ते त्याच्याशी बोलत. हा आविष्कार, १९६७ मध्ये तात्यासाहेबांचे देहावसान झाले तोपावेतो म्हणजे बेचाळीस वर्षे चालू होता. श्रीमहाराज व तात्यासाहेब यांनी अखेरपर्यंत एकमेकांना सोडले नाही. हा आविष्कार केव्हाही, कितीही वेळ आणि दिवसातून कितीही वेळा प्रगट होत असे. श्रीगुरुपौर्णिमेच्या दिवशी मालाड येथे भक्तमंडळी दर्शनाला येत. त्या सर्वांना भेटून त्यांच्याशी बोलणे, रात्री अकरा वाजेपर्यंतसुद्धा चालू राही. यात तात्यासाहेबांना शारीरिक कष्ट अपरंपार होत असत. पण त्यांनी ते कधीच मनावर घेतले नाहीत. कधी कुठेही त्याबद्दल कुरकुर वा तक्रार केली नाही. कधीही ते त्रासले नाहीत. प्रकृती बरी नसली तरी कधी टाळाटाळ केली नाही. कित्येक वेळा एखादा भक्त श्रीमहाराजांना भेटून गेल्यावर पेटी बंद करून ते विश्रांतीसाठी स्वस्थ बसावेत किंवा आडवे व्हावेत, तेवढ्यात कुणीतरी आणखी व्यक्ती तेथे येऊन श्रीमहाराजांना भेटण्याची इच्छा प्रकट करी. काही अनमान न करता अथवा सबब न सांगता तात्यासाहेब पुन्हा पेटी उघडून सुरुवात करीत. अशा रीतीने तात्यासाहेबांना शारीरिक कष्ट व दगदग खूपच होई. पण त्यांच्या डोक्याला मात्र त्रास होत नसे. कारण त्या अवस्थेतले त्यांचे सारे बोलणे, पहाणे, ऐकणे यंत्रवत होत असे. त्यांच्या मुखाने श्रीमहाराज जे बोलत, ते इतरांसारखेच त्यांना ऐकू येई. त्यात आपल्या बुद्धीने ते मध्ये कधी बोलत नसत. एवढेच नाही तर त्यांना स्वतःलाच श्रीमहाराजांना काही विचारायचे व सांगायचे असले तर जवळ बसलेल्या कुणाकरवी ते श्रीमहाराजांना सांगत. अशा प्रकारचे सन १९२५ नंतरचे बेचाळीस वर्षांचे तात्यासाहेबांचे जीवन एक प्रकारचे दुहेरी व्यक्तिमत्त्व होते किंवा त्या जीवनाची दोन अंगे होती.

श्रीमहाराजांचा आविष्कार नसताना तात्यासाहेब अगदी साध्या माणसासारखे वागत. श्रीमहाराज आपल्या मुखाने बोलतात म्हणून आपल्याला इतरांनी मान द्यावा, पाया पडावे किंवा कुठल्याही प्रकारे आपला बडेजाव करावा, ही गोष्ट त्यांना नापसंत होती. हेच त्यांचे थोरपण होते. श्रीमहाराजांनी केलेला उपदेश त्यांनी इतका ऐकला व आत्मसात् केला होता तरी ते स्वतः अगदी जवळच्या नातलगांशिवाय इतर कुणालाही उपदेश करण्याच्या भानगडीत पडत नसत. कुणी काही विचारले तर 'आपण श्रीमहाराजांना विचारू' असे म्हणत. अशा प्रकारे वाणी अवतारात प्रकट होण्यासाठी माध्यम म्हणून श्रीमहाराजांनी अत्यंत सुयोग्य व्यक्तीची निवड केली होती. आपण केवळ माध्यम आहोत, हा विश्वास तात्यासाहेबांनी मनात घट्ट बाळगल्यामुळे सतत बेचाळीस वर्षे श्रीमहाराजांचा हा अवतार चालू राहिला व त्यामार्फत देहात नसतानाही असंख्य स्त्री-पुरुषांना त्यांचा उपदेश व सत्संग लाभला. एक गृहस्थाश्रमी भक्त व साधक आणि श्रीमहाराजांचे माध्यम, या आपल्या उभय भूमिकांची तात्यासाहेबांनी कधीही गल्लत केली नाही. श्रीमहाराजांचा आविष्कार नसताना ते स्वतःला श्रीमहाराजांच्या इतर भक्तांपेक्षा वेगळे समजत नसत. एवढेच नव्हे, तर त्यांच्यापेक्षा वयाने वडील असलेल्या भक्तांशी ते अतिनम्रतेने बोलत व वागत असत.

सामान्य माणसांप्रमाणे प्रपंच चालविणारे तात्यासाहेब साधकांना आदर्शरूप होते. शांत व सात्त्विक वृत्ती, अमानित्व, अनासक्ती, अनाग्रहीपणा, औदार्य हे गुण त्यांचेजवळ होते. किंबहुना ते मूर्तिमंत लीनता होते. आपल्या आयुष्यातली प्रत्येक घटना श्रीसद्गुरुंच्या सत्तेने घडते अशी दृढ श्रद्धा असल्याने अमुक व्हावे, तमुक होऊ नये, हा विचारच त्यांच्या मनाला शिवत नसे. खरोखर त्यांची वृत्ती एखाद्या लहान मुलासारखी निरागस असे. त्यांच्याबद्दल कुणालाही भीती न वाटता प्रेमादरच वाटे. त्यांनी स्वतः सर्व सहन केले, पण कुणाला कधी दुखविले नाही. व्यक्ती लहान असो की मोठी, स्त्री असो की पुरुष त्याला मान व महत्त्व देऊनच तात्यासाहेब वागत. त्यांच्या वागण्यात सहजपणा होता. कृत्रिमतेचा लवलेश नसे. भजन आणि अन्नदान या त्यांच्या आवडीच्या गोष्टी होत्या.

त्यांच्या आयुष्यात दोन-तीन शस्त्रक्रिया झाल्या. एकदा हृदयविकाराचा झटकाही येऊन गेला. सन १९६७ मध्ये प्रोस्टेटचा त्रास वाढत जाऊन शस्त्रक्रिया करण्याचे ठरले. शस्त्रक्रिया झाली. ती ठीक झाली. प्रकृती सुधारत होती पण नंतर चार-पाच दिवसांनी, ३ एप्रिल १९६७ रोजी सकाळी अनपेक्षितपणे त्यांना हृदयविकाराचा झटका आला व त्यानंतर दोन-अडीच तासात त्यांचे प्राणोत्क्रमण झाले. त्यांच्या अकस्मात जाण्याने श्रीमहाराजांच्या भक्तांना धक्काच बसला. जीवनात कधी न भरून येणारी पोकळी निर्माण झाल्यासारखे झाले. केवढा आधार नाहीसा झाला ! तात्यासाहेबांच्या माध्यमातून श्रीमहाराजांना केव्हाही भेटता येत असे व आपली व्यावहारिक व पारमार्थिक अडचण पुढे मांडून त्यांचे मार्गदर्शन मिळविता येत असे.

तात्यासाहेब पेटीसमोर बसलेले असताना त्यांना नमस्कार करून जवळ बसले की श्रीमहाराज प्रेमाने बोलू लागत. आपली अडचण किंवा परिस्थिती, झालेली किंवा होणारी घटना आपणहून सांगितली नाही तरी, अंतर्ज्ञानाने त्यांना कळत असे व त्याविषयी ते सूचकपणे बोलत. श्रीमहाराजांच्या वाणीत अपूर्व गोडवा होता. अजूनही रेकॉर्ड केलेले बोलणे कोणी ऐकले तर त्याला त्याचा अनुभव येईल. त्यांना भेटल्यावर व त्यांचे जिव्हाळ्याचे कल्याणकारक बोलणे व उपदेश ऐकल्यावर असे वाटे की आपण गेल्या जन्मी एवढे काय पुण्य केले की, त्यांची अमृतवाणी आपणास ऐकावयास मिळाली. मी आणी माझी पत्नी - आमची काही तळमळ नसताना आणि सद्‌गुरुची कृपा काय असते याची जाणीव नसताना श्री. केशवरावांना म्हणजे श्री. बाबा बेलसरे यांना प्रेरणा देऊन त्यांच्यामार्फत श्रीमहाराजांनी आम्हाला जवळ घेऊन आपलेसे केले. पूज्य बाबा बेलसरे व श्रीमहाराज या उभयतांच्याबद्दल कृतज्ञता योग्य शब्दांत व्यक्त करणे मला जमणार नाही. श्रीमहाराजांचा हा वाणीरूप अवतार आमच्यासारख्या अनेकांना आधी कळलेला नव्हता. बाबांच्या सांगण्यामुळे कळला. श्री. तात्यासाहेब मालाड येथे घरी असले म्हणजे, बाबा रोज रात्री, पेटीवर श्रीमहाराजांना भेटत असत. त्यांच्याशी संवाद करीत असत. आपल्या लेखनाबाबत श्रीमहाराजांचा सल्ला घेत असत. एवढेच नव्हे तर आपल्या व आपल्या कुटुंबियांच्या जीवनात घडणाऱ्या व कराव्या लागणाऱ्या गोष्टीविषयी श्रीमहाराज जे सांगत त्याप्रमाणे तंतोतंत आज्ञा प्रमाण मानून ते त्याप्रमाणेच काय करायचे ते करीत. कित्येक वेळा बाबांच्या मनात काही वेगळे करावे, असे असे. परंतु तसे नको, असे करा असे श्रीमहाराजांनी सांगितले की त्यांनी सांगितल्याप्रमाणेच बाबा करीत. मालाड येथे दर रविवारी सकाळी बाबांचे निरूपण होत असे. श्रीज्ञानेश्वरीवर निरूपण करण्यास प्रथम श्रीमहाराजांनीच बाबांना आज्ञा केली. बाबांचे निरूपण झाल्यावर श्रीमहाराज पेटीवर दहा-पंधरा मिनिटे प्रवचन करीत. त्यात कधी 'मला जे सांगायचे आहे ते केशवरावांनी सांगितलेच आहे. माझी ही मुखशुद्धी आहे.' अशी सुरुवात करून ते बोलत.

पूज्य तात्यासाहेबांच्या देहावसानाच्या बरोबरच श्रीमहाराजांनी आपला हा वाणीरूपी अवतार समाप्त केला.

श्री. प्रभाकर वि. पाटणकर
स्नेहभवन, ४३/१०, एरंडवणे, कर्वेरोड, पुणे ४.

# प. पू. गोंदवलेकर महाराजांचा हितोपदेश प्रापंचिक कार्यात भगवंताची साक्ष ठेवून 'गोपाळकाला' करावा

**प्रा. डॉ. नरेंद्र कुंटे**

*एम्. ए., पीएच. डी. मराठी विभाग प्रमुख दयानंद कॉलेज, सोलापूर. २७ वर्षे अध्यापन. ८ वर्षे सोलापूर संचार व समाचारमध्ये सहसंपादक. अध्यात्म विषयावर विपुल लेखन. ११ पुस्तके प्रसिद्ध संतकृपा, सज्जनगड, प्रसाद इ. मासिकांत लेखन. व्याख्यान व प्रवचन अनेक ठिकाणी. १९७८ पासून श्रीस्वामी समर्थ अक्कलकोट महाराज यांचे वार्षिक पुण्यतिथीचे संयोजन, निंबर्गी संप्रदायाचे श्रीगुरुदेव रानडे यांचेकडून अनुग्रह. मातृमंदिर पुरस्कार, निगडी.*

मानवी जीवन सुखावह व्हावे, आनंदी व्हावे, त्यात शांती लाभावी यासाठी सर्वच संतांनी प्रापंचिकांना परमार्थाची शिदोरी बांधून दिली आहे. त्या शिदोरीत नामसंकीर्तनाने देव प्राप्त व्हावा, असा उपदेशात्मक ऐवज ठेवला आहे. सर्व संतांनी म्हणा किंवा सर्वच भक्तिसंप्रदायांनी म्हणा, ईश्वरप्राप्ती हे मानवी जीवनाचे ध्येय ठरवून देऊन त्यासाठी साधनमार्ग म्हणून काही ना काही तरी उपासना सांगितली आहे. त्यात नामस्मरण ही मुख्यभक्ती असून तिला पूरक आणि पोषक अशी उपाधी म्हणजे पोथी, पारायण, भजन, कीर्तन, पूजा, उत्सव इत्यादींची जोड दिली आहे. महाराष्ट्रात, त्यातल्या त्यात निंबरगी संप्रदाय, समर्थ संप्रदाय, गोंदवले संप्रदाय यामध्ये नामस्मरणावर भर दिला गेला असून नामभक्ती परमार्थाची वाटचाल करणे हा स्वधर्म सांगितला गेला आहे. वारकरी, दत्त याही संप्रदायामध्ये उपासनेचा मंत्र म्हणून 'रामकृष्णहरि' तसेच 'श्रीगुरुदेव दत्त' असा नामघोष सांगितला आहे. जवळ जवळ सर्वच संप्रदायात व्यक्तिगत उपासनेत श्वासोच्छ्वासात नामस्मरण, तसेच सामुहिक उपासनेत माळेतील १०८ मण्यांच्या संख्येने सामुदायिक नामघोषाच्या स्वरूपात जप सांगितलेला आहे. गोंदवले संप्रदायात रामनामाचा जप हीच साधना म्हणून सांगितलेली असून पुष्कळ जण 'व्यक्तिगतस्वरूपात' रामनामाचा जप करतात, तर काही लोक एकत्र जमून 'सत्संगस्वरूपात' सामुदायिकनाम जप करतात. मुख्य गोष्ट ध्यानात ठेवायची ती ही की, नामस्मरण हाच साधनमार्ग होय. त्याला उपकारक असे भजन-कीर्तन, पोथी-पारायण हेही करीत राहायचे. त्यायोगे नामाविषयी अनुसंधान राहते.

### प्रवचनातील प्रबोध...

संतांचे चरित्र आणि त्यांचा प्रबोध यात 'बोले तैसा चाले' अशी एकवाक्यता असते. उपदेशस्वरूपातच संतांची 'वाङ्मयमूर्ती' सिद्ध झालेली असते. त्या दृष्टीने पाहता श्रीगोंदवलेकरमहाराज यांच्या विशेष प्रसिद्ध असलेल्या 'पाच प्रवचने' या आधारे त्यांनी प्रापंचिक असलेल्या तुम्हा-आम्हास केलेला भक्तिबोधच सर्वाधिक महत्वाचा आहे. राम हे नाम आहे. नामावर प्रेम असावे. नामात एका आनंदाशिवाय दुसरे काहीही नाही. नामात मनाला उलटे केले की, नाम बनते. (म-ना/ना-म) नाम श्रद्धेने घ्यावे. नामाने अंतःकरण शुद्ध होते, असा 'नाममहिमा' त्यांनी प्रतिपादिला आहे. देवाला सन्मुख ठेवून (नामस्मरण करून) कार्य करावे, म्हणजेच देव भक्तांचे अंतिम हिताच्या दृष्टीने कार्यसिद्धी करतो, असा विश्वास दृढ करण्याविषयी त्यांचा आग्रह आहे. कलियुगात दृश्य अवतार नसला तरी 'नामावतार' असून तोच जीवाचा उद्धार करतो.

नामस्मरणाबरोबरच सत्संगतीचीही फार आवश्यकता असते. ही संगती तीन प्रकारची आहे (१) संतांचा प्रत्यक्ष देहामध्ये सहवास, (२) मंत्र (नाम) सहवास, (३) ग्रंथवचनांचा सहवास (विचारधन/उपदेशवचन) स्मरण करावे, म्हणजे देव कृपा करतो. 'राम' कर्ता आहे, ही भावना ठेवावी. हेच भक्तीचे स्वरूप आहे. नाम, भक्त, भगवंत हे वेगळे राहूच शकत नाहीत. नामात भगवंत आहे ही श्रद्धा ठेवावी. देवावर विसंबून कार्य केले म्हणजे आपले समाधान टिकून राहते. भक्तिमार्गाचे हे मुख्य सार त्यांनी सांगितलेले आहे.

जी 'पाच प्रवचने' प्रसिद्ध आहेत त्यातूनही परमार्थ म्हणजे काय? हे त्यांनी उत्तमपणे पटवून दिले आहे. प्रबोधनातील 'सूत्रभाष्य' पहावयाचे झाले तर असे ध्यानात येते की त्यांनी (१) साधकाच्या मनात ईश्वरप्राप्ती विषयीच्या तळमळीला विशेष महत्त्व दिले आहे. आपले कल्याण व्हावे, असे वाटत असेल तर आपण भगवंताचे व्हावे ही तळमळ हवी. त्यासाठी भक्ती-नीती या दोन्ही बाहुबलाने परमार्थ मार्गावर चालावे. देहाने नीतीचे आचरण व मनाने भगवंताचे नामस्मरण करावे, असे ते सांगतात. (२) प्रपंच असो की परमार्थ असो, निःस्वार्थ प्रेम करावे. प्रपंच तर स्वार्थाचा आहे. मग तो निःस्वार्थपणे कसा करणार ? यावर त्यांनी एक मार्ग सुचविला आहे. कर्तव्यापुरता प्रपंच केला की तो निःस्वार्थी होतो. त्यातच परमार्थ दडला आहे. हे जमले की प्रपंच-परमार्थ सोपा होतो.

### प्रपंचाचा 'गोपाळकाला' करा...

श्रीगोंदवलेकरमहाराज यांनी प्रापंचिक अशा तुम्हा-आम्हाला जीवनविषयक एक सिद्धांत सांगितला आहे. तो म्हणजे प्रपंचाचा

'गोपाळकाला' करा. हे 'भाष्य' स्पष्ट करताना ते सांगतात की, (३) प्रपंचात अनेक वस्तू असतात. त्या एकत्र करणे म्हणजे काला होय. अनेक गुण-दोषांची माणसे एकत्र येणे म्हणजे काला होणे होय. पण त्या काल्यात गोपाळ आला तरच तो खरा गोड झाला. 'गोपाळकाला' करण्याविषयीचा सिद्धांत थोडा स्पष्ट करून घेता येतो तो असा की, प्रपंच हा दुःखमयच आहे. चिंता, संकटे यांनीही तो भरलेला आहे. कलह हे तर प्रपंचाचे स्वरूपच आहे. हा सगळा मिळून 'काला' आहे. पण या प्रपंचाच्या प्रत्येक कार्याला जर भगवंताचे अधिष्ठान दिले, त्यात 'गोपाळ' मिसळला, तर मात्र प्रपंचातील दुःखे, चिंता, संकटे कमी होतील. कलह कमी होईल. किमान प्रतिकूलता पचविण्याची ताकद तरी नक्कीच येऊ शकेल ! सर्व गोष्टी भगवंतामुळे (गोपाळ) होतात, हे ध्यानात ठेवून वागले पाहिजे. गोपाळ विसरता कामा नये. अनेकात एकत्व पाहणे हे गोपाळकाल्याचे शेवटचे ध्येय आहे.

प्रत्येक कार्यात देवाचे अधिष्ठान आहे. (गोपाळाचा हात आहे) असे जाणीवपूर्वक ठरवून कार्य केल्यास तो काला (कार्य) गोड (फलदायी) होतो. नुसताच काला जिथे आहे तिथे कलह आहेच आहे. पण हा काला (प्रपंच) गोड व्हावा वाटत असेल तर प्रत्येक प्रापंचिक कार्यात भगवंताला साक्षी ठेवावे. तो काला गोड (प्रसाद स्वरूप) होतो. नामस्मरणाने भगवंताला प्रापंचिक कार्यात सहभागी करून घ्यावे. प्रपंच गोड होईल. परमार्थात तो परावर्तित होईल. देवाने कृपा करावी, असे आपण नेहमी म्हणतो. पण ही कृपा कशी होईल? तर - त्यासाठी (४) आपणही काही 'प्राथमिक तयारी' करावी लागते; असे सांगतात. देवाची नुसती तळमळ लागून कार्य संपत नाही. प्रापंचिकाला परमार्थी व्हायचे असेल तर नामस्मरणसाधना करण्याची 'तयारी' करावी लागेल. ही भक्तिमार्गातली महत्त्वाची, अत्यावश्यक, अपरिहार्य अशी गोष्ट होय. चांगल्या गोष्टी स्वीकारण्याची सुद्धा तयारी करावी लागते. दोष-दुर्गुण हे प्रत्येकातच आहेत. पण त्याकडे दुर्लक्ष करून सद्गुण स्वीकारण्याची तयारी देखील साधकालाच करावी लागते. ही तयारी करण्यासाठी (५) नीतीयुक्त आचरण हवे, असे श्रीगोंदवलेकरमहाराज यांनी सांगितले आहे. भक्तीत नीतीला सर्वाधिक महत्त्व आहे. मुख्य दोष म्हणजे निंदा करणे हा मनुष्याचा सहजस्वभाव आहे. तो जरी टळला तरी पुष्कळ होईल. निंदा करणे टाळल्याशिवाय भक्तिमार्गावर प्रगतीचे पाऊल पडत नाही. देवाला प्रपंच अप्रिय नाही. पण तो करताना भगवंताचे अनुसंधान ठेवणारा परमार्थही आपण केला पाहिजे, हे त्यांनी आग्रहपूर्वक सांगितले आहे.

## पत्रातील 'उपदेशवाणी'...

श्रीगोंदवलेकरमहाराज यांनी काही साधकांना पत्राद्वारे उपदेश केला आहे. ही पारमार्थिक पत्रेही महत्त्वपूर्ण आहेत. संत सहजपणेच हितोपदेश करतात. त्यातील 'भक्तिसूत्र' देखील मोठे मार्गदर्शक आहे. त्यात एक महत्त्वाचा उपदेश त्यांनी केला आहे. तो म्हणजे : मी कर्ता नव्हे, राम कर्ता आहे, असे माना. राम करील त्यात आपले हित आहे, हे समजा. नामावर निष्ठा ठेवावी, नीतीने आचरण करावे. नाम कसे घ्यावे ? तर ते श्वासोच्छ्वासात घ्यावे. श्वासोच्छ्वास हे अखंडपणे (देह पडेतोपर्यंत) चालतात. म्हणून अखंड नामस्मरण करावे, असे ते सांगतात. 'राम कर्ता आहे' असे मानावे यामध्ये त्यांनी प्रयत्नवादाला कुठेही उणे वा त्याज्य ठरविले नाही हे ध्यानात ठेवले पाहिजे. नाहीतर स्वकर्तृत्वाला गौणपणा आणणारा हा दैववाद आहे, अशी टीका करायला लोक तयारच असतात. श्रीगोंदवलेकरांनी असा दैववाद सांगितलेला नाही. त्यांनी म्हटले आहे की,

'प्रयत्नेविण राहो नये ।<br>
फळाची आशा ठेवू नये ।<br>
भगवंताना विसरू नये ।<br>
कर्तव्य या दृष्टीने कर्म करावे ॥<br>
प्रथम राखावे भगवंताचे अधिष्ठान ।<br>
तेथे व्हावा प्रयत्नाचा उगम ॥<br>
अखंड राखावे अनुसंधान ।<br>
येणे कर्म होईल सहज रामार्पण ॥'

'मी कर्ता' असे मानल्याने अहंकार निर्माण होतो. 'राम कर्ता' आहे असे मानून कर्मे केल्याने कर्मे चांगली होतात. कर्मात कुचराई होत नाही. 'देव कर्ता' मानले की कर्मे स्वार्थाने घडत नाहीत. ती दुष्कर्मे होत नाहीत. उलट देवाचे काम अधिक चांगलेपणाने करण्याची सद्बुद्धी निर्माण होते. प्रपंच हा कर्तव्यभावनेने करावा हे त्यांनी निक्षून सांगितले आहे. उपासाविषयी त्यांनी फार मार्मिकपणे उपदेश केला आहे. ते म्हणतात,

'ठेवा पूर्ण रामावर विश्वास ।<br>
न करावे यावर उपासतापास ॥<br>
उपास हा शब्द अलिकडील जाण ।<br>
त्याच्यापुढे एक पाऊल टाकून ॥<br>
तेथे उपासनेत राहावे आपण ।<br>
तेथे आहे निर्धास्तपण ॥<br>
उपासापुढील ठाण ।<br>
उपासना मुख्य जाण ॥<br>
उपासनेने राहावे आपण ।<br>
हेच रामाचे सान्निध्य जाण ॥'

उपासाऐवजी त्यांनी उपासनेला महत्त्व दिले आहे. हे इथे ध्यानात ठेवले पाहिजे. मन एकाग्र कसे करावे ? याला उत्तर म्हणून त्यांनी 'नामी ठेवा चित्त' हे दिले आहे. नामस्मरणानेच चित्त एकाग्र होईल, असे ते सांगतात.

'भगवंतावाचून देहाचे सुखभोग ।<br>
हे न मानती साधुसज्जन ॥<br>
आता जगणे रामासाठी ।<br>
हा निश्चय मानावा चित्ती ॥'

असाही बोध त्यांनी केला आहे.

'अभिमानाने वृत्ती बळावली ।

तेथे घाताला सुरुवात झाली ॥
बुद्धी करावी स्थिर ।
नामी असावे प्रेम अनावर ॥
राम कर्ता हे जाणुन चित्ती ।
जगात संत ऐसे वर्तती ॥
साधनी साधन हे जाण ।
हेंच साधकाचे मुख्य लक्षण ॥'

असे सांगून त्यांनी पुढे आणखी एक सिद्धांत सांगितला आहे, तो असा की,

'आरंभी ज्याने स्मरला राम ।
त्यालाच प्रयत्नाअंती राम ॥
हा ठेवावा विश्वास ।
सुखे साधावे संसारास ॥'

सर्वच पत्रांतून त्यांनी रामाच्या नामाचे स्मरण ठेवण्याविषयी उपदेश केला आहे. ते सांगतात,

'मनाने करावे भगवंताचे स्मरण ।
जेणे चुकेल जन्ममरण ॥
अखंड राखावे समाधान ।
चुको न द्यावे अनुसंधान ॥
काया गुंतवावी प्रपंचात ।
मन असावे रघुनाथात ।
प्रपंचात राखावी खबरदारी ।
मन लावावे रामावरी ॥
त्याचा राम होईल दाता ।
न करावी कशाची चिंता ।
मुखी असावे नामस्मरण ।
हृदयात भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव ।
शुद्ध राखावे आचरण ।
पवित्रतम् अंतःकरण ।
मुखाने भगवंताचे स्मरण ।
त्यावर कृपा करील रघुनंदन ॥'

नामस्मरणावरच त्यांनी इथे भर दिला आहे.

## ध्यानाने आत्मज्ञान मिळवावे...

'श्रीगोंदवलेकरमहाराज यांचे काही निवडक अभंगही प्रसिद्ध आहेत. 'या युगात करावे रामचिंतन । रामनामाविण नाही साधन' असे सांगतात. रामनामाच्या ध्यानाने आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावे, असा उपदेश त्यांनी केला आहे. रात्रंदिवस रामनामाचा जप करावा. निंदा डोक्यात असली तरी हृदयी रामनाम असू दे. म्हणजे हळूहळू निंदाबुद्धी (दुर्बुद्धी) नष्ट होईल. मंदिरवासीय भक्तांना त्यांनी उपदेश केला आहे की, 'आल्या अतिथी अन्न द्यावे । रामनाम दृढ घ्यावे ॥' तिथे अन्नदान मोठ्या प्रमाणावर होते. नामग्रास घेत हे अन्न स्वीकारावे. त्रिकाळ पूजा करावी. सर्वांसी नम्र असावे, मुख्य म्हणजे 'गुरुपुत्र' व्हावे. तसेच देवप्राप्तीच्या साधनमार्गासाठी सद्गुरुचा शोध घेऊन त्यांचेकडून नाममंत्रकृपा प्राप्त करून घेऊन त्यांचे शिष्य व्हावे. श्रीगोंदवलेकरमहाराज यांनी प्रापंचिकांना केलेला हा मौलिक उपदेश मार्गदर्शक तर आहेच आहे, परंतु तो अनुकरणीयही आहे. प्रपंच दुःखमय खरा. पण त्याला परमार्थाची जोड दिली की तो सुखमय होतो., हे ध्यानात घेऊन निमिषमात्र का होईना रामनामाचे ध्यान लावावे. हेच त्यांनी सांगितले आहे. मुखाने प्रारंभ तरी करू या ! हेच नाम हळूहळू अंतःकरणात ठसेल आणि भगवंताचे दर्शन होईल !!!

डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे
प्रज्ञा, आसरा सोसायटी,
होटगी रस्ता, सोलापूर ४१३ ००३.

## नाम-महिमा

गोंदावलीचे संत महान
गाती नामाचे गुणगान
थोर असो वा असो लहान
सांगती नामाचे महिमान ॥ धृ. ॥
नामामध्ये जन्मा आले
नामातच ते जीवन जगले
नामातच जणु त्याचे प्राण ॥ १ ॥
येता जाता प्रपंच करिता
सदैव माना रामचि कर्ता
सगुण रूपाहुनिही महान ॥ २ ॥
मुखी असावे अखंड नाम
श्रीराम जयराम जय जय राम
चित्ती श्रीरामाचे ध्यान ॥ ३ ॥

**- सौ. शीला सरवटे**

# श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज आणि व्यवस्थापन शास्त्र.

**डॉ. ह. ना. कुन्देन**

*बी. ए. एल. एल. बी., एम. कॉम. पीएच.डी., रा. भा. पंडित, हि. शि. सनद, साहित्य विशारद (पुणे) हिन्दी साहित्याचार्य (काशी). जनता सहकारी बँक, पुणे लेखनिकापासून सुरवात. कार्यकारी संचालक म्हणून निवृत्त. ३२ वर्षे नोकरी. वर्तमानपत्रे, मासिकांत बँकिंगवर लेख. भृगुचरित्र, एकमुखी दत्त व स्वामी अक्कलकोट महाराज पुस्तके. निवृत्तीनंतर बँकिंगवर पीएच. डी.*

व्यवस्थापन शास्त्र हा विषय नवीन नाही. पण परिस्थितीबरोबर तो सतत बदलणारा आहे. कारण माणसे, यंत्रे, तसेच कायदे सामाजिक आणि राजकीय परिस्थितीही सारखी बदलत असतात. ज्याला स्वतःचा व्यवसाय चालवावयाचा आहे आणि यशस्वी व्हावयाचे आहे, त्याने दोन महत्त्वाचे मुद्दे लक्षात घेतले पाहिजेत. (१) आपले उद्दिष्ट स्पष्टपणे नजरेसमोर ठेवले पाहिजे. (२) आपले निर्णय आपला व्यवसाय यशस्वी करावयाचे दृष्टीने घेतले पाहिजेत. तर्कशुद्ध विचार करूनच निर्णय घ्या हे या शास्त्राचे ब्रीदवाक्य आहे.

संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, संत रामदास, महावीर, बसवेश्वर, सावता माळी तसेच ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज या संतांनी आपल्या साधकांना, भक्तांना आपल्या कार्यातील व्यवस्थापनात यश संपादन करण्यासाठी कार्याचे महत्त्व, माहात्म्य व अपरिहार्यता यांची प्रशस्ती केली आहे. अध्यात्मिक क्षेत्रांत वाटचाल करणारा साधक आपल्या प्रत्येक व्यवहारात, प्रपंचात, कृतीत, निर्णयात नीतीमूल्ये जपत असतो. तो आपल्या कामात चुकीचे निर्णय घेऊच शकत नाही. व्यवस्थापन शास्त्रामध्ये पाच मूलतत्त्वे सांगितली आहेत. (१) नियोजन (२) आखणी (३) मनुष्यबळ (४) पाठपुरावा, रेटा (५) नियंत्रण.

नियोजनामध्ये प्रामुख्याने त्या इसमाने काय करावयाचे, केव्हा करावयाचे, कोणी करावयाचे, ते का करावयाचे आणि कसे करावयाचे याचा अंतर्भाव असतो.

हे नियोजन दीर्घकालीन असू शकते किंवा मध्यमकालीन असू शकते वा अल्पकालीन असू शकते.

मनुष्य आयुष्यात कुटुंबाचे पालन पोषणासाठी व्यवसाय किंवा नोकरी करीत उत्पन्न मिळवित असतो. हा प्रापंचिक व्यवहार आहे. परंतु त्या उत्पन्नाचा कुटुंबाच्या भरण-पोषणासाठी वापर केला नाही तर त्या व्यवसाय करण्याला अर्थ रहात नाही. 'मी' चे कर्तव्य म्हणजे भगवंताचे अनुसंधान केले, पण देहाचे कर्तव्य म्हणजे सदाचरण आणि संबंधित कर्तव्ये केली नाही तर त्या कमावलेल्या उत्पन्नाचा घरच्यासाठी वापर केला नाही असे होईल म्हणून प्रत्येकाने भगवंताची स्मृति व कर्तव्याची जागृती ठेवावी.

सर्व देशांमध्ये सर्वकाळी संत किंवा सत्पुरुष निर्माण होतात. भारतामध्ये त्याची संख्या बरीच मोठी आढळते. आतापर्यंत होऊन गेलेल्या संतांची विद्‌वत्ता कोणत्याही लौकिक पंडीतांना लाजविणारी होती ही गोष्ट आद्य शंकराचार्य, ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, अरविंद आणि ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे साक्षेपी उदाहरणांवरून सिद्ध होते.

संतांच्या तत्त्वज्ञानाला अध्यात्मदर्शन म्हणतात. सिद्धांत आणि साधना अशी त्याची दोन अंगे आहेत.

श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज अशा पक्क्या थोर संतांपैकी होते. त्यांच्या ठायी मुळातूनच तीव्र अध्यात्मवृत्ती होती. श्रीएकनाथ व श्रीसमर्थ रामदास यांच्याप्रमाणे अगदी लहानपणापासूनच आपल्या जीवित कार्याची स्पष्ट जाणीव त्यांना होती. ब्रह्मज्ञानाचे ध्येय गाठणे हेच त्यांचे उद्दिष्ट होते. देहबुद्धी मुळापासून जाळून टाकल्यामुळे त्यांच्या आचारात, विचारात आणि उच्चारात 'मी'पणा व 'माझे'पणा दिसायचा नाही. आपण जो ब्रह्मानंद सेवन करतो तो सर्वांनी सेवावा व धन्य व्हावे हीच एकमेव प्रेरणा ते आपल्याकडे येणाऱ्या भक्तांना, साधकांना सांगत. शेवटचा श्वास असेपर्यंत सर्वांनी भगवंताचे मार्गी लागावे, म्हणजे भगवंताचे नाम घ्यावे असा त्यांचा आग्रह असायचा.

शके १७६६ मधील माघ महिन्यात शुद्ध द्वादशीला बुधवारी पहाटे दि. १९ फेब्रुवारी १८४५ ला सूर्योदयाचे सुमारास गोंदवले येथे श्रीमहाराजांचा जन्म झाला.

आजोबा-आजी त्यांना गणपती म्हणत. आई-वडील त्यांना गणू म्हणत. मित्र व गावचे लोक त्यांना 'गणुबुवा' म्हणत. उत्तर भारतात त्यांना 'दख्खन के महाराज' म्हणत. शिष्यमंडळ त्यांना महाराज किंवा श्रीमहाराज म्हणत. त्यांचे गुरु तुकामाई त्यांना 'माझा बाळ' म्हणत. ते स्वतः 'ब्रह्मचैतन्य बुवा रामदासी' अशी आपली सही करत. निर्धारित दिनचर्येशिवाय बहुतेक वेळा ते गावातील लोकांचे आजारी मूल, सासरा, सासवा-सुनांचे भांडण, दागिन्यांची चोरी, कपडे चोरी, व्यापारात नुकसान, नोकरी पाहिजे, देव भेटत नाही इत्यादी समस्यांचे निवारण करीत. हाच त्यांचा नित्य परिपाठ होता. असे करण्यात त्यांचा लोकांना शिक्षण देण्याचाच हेतू असे.

नामस्मरण करणे आणि दरवर्षी 'तेरा कोटी नामजप' यांचा संकल्प सर्वांनी करावा असे त्यांना वाटे, तसे ते सांगतही असत. अनेक भक्त-भाविक मंडळी त्यात श्रद्धेने सहभागी होत. दर पुण्यतिथीच्या दिवशी पुढील वर्षासाठी पुन्हा असा 'तेरा कोटी जपांचा' संकल्प केला जातो.

महाराष्ट्रातील अनेक गावांत व शहरांत अनेक उपासना केन्द्रे

स्थापन होत आहेत. तेथेही नामजपाचे संकल्प दरवर्षी केले जातात व पार पडतात. कर्नाटक, मध्य प्रदेश, गुजराथमध्येही अशी उपसाना केन्द्रे चालू आहेत.

श्रीमहाराजांचे प्रेरणेने सुमारे साठ उपासना केन्द्रे व मंदिरे स्थापली गेली आहेत.

'जेथे नाम तेथे माझे प्राण' ही त्यांची ग्वाही होती. नामस्मरणाची थोरवी तर सर्व संप्रदायात मूळस्थानी मानली गेली आहे.

नामाच्या अनुसंधानात राहून जे घडते ती त्याचीच इच्छा असते अशी त्यांनी सर्वांची खात्री करून दिली होती. ज्याच्याजवळ भगवंताचे नाम आहे त्याच्या मागे-पुढे मी आहे. तुम्ही भगवंताचे नाम घ्यावे या पलीकडे मला कसलीही अपेक्षा नाही' अशी त्यांची मुख्य शिकवण होती.

श्रीमहाराजांनी जे नामजप, नामस्मरण सांगितले ते केव्हा घ्यावे याचाही त्यांनी खुलासा केला आहे.

काही वेळ वृथा न घालविता करावे साधन । पापासि भ्यावे रात्रंदिन । मानस पूजेचा नित्य नेम । अखंड करावे रामचिंतन । नामाचे न चुके अनुसंधान । ऐसे अभ्यासिता होय ब्रह्मज्ञान ॥

साधक उपासकाने उद्दिष्टपूर्तीसाठी ब्रह्मज्ञानाचे ध्येय गाठण्यासाठी जे करावयाचे ते केव्हा करावयाचे याचाही श्रीमहाराजांनी खुलासा केलेला आहे. सूर्योदयाच्या अगोदर उठावे. जाग आल्याबरोबर नाम घ्यावे.

नंतर चूळ भरून कमीत कमी पाच मिनिटे तरी अंथरूणावर बसून डोळे झाकून भगवंताची प्रार्थना करावी. प्रार्थनेमध्ये म्हणावे, 'भगवंता, तुझ्या कृपेने आजचा दिवस आला तो तुझ्या स्मरणात राहू दे.'

प्रातर्विधी करून पुढे देवाला व वडिलमाणसांना वंदावे. स्नान करावे. स्नान झाल्यावर रोज थोडा वेळ पूजा, जप, ध्यान यामध्ये घालवावा.

नंतर नोकरी-चाकरी, उद्योगधंदा यामध्ये सात-आठ तास जातात. ते आटोपल्यावर घरी यावे, हातपाय स्वच्छ धुवावे आणि थोडा वेळ जप करावा.

रात्री जेवणखाण झाल्यावर नित्यनियमाने ज्ञानेश्वरी, नाथभागवत किंवा दासबोध यापैकी एक ग्रंथ रोज वाचावा. कमीतकमी एक ओवी वाचावीच.

रात्री दहा ते अकराचे सुमारास झोपावे. निजण्याच्या अगोदर भगवंताची प्रार्थना करावी की, 'भगवंता, तुझ्या कृपेने आजचा दिवस चांगला गेला', असे म्हणून जप करीत झोपी जावे.

साधकांनी लक्षात ठेवावे की, 'कोणत्याही काळी, कोणत्याही अवस्थेमध्ये , भगवंताचे विस्मरण होता कामा नये. त्याचे नाम चालू असावे. यासाठी सत्संगति हा चांगला व एकमेव उपाय आहे.'

संतांची संगत योग्य प्रकाराने केल्यास भगवंताची प्राप्ती खास घडते. परंतु संत ओळखू येण्यास व त्याची भेट घडल्यास भगवंताचे नामच घेत राहणे आवश्यक आहे.

नियोजनामध्ये आपले उद्दिष्टपूर्तीसाठी सरसकट सगळ्यांना मुक्त अनुमती दिलेली नाही. ते प्रयत्न, ती साधना कोणी करावी याबद्दलही काही निकष श्रीमहाराजांनी निर्धारित केलेले आहेत.

साधक किंवा उपासक हा निःस्वार्थी असला पाहिजे, तरच त्याला साधना करण्याचा अधिकार असतो. लोण्यासारखा मऊ असला पाहिजे. त्याचा कोणाशी द्वेष नसावा, कोणाशी वैर नसावे. परमार्थ करताना साधकाने आपल्या प्रयत्नाबद्दल साशंक न राहता तो आत्मविश्वासाने करीत राहिला पाहिजे. त्याने कोणत्याही गोष्टी मनापासून श्रद्धापूर्वकतेने केल्या पाहिजेत. त्याने आपल्या दोषावर पांघरुण घालून दुसऱ्याला दोष देऊ नये. आपले दोष आपण स्वीकारावेत, टप्प्याटप्प्याने उपासकाची भगवंताला भेटण्याची उत्सुकता वाढली पाहिजे. मानसन्मानापासून साधकाने दूर असले पाहिजे. आपले कौतुक ऐकण्यासाठी त्यांनी उत्सुकता दाखवू नये.

ब्रह्मचारी साधकाने प्रपंचातल्या उठाठेवी करू नयेत. साधकाने आपला बुद्धीभेद करण्याची चूक कधी करू नये. खऱ्या साधकाने स्त्रियांपासून दूर असावे. त्याने स्त्रियांना भिऊनच वागावे.

'जो साधक असोनी मुमुक्षु वृत्ती ।
विद्वान आणि शास्त्री । परमात्म्याकडे लागला ।
ज्याचे साधनी नाही गलबला ।
भ्रम कधी नाही जाहला ।
तो श्रेष्ट म्हणावा मला ।
दृश्य वस्तुसकळ सृष्टि । उघडी बंधनाची कोडी ॥'

ईश्वरप्राप्तीसाठी साधक नामजपाची साधना करीत असतो. कारण तोच एक मार्ग श्रीमहाराजांनी सांगितलेला आहे.

प्रपंचाचा प्रयत्न जो आज चालू आहे तो तसाच चालू ठेवावा, पण 'मला भगवंत हवा' असे सातत्याने म्हणत रहावे, तशी मनी आस ठेवून रहावे. ईश्वरप्राप्ती होईल, साधनाही चालू राहील. उद्दिष्टपूर्तीसाठी साशंकतेने नामस्मरण, नामजप करू नये. म्हणून निर्भेळ नामस्मरण हवे आहे आणि त्यामुळे आपल्याला यशप्राप्ती झाल्याशिवाय राहणार नाही.

श्रद्धेने केलेली भक्ती, साधना भगवंताला भावते. म्हणून आपल्या नामजपसाधनेमध्ये कृत्रिमपणा असू नये. साशंकता असू नये. ठामपणा हवा.

आपल्याला जो भ्रम झालेला असतो तो सर्वसाधारण उपायाने दूर होत नाही. त्यासाठी तीन उपाय रामबाण उपाय म्हणून योजावेत. एक विचार, दुसरा नामस्मरण आणि तिसरा सत्संगती. आपण आपल्या आईशी जसे बोलतो तसेच देवाशी बोलावे. देवाला आपले दुःख सांगत जावे. नाम हेच साधन आणि नाम हेच साध्य. नाम घ्यावे असे वाटते म्हणजे आपल्यावर भगवंताची कृपा आहे.

नीतिधर्माचे आचरण, शास्त्रशुद्ध वर्तन, शुद्ध अंतःकरण आणि भगवंताचे स्मरण इतक्या गोष्टी असतील तरच उपासक हा शेवटपर्यंत पोहोचेल. भगवंताचे होण्यासाठी अंगी लीनता हवी. लीन माणसाला

भगवंत लवकर साधेल. भगवंताची सेवा करण्यासाठी शुद्ध भावना पाहिजे. वाचन हे सुद्धा साधना आहे. वाचनाचे मनन झाले पाहिजे. मनन झाले की ते आपल्या रक्तात मिसळते. साधन व वाचन बरोबर चालावे. व्यवस्थापनामध्ये नियोजन काय करावयाचे त्याच्याइतकेच ते कसे करावयाचे हेही अत्यंत महत्त्वाचे आहे.

माणुसकीचा विकास होऊन याच देहात देवत्व पावण्यासाठी भगवंताची भक्ती करावयाची असते. ती साधण्यास संतांची संगत आणि भगवंताचे नाम हे दोनच उपाय प्रापंचिकाच्या पचनी पडतात. त्यातदेखील संगत मिळणे व टिकणे फार कठीण असते, हे ध्यानात धरून श्रीमहाराजांनी नामस्मरणाचा एवढा मनापासून प्रसार केला, तोंडाने बोलू लागल्यापासून तो मृत्यूने त्यांचे तोंड बंद होईपर्यंत, ते भगवंताचे नामाचे महत्त्व गात राहिले. नामस्मरणाला कसलीही अट नाही, कसलेही बंधन नाही. त्यात सत्संगती लाभते व भगवंताचे चिंतन आपोआप घडते. चिंतनातून अनुसंधान उदय पावते आणि अनुसंधान पक्व झाले की स्वतःच्या हृदयांतच भगवंताचे दर्शन घडते. खरे अध्यात्म कशात आहे या बद्दल सविस्तर विवेचन करणारे अनेक संस्कृत प्राकृत ग्रंथ आपल्याकडे आधीच असल्याने आणखी एक नवीन ग्रंथ लिहिण्याचे भानगडीमध्ये श्रीमहाराज पडले नाहीत. श्रीमद्‌भगवत्‌गीता, नाथांचे भागवत किंवा श्रीसमर्थांचा दासबोध, यापैकी कोणत्याही ग्रंथाचे सूक्ष्म वाचन करावे असे ते सांगत. परंतु हे ग्रंथदेखील योग्य दृष्टीने कळणे कठीण होऊन बसल्यामुळे श्रीमहाराज त्यांच्यावर निरूपण करीत असत. शिवाय कोणी त्यांना भेटावयास आला असता ते अत्यंत सुलभतेने व रंजकतेने, कथारूपाने वा दृष्टांताने, परमार्थ समजावून देत.

भगवंताचे नाम घेणे म्हणजे आपल्या कर्तेपणाचा अभिमान कमी करणे होय. नामाचे प्रेम लागले म्हणजे त्याचे कर्तेपण कमी होऊ लागते. नंतर तो जे जे कर्म करतो त्याचे फल श्रीमहाराजांच्या इच्छेवर तो सोपवतो. हे साधले की त्याला एक प्रकारची शांती मिळून यशापयशाचे सुख-दुःख होत नाही. श्रीमहाराज यांच्या इच्छेने सर्व गोष्टी घडतात असे म्हटल्यावर, म्हणजे कर्तेपणा त्यांच्याकडे दिल्यावर आपली स्वतःची अशी इच्छाच उरत नाही. तेथे यशापयशाचे महत्त्व उरत नाही. अशा रीतीने भगवंताचे नामांत प्रपंचाचे कर्तव्य करीत असता श्रीमहाराजांकडे कर्तेपण देऊन सुखदुःखामध्ये समाधानात राहणे ही त्यांच्या अस्तित्वाची खरी खूण होय. कधी कधी सुख तर कधी दुःख, कधी यश तर कधी अपयश, हा प्रपंचाचा धर्मच आहे हे ओळखून, आपल्या जीवनात घडून येणाऱ्या सर्व घटना श्रीमहाराजांच्या इच्छेने व सत्तेनेच घडून येतात अशी खरी जाणीव ज्यांच्या अंतरंगात उमटली, त्याला त्यांचे खरे अस्तित्व समजले व त्यालाच रहस्य थोडेतरी उमगले. 'थोडे' म्हणण्याचा हेतू असा की, साधकाच्या या अवस्थेमुळे प्रपंच सत्य आहे ही भावना राहतेच. म्हणून हा पक्ष गौणच आहे. 'मी खरा नसून तेच खरे आहेत' हे सांगण्यासाठी जेथे 'मी' उरतच नाही, ती खरी पूर्ण अवस्था समजावी. तेथे मी त्यांना आणतो हे देखील संभवत नाही. सांगण्याचा मुद्दा इतकाच की, श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची खूण बघत असताना ते प्रापंचिक अडचणी किती दूर करतात हे न पहाता सर्व प्रसंगांत आपले नाम व समाधान किती टिकते हे प्रत्येकाने पहावे.

व्यवस्थापन शास्त्राचा दुसरा टप्पा आहे केलेल्या नियोजनाची यशस्वी कार्यवाही करण्यासाठी करण्याची आखणी (Organising) हा होय.

आपण रोज उठल्यावर भगवंताचे स्मरण करण्याचा नियम ठेवावा. म्हणजे प्रपंच सोपा जातो. नामस्मरणाने थोडा उशीर लागेल, पण जे साधेल ते कायमचे साधेल. कारण नामाने मुळापासून सुधारणा होते. आपण भगवंताच्या नामात राहावे. त्यात राहिले की, कोणीही संत भेटतो आणि आपले काम करतो. नामाशिवाय जगात दुसरे सत्य नाही, अशी दृढ भावना करावी. नाम हेच एक त्रिभुवनात सत्य आहे, अशा श्रद्धेने जपावे.

आपली वृत्ती आणि भगवंत यांना जोडणारी साखळी म्हणजे भगवंताचे नाम होय. म्हणून आपली वृत्ती नामामध्ये गुंतवून ठेवावी. नामाचा संबंध वृत्तीपर्यंत गेला की अनुसंधान टिकले.

## नामस्मरण कसे करावे ?

'परेपासून वैखरीपर्यन्त । करावे रामचिंतन' असा श्रींचा आग्रह असायचा. याचा अर्थ असा - ओठ व जीभ यांची हालचाल करून वैखरीने नामस्मरण करणे बहुतेकांना सोपे, सोयीचे व लाभदायक असते. त्यासाठी अंगात शक्ती लागते. ती सर्व परिस्थितीत टिकतेच असे नाही. अखंड जपाचे उद्दिष्ट साध्य करायला मध्यमा, पश्यन्ती व परा याही वाणींनी जप करण्याचा अभ्यास लागतो. सवयीने तोंड बंद असून आतल्या आत जीभ वळून नामस्मरण होऊ लागते. अभ्यास आणखी वाढला म्हणजे नाम मध्यमेत येऊ लागते. जड व सूक्ष्म यांच्या मधली म्हणून ही 'मध्यमा' वाणी. या स्थितीत ओठ व जीभ यांची हालचाल नसते, तर वाणीचे मेंदूतले जे केन्द्र येथे नामाचे सूक्ष्म स्पंदन चालू असते. येथून या नामाला शारीरिक शक्ती लागत नाही. वैखरीमध्ये वा मध्यमामध्ये नाम चालत असता आपण ते कानांनी ऐकण्याचा प्रयत्न करावा, याने एकात्मता मिळते. असा अभ्यास नेटाने चालू राहिला म्हणजे नाम यानंतर 'पश्यंती'मध्ये हृदयस्थानी अनुसंधान रूपाने चालते. अखेर ते नाभीस्थानी 'परा'वाणीने केवळ स्फूर्तिरूपाने चालू रहाते.

या कलीयुगात उद्धरून जाण्यासाठी नामाशिवाय दुसरा उपाय नाही, हे अनेक संतांनी सांगितले आहे. श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज हे या नामाशिवाय दुसरे कोणतेही साधन ईश्वरप्राप्तीसाठी सांगत नव्हते.

श्रीमहाराजांच्या पोथीत एक ओळ आहे,

'माय एक जन्मीची गुरुमाय अनंत जन्मोजन्मीची'

'स्तोत्र म्हणणे हे पत्राने भगवंताची भेट घेण्यासारखे आहे. नाम घेणे हे भगवंताला प्रत्यक्ष भेटण्यासारखे आहे. म्हणून नाम हवेच.'

श्रीमहाराजांना लौकीक व प्रसिद्धी आवडत नाही. म्हणून त्यांनी त्यांचे चरित्र लिहिणाऱ्याला लिहू नकोस असे सांगितले.

व्यवस्थापनाच्या वाटचालीतील तिसरा टप्पा म्हणजे मनुष्यबळ, भक्तगण, साधक. श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांच्या अनुसंधानाच्या

अनुभूतीची खात्री झाल्यानंतर एक साधक दुसऱ्या साधकाला मला फार मोठे धन मिळाले, अशा आनंदाचे वर्णन करून सांगतो. स्वाभाविकपणे नवीन साधक त्याला येऊन मिळतो. भगवंताची प्राप्ती ही प्रत्येक आस्तिकाची तळमळ असतेच.

नेत्यांमध्ये जे गुण स्वरूप हवे ते सर्व श्रीमहाराजांच्यामध्ये होते. चेहऱ्यावर एक प्रकारचे तेज तळपत असे. अन्य माणसांवर त्यांची छाप सहज पडे.

आपले उद्दिष्ट सार्थ करावयाचे असेल तर साधक हा निःस्वार्थी असावा. कोणाशी द्वेष नसावा. परमार्थात साशंकता असता कामा नये. तो जे काही करतो ते मनापासून करीत असतो. साधक हा जगामधील दोष पहात नाही. कारण त्या दोषांचे बीज आपल्या मध्येच असते. साधक एखादा तरी धर्मग्रंथ वाचीत असतो.

भक्त किंवा साधक हे जाणून असतात की आपल्याला झालेला भ्रम नाहीसा करण्यासाठी तीन उपाय योजतात. एक विचार, दुसरा नामसंगती, तिसरा सत्‌संगती. कारण त्याला माहीत असते की, कर्तव्याची जागृती आणि भगवंताची स्मृती असल्यास समाधान प्राप्ती होत असते. साधनांत साधन म्हणजे भगवंताचे नाम.

नियोजन प्रक्रियेमध्ये महत्त्वाच्या विषयाचे वेळीच प्रमुख नेता भाग घेतो. नियोजनाच्या कारवाईत मधले अधिकारी भाग घेतात. यामध्ये पूर्ण यशस्विता मिळेलच अशी अपेक्षा करणे चुकीचे असते. व्यावहारिक टप्पे असावेत, तथापि प्रसंगानुसार पर्यायी मार्गाचा अवलंब करायला लागला तर जरूर करावा.

निर्णय प्रक्रियेला या व्यवस्थापनात अनन्यसाधारण महत्त्व दिलेले आहे. निर्णय घेणे म्हणजे समस्या निवारणासाठी समोर उपस्थित असलेल्या पर्यायातून उत्कृष्ट परिणामकारकतेच्या निकषावर एकाची निवड करणे तेच यांत महत्त्वाचे असते.

व्यवस्थापनात नेत्याच्या सहकाऱ्याशी त्याचे नाते आपुलकीचे, आत्मीयतेचे, सलोख्याचे, विश्वासाचे असावे, भीतीचे वा साशंकतेचे असता कामा नये.

बद्धपणापासून सिद्धपणापर्यंत साधकाला साधारणपणे चार पायऱ्या चढून जाव्या लागतात. जिज्ञासा, मुमुक्षा, साधकावस्था आणि सिद्धावस्था या क्रमाने मनुष्य तयार होत जाऊन अखेर परमात्मस्वरूप बनतो.

सकाळी उठल्यापासून तो रात्री अंथरुणावर पडेपर्यंत श्रीमहाराजांना फुरसतीचा स्वस्थपणा कधी नसे. कारण रात्री अंथरुणावर पडल्यावर देखील त्यांना गुप्तपणे भेटणारे लोक होते.

श्रीमहाराज पोहण्यात फार पटाईत होते. मुळीच पोहता न येणाऱ्यांना बरोबर घेऊन ते गंगेतून या तीरापासून त्या तीरापर्यंत सहज जात. घोड्याला ते नरम करीत. श्रीमहाराज पळण्यात व झाडावर चढण्यातही पटाईत होते. सूर्यनमस्कार व दंड ते चांगले काढीत. नेत्यामध्ये हवे असलेले सर्व गुण त्यांच्यात होते. इतरांना बरोबर घेऊन जाणे हे त्यांचे वैशिष्ट्य.

भगवंताच्या प्रेमाचे, भक्तीचे आणि नामाचे तसेच संतांच्या वागणुकीचे स्पष्टीकरण करताना त्यांच्या वाणीला स्फुरण चढे व त्या वेळी ते उत्तम प्रकारचे दृष्टांत देऊन सहज बोलून जात. मनुष्याला गोंजारून वळविण्याची कला जशी त्यांना अवगत होती तशीच वाह्यात माणसाला खडसावून ताळ्यावर आणण्याची कलापण त्यांच्यात होती.

हे सर्व करीत असताना भक्त-साधकांच्या अनुसंधानात त्यांचे मन भगवंताच्या ठायी चिकटून असते. आपण देहाने पूजा करतो, यात्रा वगैरे करतो, पण मन मात्र इतरत्र भटकत असते. अशा लोकांना नामस्मरणात रममाण व्हावे यासाठी श्रीमहाराज नेहमी Motivation पाठपुरावा करीत. त्याचा रेटा लावून धरीत. प्रोत्साहनाकरिता नामस्मरणाशिवाय तरणोपाय नाही, याचा आग्रह असे. इतर साधनांनी जे साधायचे ते नुसत्या अनुसंधानानाने साधते हाच या युगाचा महिमा आहे. प्रत्येकाचा रोग निराळा असला तरी औषध एकच आहे ते म्हणजे भगवंताचे अनुसंधान, भगवंताचे नामस्मरण.

श्रीमहाराज आपले तत्त्वज्ञान प्रत्यक्ष जीवनामध्ये पूर्णपणे उतरविल्याशिवाय राहत नाहीत. ते संत होते, त्यांची प्रत्येक कृती व उक्ती एका विशिष्ट तत्त्वज्ञानाच्या पायावर योजलेली असे. त्यामुळे त्यांचे भक्त-साधक आपल्या नामस्मरणात, अनुसंधानात जीव ओतून रममाण होत.

शेवटी बाब येते या सर्व अनुसंधान, भक्ती, साधना, प्रेमामध्ये गुंतलेल्या साधकभक्तांना वेळोवेळी मार्गदर्शन करणे आणि करतात ते बरोबर करतात किंवा नाही यासाठी त्यांचेवर दृष्टीक्षेप ठेऊन त्यांचेवर नियंत्रण Control ठेवण्याचे काम श्रीमहाराज करीत. आता त्यांची परंपरा राखून जे कार्यमग्न आहेत तेही या पंथातील भक्तांचेवर पूर्ण नजर ठेऊन त्यांचेकडून गैर काही होऊ नये यासाठी पूर्ण नियंत्रण (control) ठेवून असतात.

प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणी असणाऱ्या आत्म्याच्या प्रकटीकरणास मार्ग दाखवून त्या व्यक्तीची अध्यात्मिकता विकसित करणे हा खरा परोपकार होय. हे सगळे करण्यासाठी श्रीमहाराजांनी आधी सर्वत्याग केला व नंतर लोकांना सांगण्यास सुरुवात केली. एक आदर्श नेता जसा वागायला हवा तसे यांचे हे वागणे झाले. त्यामुळे साधक-भक्तांचेवर यांचा धाक राहतो, वचक असतो व त्यांचे नियंत्रणाखाली राहून ते सांगतील तसे वागण्यास तयार होतात. श्रीमहाराजांना प्रवासाची भारी आवड होती. प्रवासामध्ये त्यांना तत्कालीन समाजजीवन उत्तम रीतीने पाहता आले. त्यांची दृष्टी मूलगामी, व्यापक व सूक्ष्म झाल्यामुळे लोकांची अवस्था काय आहे हे त्यांच्या लक्षात येण्यास वेळ लागत नसे. त्यामुळे त्यांचेवर योग्य नियंत्रण ठेवणे त्यांना सहजसुलभ वाटत असे.

श्रीमहाराजांच्या भक्तगणांमध्ये श्रीमंतांपेक्षा अडाणी, गरीब व सामान्य जनताच अधिक असे. अशा लोकांना ते हाताशी धरून योग्य, लायक भक्त-साधक म्हणून तयार करीत. त्यांच्यामध्ये राहूनच त्यांना परमार्थामध्ये पुढे ढकलले.

अनेक वर्ष सांगून व त्यांचे कष्ट सोसूनदेखील प्रापंचिक लोक पुन्हा मूळपदावर येतात, असा अनुभव वारंवार आला तरी त्यांनी आपले काम सोडले नाही किंवा प्रापंचिकांवर रागावले नाहीत. त्यानंतर त्यांच्या कार्याचा परिणाम आपोआप दिसू लागला. कितीतरी सामान्य

प्रापंचिक स्त्रिया व पुरुष यांच्या ठिकाणी तपस्वी लोकांना खाली पाहण्यास लावील अशा प्रकारची भगवंताची निष्ठा उत्पन्न होऊ शकते याची अनेक उदाहरणे पहावयास सापडली.

एकच मनुष्य पूर्णत्वाला जाण्यापेक्षा पुष्कळ माणसे थोडीतरी पुढे जाणे हे चांगले, हे श्रीमहाराजांचे म्हणणे होते. व्यावसायिक व्यवस्थापनातील मर्म श्रीमहाराजांनी कसे योग्य प्रकारे राबविले याचे दर्शन असे घडते.

श्रीमहाराज हे जन्मजात उत्तम शिक्षक होते. त्यांच्या वागण्यात, बोलण्यात फार आकर्षकता व गोडवा असे. म्हणून मुलांची व तरुणांची मने आकर्षित करून घेणे त्यांच्या हाताचा मळ होता.

ते बहुधा स्वतः लिहीत नसत. कोणासतरी लिहून घेण्यास सांगत. सांगण्याचा प्रवाह सारखा चालू राही. लिहिणे संपल्यावर ते पुन्हा ते वाचून घेत. त्यांना हिंदी, कानडी, तेलगु, संस्कृत वगैरे भाषा उत्तम येत. श्रीमहाराजांनी स्वतः ग्रंथ लिहिला नाही. याचे कारण असे की सध्याचे हे चिकित्सायुग आहे. या युगामध्ये आचरणापेक्षा तर्कविलासाकडे माणसांचे अधिक लक्ष आहे. शिवाय आधीच्या संतांनी पुष्कळ लिहून ठेवलेले आहे असे त्यांना वाटे. अशा काळामध्ये प्रत्येक इच्छुक जीवाशी व्यक्तिगत संबंध जोडून त्याला वळविणे सोपे व इष्ट आहे. तत्त्व कितीही उच्च असले तरी त्याचा खरा व पूर्ण अर्थ त्या तत्त्वाच्या आचरणामध्येच समजतो अशी त्यांची ठाम भूमिका होती. परमार्थ हा प्रपंचांत मिसळला पाहिजे असे ते नेहमी सांगत. श्रीमहाराजांनी जन्मभर परमार्थाचे चिंतन केले व लोकांकडून तसे चिंतन करवून घेण्याचा प्रयत्न केला. त्यावर योग्य नियंत्रण ठेऊन त्याची परिणामकारकता वाढवीत असत.

श्रीमहाराज सुसंस्कृत होते. एकंदर स्त्रीवर्गाबद्दल त्यांच्या मनात फार आदर असे. स्त्रियांना ते पूज्य मानीत.

श्रीमहाराजांकडे गुरुत्व आपोआप आले. गुरु होण्याची सर्व लक्षणे त्यांच्यात होती. तरीदेखील आपल्या शिष्यांना शिष्यपणाने कधीच पाहिले नाही. हर प्रयत्न करून शिष्याला कृतार्थ करण्याचा प्रयत्न त्यांनी अहोरात्र केला.

श्रीमहाराज हे जन्मजात पुढारी होते. आपल्या अनुयायांच्यावर ते पोटच्या पोराप्रमाणे प्रेम करीत. त्यांच्याकडे कडक शिस्त नव्हती, तरी कोणाचीही गैरवर्तणूक त्यांनी चालू दिली नाही. योग्य नियंत्रण व मार्गदर्शन करण्यासाठी लागणारा सारासार विचार, धोरण, युक्ती, जवळची वाट, सहानुभूती वगैरे सर्व व्यावसायिक व्यवस्थापनातील नेतृत्वाजवळ हवे असणारे गुण त्यांच्यात भरपूर होते. त्यांनी आपल्या चारित्र्याने लोकांना धडा घालून दिला. भगवंताच्या लीलेने जीवनातील बऱ्या-वाईट प्रसंगाला टक्कर देण्यास शिकविले. त्यांची साधी वृत्ती, लीनता आणि सहनशीलता, निरलसता, संतोष, आर्जव, लोकमान्यता, कोणतीही गोष्ट अगदी मनापासून करा, झाल्या-गेल्याचा विचार आणि पुढच्याचा विचार हे त्यांचे विशेष गुण होते. त्यामुळे त्यांचे नीतीधैर्य भक्कम ठरून त्यांनी व्यवहाराचा परमार्थासाठी भरपूर उपयोग करून घेतला.

अशा प्रकारे व्यवस्थापन शास्त्रातील नियोजन (Planning)] आखणी (Organising) मनुष्यबळ (Staffing) पाठपुरावा, प्रोत्साहन (Motivation) आणि नियंत्रण (कंट्रोलिंग) या पाच मूलतत्त्वांचा पूर्णतः अंगीकार केल्याचे दर्शन घडते.

या व्यवहारकुशल, चाणाक्ष, करुणामय श्रीमहाराजांनी दि. १७ मे १९११ रोजी गोंदवल्यास एकमुखी श्रीदत्तमंदिराची (वैशाख शुद्ध पंचमी शके १८३३) स्थापना केली आणि वयाचे ६८ वे वर्षी १९१३ ला गोंदवल्यातच त्यांचे निर्वाण झाले.

श्रीगुरुमहाराजांची जशी गुरुपरंपरा आहे तशीच व्यवस्थापन शास्त्रामध्येही तज्ज्ञांची मांदियाळी आहे ती अशी -

एफ. डब्ल्यू. टेलर, एल्टन मेयो,

मेरी पार्कर फॉलेट, पीटर ड्रकर,

मेझाबेथ कँटर या सर्वांचे या व्यवस्थापन शास्त्रात उल्लेखनीय योगदान आहे.

## श्रीमहाराजांची गुरुपरंपरा





डॉ. हनुमंत नारायण कुन्देन
गीतगोविंद अपार्टमेंटस्, कोहिनूर कॉलनी,
सहकार नगर, (२), पुणे ४११ ००९.

# सद्गुरु श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर यांच्या कृपेचे मला आलेले अनुभव


## डॉ. आर. बी. पाथरकर

*एम. एस. (जनरल), एम. एस. (अर्थो). १९५८ मध्ये महाराष्ट्र पब्लिक सर्व्हिस कमिशनतर्फे सिव्हील सर्जन म्हणून नेमणूक. सोलापूर, कोल्हापूर, धुळे येथे काम करून राजीनामा. २२ वर्षे कोल्हापूर येथे स्वतःचे हॉस्पिटल. १९९१ मध्ये निवृत्त.*


प्रथमच मला नमूद करावेसे वाटते की, श्रीमहाराजांची मजवर पूर्ण कृपा आहे ही केवळ माझ्या वडिलांच्या पुण्याईने व कै. तात्यासाहेब केतकर ह्यांच्या प्रेमामुळे. माझे कर्तृत्व शून्य. माझ्या आयुष्यात ज्या घटना घडल्या त्यात श्रीमहाराजांचा हात होता ह्याबद्दल मला तरी शंका नाही. मला पुष्कळ अनुभव आले. त्यातील काही मुख्य अनुभव खाली देत आहे.

माझे लग्न १९५५ साली झाले. त्या वेळी मी एम. बी. बी. एस. झालो होतो व एम्.एस.च्या टर्म्स भरत होतो. एम्. एस. झाल्याशिवाय मला लग्न करावयाची इच्छा नव्हती. जेव्हा मला श्रींनी एकटे भेटावयास बोलावले तेव्हा माझ्या लग्नाविषयी असणार ह्याची मला कल्पना आली. लग्न इतक्यात करायचे नाही, ह्याच्या समर्थनार्थ मी मुद्दे काढले व त्यांना सर्व मुद्दे सांगितले. त्यांनी माझा प्रत्येक मुद्दा तर्कशुद्धरीत्या खोडून काढला. नंतर त्यांनी मला विचारले, 'आता आणखी काय आहे?' मी म्हणालो की, मला इतक्यात लग्न करायचे नाही. तेव्हा ते चटकन् बोलले, 'नाहीतर त्यांना सुनमुख केव्हा दिसणार.' लगेच माझ्या मनात शंका आली की, आई किंवा वडील ह्यापैकी कोणतरी लवकरच जाणार. ही शंका आल्यावर ते लगेच म्हणाले, 'छे छे ! त्यांच्या जिवाला धोका आहे असे नाही. पण मला वाटतं की, आता वेळ आली आहे.' मी मनाशी विचार केला की, वेळ कशाची आली आहे. त्यांच्या जाण्याची की माझ्या लग्नाची. मी ताबडतोब होकार दिला. मुलगी त्यांनीच पसंत केली होती. तेव्हा मुलगी पाहाण्याचा केवळ औपचारिकपणा होता. माझे लग्नानंतर पाच महिन्यांनी माझे वडील वारले. वडिलांचे छत्र नाहीसे झाल्यावर मला छत्र पाहिजे होते व त्याकरिता मी श्रींना अनुग्रह देण्याची विनंती केली. त्यांनी लगेच आम्हा उभयतांना अनुग्रह दिला व म्हणाले, 'त्याने माझे ऐकले हे मला फार बरे वाटले. राम त्याला कधीही कमी पडू देणार नाही.' त्यांच्या कृपेने मला आजपर्यंत कमी पडले नाही.

मी एम्. एस. झाल्यावर महाराष्ट्र सरकारच्या Class I जागेसाठीचा अर्ज केला. अर्जात एक कॉलम होता - तुम्हाला किती पगाराची अपेक्षा आहे. श्रींच्या सांगण्यावरून मी तो मोकळा सोडला. त्यांच्या सांगण्यावरून मी Class II च्या जागेसाठीही अर्ज केला. त्याचा निकाल आधी लागला मला Class II ची जागा मिळाल्याचे कळाले. श्रींना सांगितल्यावर ते म्हणाले, 'बरे झाले.' मी लगेच म्हणालो की, 'आता पदोन्नत्तीकरिता मला हे किती दिवस रखडवतात तेच बघायचे.' लगेच ते म्हणाले, 'छे छे ! आपल्याला कोठे ही नोकरी करायची आहे. चांगली नोकरी मिळाली की, ही देऊ सोडून.' हे बोलणे झाले तो होता शनिवार. माझी के. ई. एम. हॉस्पिटलला नोकरी चालू होती. तेव्हा मी लगेच रविवारी घरी येणार नाही असे घरी सांगून हॉस्पिटलला निराश होऊन गेलो. रविवारी कै. तात्यासाहेबांच्या मुलाचा म्हणजे रा. दिनकरराव यांचा फोन आला की, ताबडतोब घरी ये. तुला Class I ची जागा मिळाली आहे. मी घरी होतो तेव्हा Class I ची जागा मिळाली होती व पगारही जास्त मिळाला होता. माझे Administrative Training पूर्ण झाल्यावर माझी पहिली पोस्टिंग सोलापूरला Civil Surgeon म्हणून झाली. सोलापूरला जाण्यापूर्वी मी श्रींना भेटलो तेव्हा ते म्हणाले, 'नीतीने पैसा मिळवावा.' त्यानुसार मी कधीही पैशाच्या किंवा अन्य कोणत्याही भानगडीमध्ये पडलो नाही. त्याला कारणे दोन होती. १. श्रींना आवडणार नाही व २. माझ्या वडिलांच्या नावाला बट्टा लागेल. माझी बदली नंतर कोल्हापूर व धुळे येथे झाली. धुळ्याला असताना मी नोकरीचा राजीनामा दिला. कारण मला कशाततरी अडकवायचा व काढून टाकायचे असा उघड उघड प्रयत्न माझे वरिष्ठ करीत होते.

राजीनामा दिल्यावर मी कोल्हापूरला स्वतंत्र व्यवसाय सुरू केला. २२ वर्षे Pratice केल्यावर मी निवृत्त झालो व पुण्यास राहावयास आलो. नोकरीत असताना व त्यानंतरही मला खेदाने म्हणावेसे वाटते की, मला त्रास झाला तो आपल्या माणसांकडूनच व मदत झाली ती इतर लोकांकडून.

दुसरा प्रसंग म्हणजे १९८७ साली माझ्या पत्नीला हार्ट अॅटॅक आला. तिला ICU मध्ये ठेवले. तिसऱ्या दिवशी तिची प्रकृती Serious झाली. तेथील Cardiologist ने फार प्रयत्न केले व पहाटे ४ वाजता मला म्हणाला की, 'सर आता Emergency Bypass हा एकच उपाय आहे.' मी त्याला म्हटले की, सकाळी सात वाजेपर्यंत कसातरी वेळ काढ. मी त्यानंतर मुंबईला फोन करतो व तिला मारुती व्हॅनमधून घेऊन जातो. मी तर पूर्णपणे हताश झालो होतो. तिच्या शेजारी बसून तिच्या छातीवर हात ठेवला व नामस्मरणास सुरुवात केली. आश्चर्य म्हणजे ती अर्ध्या तासात चक्क झोपी गेली. त्यानंतर मी केलेला १॥ कोटी जप तिच्या हातावर पाणी सोडून तिला देऊन टाकला. त्या दिवसापासून तिची तब्येत ठीक आहे. ह्या अनुभवावरून मी दोन गोष्टी शिकलो. १. संपूर्ण शरणागतीशिवाय मदत मिळत नाही. २. नामाशिवाय दुसरे साधन नाही. ह्या दोन प्रसंगांनी माझी खात्री झाली की, माझ्यावर श्रींची पूर्ण कृपा आहे व त्यांनी पाथरकर कुटुंबियांवर केलेले डोंगराएवढे उपकार केवळ नामस्मरणानेच काही अंशी फिटतील.


डॉ. आर. बी. पाथरकर

तुंगभद्रा सोसायटी, परमहंस नगर, कोथरुड, पुणे ४११ ०३८.

# रामनामाची अपरिमित शक्ती

**सौ. विजया प्रभुणे**

*बी.ए., बी.एड्. (संस्कृत स्पेशल), राष्ट्रभाषा पंडित, काही वर्षे - शाळेत नोकरी. विविध मासिकांतून वैचारिक, चिंतनात्मक कौटुंबिक लेखन. दैनिक प्रभातमध्ये संतजीवनावर अखंड लेखमाला.*

सातारा जिल्ह्यात माणगंगेच्या कुशीत दडलेले गोंदवले हे छोटेसे गाव ! तेथे नामस्मरण भक्तीची महती सांगणारे एक थोर नाममहर्षि होऊन गेले, त्यांचे नाव श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज !

श्रीसमर्थ रामदासांनी कीर्तन, श्रवण, अर्चन, दास्य, सख्य आत्मनिवेदन आदि जे नवविधा भक्तीचे वर्णन केले आहे त्यातील जनसामान्यांना सहज रुचणारा आणि पेलणारा नामस्मरण भक्तीमार्ग श्रीमहाराजांनी सर्व लोकांना सांगितला. इतकेच नव्हे तर स्वतः आमरण आचरून दाखवला.

वाईचे श्री. देशपांडे हे श्रीमहाराजांचे एकनिष्ठ शिष्य आणि नामोपासक होते. एकदा ते गोंदवल्याला श्री गुरुचरणांचे दर्शन घ्यायला आले. त्यांचा एक नियम होता. यायचे आपल्या पायाने पण गावी जायचे ते सद्गुरुंच्या परवानगीने ! आठ-पंधरा दिवस ते श्री गुरुंजवळ राहिले. अखंड नामस्मरणाचा आनंद लुटला; आणि एके दिवशी रात्री साडेआठच्या सुमारास बैलगाडी जुंपून, त्यात आपले सामान भरून श्रीमहाराजांना वंदन करण्यासाठी थोरल्या राममंदिरामध्ये आले. गौर वर्ण कांती, मूर्तिमंत शांती, दयाक्षमा शोभे चित्ती रामनामी रंगला असा हा थोर महात्मा श्रीमहाराज सुहास्य वदनाने त्यांना सामोरे आले आणि म्हणाले - ''काहो देशपांडे निघालात ? अरे हो पण मला जरा एक काम आहे तेवढे मी करून येतो. मग तुम्ही वाईला निघालात तरी चालेल बरं का ?'' असे म्हणून श्रीमहाराज तेथून झटकन निघाले व लगबगीने निघून गेले. श्री. देशपांडे रामाच्या मंदिरात श्री गुरुंची वाट पहात उभे राहिले. नऊ, दहा, अकरा घड्याळाचे काटे पुढे सरकतच होते. श्रीगुरु परतण्याचे लक्षण दिसेना म्हणून श्री. देशपांडे यांनी रामनामस्मरण करण्यास सुरुवात केली. त्या नामस्मरणात ते इतके तल्लीन होऊन गेले की रात्र सरली, झुंजुमुंजु झाले, पूर्व दिशेला अरुण देवता जणू गुलाल उधळू लागली. एवढ्यात श्रीमहाराज आपल्या शेजघरातून बाहेर आले आणि डोळे मिटलेले, हात जोडलेले आणि मुखाने अखण्ड नामस्मरण अशा विदेही अवस्थेत उभे असलेल्या देशपांडे यांना भानावर आणले आणि म्हणाले - ''अरेरे, रात्रभर तुम्ही असेच उभे का ? मी परत येण्याचे अगदीच विसरून गेलो. तुम्हाला रात्रभर उभे राहण्याचा त्रास झाला.''

नामस्मरण भक्तीच्या आनंदाच्या डोहात अवगाहन करणारे देशपांडे श्रीगुरुंना हसत म्हणाले - ''नाही, नाही. महाराज मी रात्रभर भक्तीसुखाच्या आनंदाचा आस्वाद घेत होतो. त्रास होण्यासाठी शरीरक्लेश जाणवण्यासाठी माझे मन देहबुद्धिवर होतेच कुठे ?'' हे वाक्य ऐकले आणि श्रीमहाराजांच्या चेहऱ्यावर आनंदाची प्रभा पसरली. मनात म्हणाले - ''शिष्य असावा तर असा ! माझे सद्गुरु श्रीतुकामाय यांची मला आज्ञाच आहे.''

''उभारूनी तू राममंदिरे । रामनाम तू जनास दे रे । जनी मनी या भजन भिनावे हेच तुझे या जगती काम ॥'' श्रीराम जयराम जयजयराम. ते सांगत मनाला उलटे केले तर काय होते उरते ते नाम. श्रीरामनामात अपरिमित अशी शक्ती आहे जी देहबुद्धिचा लय करून मनाला विदेही अवस्थेत नेते आणि अक्षय अशा उपाधिरहित आनंदाचा आस्वाद मिळवून देते. म्हणूनच ते सांगतात - 'देह देवाचे मंदिर आत आत्मा परमेश्वर, जशी उसात हो साखर तसा हृदयी असे ईश्वर' ही सातत्याने जाणीव ठेवून शक्य तेवढे अखंड नामस्मरण करा. श्रद्धा हा या स्मरणभक्तीचा पाया आहे. 'नामापरते न सत्य मानावे' कारण नाम हे ईश्वराच्या सगुण रूपाकडून निर्गुणाकडे नेणारे एक प्रभावी साधन आहे. श्रीसद्गुरु कळकळीने सांगतात - 'सोडू नका नाम । धरू नका काम । नाही नाही नेम आयुष्याचा ।'

'विश्वास या नामाचा जगी वाढविला' हे यांचे जीवितकार्य आहे. भवभार फार झाला आणि जीव तळमळू लागला त्या वेळी श्रीसमर्थांचाच हा अवतार सगुणरूप घेऊन या पृथ्वीतलावर धावत आला.

श्रीमहाराज वाट्याला आलेले सुखोपभोग घेऊ नका असे कधीच म्हणत नाहीत. आनंदाने भोगांचे सेवन करा पण तेच सर्वस्व मानू नका. आळस, भय, द्वेष हे दुर्गुण आपल्या मधून हाकलून लावा. मग मनी मानसी उरेल तो आनंद. फक्त निखळ आनंद ईश्वराचेच स्वरूप 'तैरनेको लीनता आणि डुबनेको अभिमान' या कबीरजींच्या सांगण्याप्रमाणेच श्रीमहाराज म्हणतात 'देनेको अन्नदान' - सर्वात श्रेष्ठ दान 'लेनेको हरिनाम' - हे मानवी जीवनाची सार्थकता घडविणारे विशेष आहेत. 'सदाचारेण सर्वेषाम् शुद्धं भवति मानसम् । निर्मलं च विशुद्धं च मानसं देवमंदिरम् ।' याची आठवण ठेऊन कपटाचरण सोडावे स्वान्तःकरण शुद्ध ठेवून सतत गोड बोलावे आणि मन कोणाचे कधी न दुखवावे हे श्रीगुरुंचे शब्द अमृताने भरलेले आहेत.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रयत्नवाद सोडू नका. यत्न कसून करीन मी ! यश आणि अपयशाची जबाबदारी मी ईश्वरावर सोपवेन कारण सर्व सत्ताधारी आणि कर्ताकरविता हा श्रीरामच आहे. या त्यांच्या शब्दात कर्तृत्व, अहंकार टाकून द्या ही सूचना नाही काय ? 'जरी मी कर्ता म्हणविसी तरी तू कष्टी होसी जर राम कर्ता म्हणविसी

तरी तू पावसी समाधान !' राम कर्ता म्हटल्यावर अपेक्षापूर्ती किंवा अपेक्षाभंग या द्वंद्वापासून श्रीगुरु आपल्याला अलगदपणे बाजूला करतात. कारण त्यांचे शब्द आहेत 'मानावा राम सर्वदा कर्ता'.

एकादी लहान मूलगी चूल-बोळकी घेऊन खेळ खेळण्यात दंग असते. पण आईची हाक येताच तो सर्व पसारा टाकून आईकडे धावत जाते. इहलोकातील आपला संसार हा इतक्या अनासक्त बुद्धीने करावा. कारण इहलोकातील धर्मशाळेत तात्पुरते उतरलेले पांथस्थ आहोत.

'आम्ही सर्वही प्रवासी जाणार दूर देशी ।
तो मार्ग दाखवाया अधिकारी रामराया ।।'

संतुष्ट मनाने प्रपंच करा पण ती प्रभुसेवा समजून 'खेळा ऐसा प्रपंच मानावा' असे श्रीसद्गुरु महाराजांचे सांगणे आहे. आनंदाच्या उर्मि आपल्या मनोसागरात सतत उठाव्यात. अक्षय, अविनाशी आनंदाचे अधिकारी आपण व्हावे असे वाटत असेल तर रामनामावर श्रद्धा ठेऊन नित्य तुम्ही नामगायनी जागा - असे ते म्हणतात.

माणसाचा सर्वात मोठा शत्रू अभिमान जो त्या माणसाची अधोगती घडवतो. त्याचे समूळ उच्चाटन अखण्ड नामस्मरण केल्याने होते कारण 'नामी श्रीरामाच्या माया माऊलीची ध्यानी श्रीरामाच्या धार अमृताची'

राज्याधिकार येवो किंवा जावो समस्त धनमान म्हणजे सुखाच्या अत्युच्च शिखरावर पोहचलात किंवा प्रसंगी दुःखाचा कडेलोट झाला तरी मनाचे समाधान ढळू देऊ नका आणि सुख-दुःखाबद्दल समत्व बुद्धी निर्माण होते, समाधान कधीही भंगत नाही अशी अवस्था अखण्ड नामस्मरणानेच प्राप्त होते

'ओठातून या नाद उमटतो, नादनिर्मिती, मंगलधाम ।
श्रीराम जयराम जयजय राम'

'प्रेमात राम रमतो प्रेमाला मोल ना जगामाजी । हाचि सुबोध गुरुंचा गुरुरायाला तहान प्रेमाची ।'

याचाच अर्थ श्रीमहाराजांना सगुण श्रीरामाची प्रेमस्वरूपा भक्ती हीच अभिप्रेत असली पाहिजे.

आणि म्हणूनच त्यांचे एक निष्ठावन्त भक्त आपल्या पद्यात म्हणतात,

'जो जाई एकवार (गोंदवल्याला) तो विसरे घरदार
त्यासी देई नामसार - ऐसा नाही पाहिला ।

श्री ब्रह्मचैतन्यासारिखा नाही पाहिला' म्हणून त्यांचे वर्णन केले जाते - 'ऐसा दीनदयाळ सांग कोण दुजा, घोर कलीमाजी मोक्ष केला सोपा । दीनदास म्हणे राम राम बोला' आणि श्रीगुरु दयाघन श्रीरामालाच म्हणतात - 'किती विनवू तुला रामा दयाघना किती आळवू तुला' - अरे माझ्या सर्वच लोकांना नामस्मरणाची प्रेरणा दे ! आणि सद्गुरुंना वंदन करून आपण मनाचीही धारणा ठेवू या.

'सर्व सोपवा त्यांना निरोप द्या दुःखांना ।
सत्त्वगुणाच्या क्षितिजावरती नामस्मरा ।
तुम्ही नाम स्मरा ।'

सौ. विजया प्रल्हाद प्रभुणे
१/१९ ब, श्रीमान् सोसा., गजानन महाराज मठाच्या पुढे,
कर्वेनगर, पुणे - ४११ ०५२.

# करुणामृत सिंधू

**प्रा. सौ. प्रभाताई टेंभेकर**

*एम. ए., अर्थशास्त्र. विवाहानंतर १६ वर्षांनी एम. ए. तृतीय क्रमांक. निवृत्त प्राध्यापिका, धरमपेठ महाविद्यालय, नागपूर. काव्य रचण्याचा छंद. अध्यात्माकडे ओढा. यज्ञशिखा, वं. मावशी केळकर यांच्या जीवनावर आधारीत काव्य कुसुमांजली, समर्थदर्शन. दिव्यत्वाची जेथे प्रचिती- स्वामी विवेकानंद जीवनावर आधारित रा. स्वं. संघ आद्य संस्थापक डॉ. हेडगेवार यांच्या जन्मशताब्दी प्रीत्यर्थ वाहिलेली - गीत सुमानांजली हे काव्य संग्रह प्रकाशित. वरील गीतांचे संगीत कार्यक्रम सादर.*

जर्मन तत्त्वज्ञ नीत्शे याने मानव हा पशू व देव यांना जोडणारा एक पूल आहे, असे म्हटले आहे. मानवी जीवन ही एक यात्रा आहे. परंतु ती द्विमुखी आहे. पशू व देव यात माणूस मध्ये आहे. तो पशुत्वाकडे म्हणजे केवळ विषयोपभोगातून हीनत्वाकडे जाऊ शकतो किंवा आपल्या जीवनाचे ध्येय ओळखून ईश्वराकडे जाऊ शकतो. आपण जेथून आलो तेथे जाण्याची क्षमता फक्त मानवी देहातच आहे. असे असून इंद्रियांच्याच आधीन होऊन 'नरेचि केला हीन किती नर' या उक्तीनुसार तो अधोगतीच्या मार्गाने आपला उलटा प्रवास चालू ठेवतो. या उलट 'नर करनी करे तो नर का नारायण बन जाय' ही अवस्था म्हणजेच 'यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम' अशा परमपदाची प्राप्ती करून घेऊ शकतो. त्यामुळे मनुष्य जन्माचे सार्थक होईल अशा या परमार्थरूप प्रवासाची योग्य दिशा दाखविण्याचे महान कार्य संत किंवा सद्गुरु करीत असतात. श्रीज्ञानेश्वर माऊलीने म्हटल्याप्रमाणे 'मावळवीत विश्वाभास । नवल उदेला चंडांशु ।।' म्हणजेच या दृश्य विश्वावर सामान्य जीवाचा जो खरेपणाचा भास असतो तो नाहीसा करून त्याला आत्मदर्शन घडवून आणणारा हा और सूर्यच असतो. अशा या सत्पुरुषाचे मुख्य लक्षण 'सदा स्वरूपानुसंधान । हेच साधूचे मुख्य लक्षण' असले तरी त्यांचे अंतःकरण करुणेने काठोकाठ भरलेले असते. म्हणूनच 'नाना सद्विद्येचे गुण । त्याहीवरी कृपाळूपण हे मुख्य सद्गुरुंचे लक्षण । जाणिजे श्रोती ।।' असे श्रीसमर्थ सद्गुरुचे वर्णन करताना म्हणतात. योगी अरविंदांनी त्यांना The divine and the human म्हटले आहे. श्री. कृष्णमूर्ती पण 'He dispels darkness out of compassion' असेच म्हणत. संतांच्या कृपाळुपणाची आपण व्यवहाराच्या पातळीवरून कल्पनाच करू शकत नाही. संतांना माऊली हे संबोधन यामुळेच दिले जाते. 'ऐसी कळवळ्याची जात । करी लाभाविण प्रीत ।' असे संत तुकाराम म्हणतात. ते अगदी यथार्थ आहे.

व्यवहारात आईचे आपल्या मुलांवर आत्यंतिक प्रेम असते. परंतु ते भौतिक स्तरापुरते मर्यादित असते. सद्गुरु मात्र ऐहिकापेक्षाही पारलौकीक कल्याणाचा विचार करतात. तसेच लौकीक आई ही या जन्मापुरतीच असते तर सद्गुरु माऊली ही जन्मोजन्मीची आई असते. शिष्याला एकदा आपला म्हटल्यानंतर त्याला ती कधीच अंतर देत नाही.

महाराष्ट्र भूमी ही तर संतांचे आगरच. याच भूमीत सातारा जिल्ह्यातील गोंदवले या ग्रामी श्रीब्रह्मचैतन्य महाराजांच्या रूपाने साक्षात् करुणाच जन्माला आली होती. त्यांचे अवघे जीवन करुणेने व्यापले होते. महाराजांचे एक अंतरंगातील थोर शिष्य श्रीब्रह्मानंद हे महाराजांचे लक्षण एकाच शब्दात सांगताना 'दयासिंधु' असेच म्हणत असत. या करुणेचा मूळ स्त्रोत त्यांच्या प्रेमस्वरूपात दिसून येतो. त्यांचे भगवंतावर इतके उत्कट प्रेम होते की त्यांच्या विरहाच्या कल्पनेने साक्षात् श्रीराममूर्तीच्या लोचनातून अश्रू ओघळले होते. असेच प्रेम ते मानवजातीवर करीत इतकेच नव्हे तर सर्व प्राणिमात्रांवर त्यांचे अतिशय प्रेम होते. त्यांना सोडून जायला मुके प्राणीसुद्धा तयार होत नसत. म्हणूनच पू. बाबा बेलसरे एका प्रवचनात म्हणाले होते की, महाराजांना लोक नामावतार म्हणतात आणि ते बरोबरही आहे. पण त्यापेक्षा त्यांना प्रेमावतार म्हणणे जास्त संयुक्तिक होईल.

नामावतार म्हणण्याचे कारण असे की ते जन्माला आले ते नामरसायन घेऊनच. बालपणापासून त्यांना भगवंताच्या दिव्य नामाचे वेड होते. त्यांचे म्हणणे असे की अखंड आनंद किंवा कधीही भंग न पावणारे समाधान हेच आपले खरे स्वरूप आहे. हा आनंदाचा अमृतकुंभ म्हणजेच भगवंत आपल्या हृदयातच विराजमान आहे. परंतु मायेच्या पटलामुळे जीवाला त्याचा सहजच विसर पडतो आणि या दृश्य विश्वात तो रमून जातो. परिणामतः जेथे खरे सुख नाही तेथे ते शोधणे या भ्रमजालात तो सापडतो. 'सुखसुख म्हणता हे दुःख ठाकूनी आले' अशी त्याची अवस्था होते व खऱ्या आनंदाला तो पारखा होतो. त्यासाठी भगवंताचे नाम मनापासून घेऊन त्याला वश करून घ्यावे असे ते आर्जवाने सांगत.

'स्मरण देवाचे करावे । अखंड नाम जपत जावे । नामस्मरणे पावावे । समाधान ।।' असे श्रीसमर्थ सांगतात. म्हणजेच खरे समाधान किंवा आनंद भगवंतापाशीच आहे. मनुष्याची सर्व धडपड ही आनंद प्राप्तीसाठीच असते. पण प्रपंच हा मुळातच अपूर्ण त्यातून त्याला शाश्वत आनंद व सुख कसे मिळणार ? म्हणूनच 'या संसारी सुख झाले। ऐसे देखिले ना ऐकिले', अशी ग्वाहीसुद्धा श्रीसमर्थच देतात किंवा संत चोखोबांच्या शब्दात सांगायचे तर प्रपंच हा सासरसारखा. तिथे दुःख-कष्ट फार. मग सुख कशात आहे ? तर 'चोखा म्हणे नाम। जपे दिनदिशी । येणे सदासुखी होसी जना ।।' म्हणजेच नाम हीच खऱ्या सुखाची गुरुकिल्ली होय. श्रीमहाराज म्हणत की आपले प्रापंचिक सुख आहे ते दिसायला वरवर बाळसेदार दिसते. परंतु ती सूज आहे. ते काही खरे बाळसे नाही. म्हणूनच आपल्याला प्रपंचात सुख लाभत नाही. आज विज्ञानाने अनेक सुधारणा होऊन देहसुखात पुष्कळ वाढ झाली.

पण मानव सुखी झाला नाही. म्हणूनच दुःखरूप संसारात आनंदाचा शोध घेणे हे अज्ञानच ते घालविण्यासाठी नामाचा नंदादीप देऊन त्यांचे जीवन उजळून टाकण्यासाठी महाराजांनी आपले संपूर्ण आयुष्य वेचले.

प्रापंचिक जीवनात लोभ आणि मोह यांची जबरदस्त खेच असते. शोक, भय, चिंता आणि मोह याने सामान्य माणसाचे मन व्याप्त होते. तरीपण या मनाला सुधारण्याचा मार्ग माणूस शोधीत नाही. श्रीमहाराजांनी करुणेच्या पोटी प्रापंचिकाला हाताशी धरून त्याला आत्मकल्याणाच्या मार्गाला लावण्याचा अहर्निश खटाटोप केला.

वास्तविक विषयाच्या कर्दमात आकंठ बुडलेल्या जीवाला वर उचलून स्वानंदरूपी कमलावर आरुढ करण्याचे कार्य वाटते तितके सोपे नाही. तरीपण 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती' या न्यायाने सामान्य जीवाच्या उद्धाराची त्यांना मनापासून तळमळ होती. त्यांच्या बाबतीत बोलताना महाराजांचे एक परमभक्त श्री. भाऊसाहेब केतकर म्हणाले होते की, जीवाच्या उद्धाराची त्यांची तळमळ पाहूनच मी थक्क झालो. अशा या तळमळीतूनच प्रापंचिकांच्या मर्यादा लक्षात घेऊन विशेषतः त्यांची प्रपंचातील आसक्ती बघूनच त्यातून सोडविण्यासाठी नामस्मरणाचा सर्व संतांनी अनुसरलेला व स्वानुभवाने सिद्ध असलेला मार्ग श्रीमहाराजांनी त्यांना दाखविला आणि अक्षरशः लाखो लोकांना नामाचे वेड लावले. 'जयासी वाटे सुखचि असावे । तेणे रघुनाथ भजनीं लागावे ॥' हा श्रीसमर्थांचा आदर्श पुढे ठेवून प्रसंगी मान-अपमान गिळून, लोकांची निंदा, कुचेष्टा सोसून समाजातील निरनिराळ्या स्तरातील लोकांची मने अतिशय प्रेमाने जिंकून त्यांना भगवंताकडे वळविण्याचा प्रयास केला. 'जेथे नाम तेथे माझे प्राण' असे आश्वासन देऊन नामाची निष्ठा वाढविली. त्यांच्या वागण्यात एक खुबी होती. सर्वांशी त्यांचा व्यवहार समान असे. त्यांचे बोलणे फारच गोड व कळकळीचे असे. त्यात प्रपंचात राहूनच परमार्थ कसा साधायचा आणि राम आपलासा कसा करून घ्यायचा यावर भर असे. हे सांगताना त्यांच्या वाणीत अतिशय आर्जव आणि नम्रता होती. म्हणूनच येवढा मोठा लोकसंग्रह ते करू शकले. श्रीमहाराजांजवळ कायम राहणारी काही कुटुंबे होती. गरीबांविषयी त्यांना विशेष कळवळा होता. पुष्कळ गरीब लोकांचे संसार ते स्वतः चालवित. संकटकाळी आर्ततेने हाक मारणाऱ्यांकडे ते आधी धाव घेत. अनेकांचे अपराध ते पोटात घेत व पुन्हा तसे न करण्यास बजावीत. लोकांचे दोष त्यांचे अंतःकरण न दुखविता त्यांना दाखवून देण्याची कला त्यांच्याजवळ होती. त्यामुळे त्यांचा राग न करता केवळ प्रेमाच्या जोरावर काम, क्रोध, मत्सर, द्वेष, लोभ, चौर्य इत्यादी दुर्गुण त्यांनी सोडवून दाखविले.

तात्पर्य श्रीब्रह्मचैतन्य महाराज हे लोक विलक्षण महान संत होते. सामान्य माणसात ते इतके मिसळून जात की त्यांच्या संतत्वाविषयी सकृद्दर्शनी कुणाला कल्पनाही येत नसे. वरवर पाहणाऱ्याला त्यांच्या अंतःकरणाचा ठाव लागत नसे. 'अवजानन्ति मां मूढां मानुषीं तनुजाश्रितम्' असे श्रीकृष्ण भगवान स्वतः गीतेत सांगतात ते बरोबरच आहे. महाराजांच्या रूपाने अज्ञान अंधःकारात चाचपडणाऱ्या जीवांना भगवंताच्या नामाचा दिव्य प्रकाश देण्यासाठी निर्गुण निराकार असे परमात्म स्वरूपच प्रकट झाले होते. असे असले तरी त्यांचे वागणे इतके सहृदय होते की लोकांना ते आपल्यातीलच वाटत. येवढेच काय त्यांच्या साधुत्वाची परीक्षा घ्यायला आलेले लोकसुद्धा त्यांचेच होऊन जात.

सद्गुरुंचा अनुग्रह प्राप्त झाल्यानंतर तीर्थयात्रा वगैरे करून महाराज जेव्हा प्रथम इंदोरला आले तेव्हाचा प्रसंग तर खूपच बोलका आहे. त्या वेळी काही काळ महाराज उन्मनी अवस्थेतच होते. तिथे एका मारुतीच्या मंदिराजवळ ते अशाच अवस्थेत बसले असताना त्यांना तेथील श्री. भैय्यासाहेब इनामदार या सात्त्विक सश्रद्ध व्यक्तीने बघितले व आपल्या बागेत येऊन राहण्याची विनंती केली. भैय्यासाहेबांची पत्नी सौ. जीजीबाई यांना मात्र बागेत आलेली व्यक्ती ही कोणीतरी ढोंगी साधू असावा अशी शंका आली. त्यांची परीक्षा घेण्याचे ठरवून तिने लाल तिखटाचे लाडुसारखे गोळे केले व श्रीमहाराजांना आणून वाढले. ते संपूर्ण लाडू खाऊन महाराज म्हणाले, 'माय लाडू फार सुंदर झालेत अजून असल्यास वाढ.' पण येवढ्या प्रचितीनेसुद्धा त्यांच्या थोरपणाची जाणीव तिला होऊ शकली नाही. तिने दुसरे दिवशी पेटलेले रसरशीत निखारेच त्यांच्या पानात वाढले व काय होतय् ते बघू लागली. पाहते तो काय ? महाराजांनी एक एक निखारा चिमट्याने उचलून तोंडात टाकून खाण्याचा सपाटा लावला. मग मात्र ती भयाने कापू लागली. आपल्या कृतकर्माचा तिला पश्चात्ताप झाला व ती कृतापधाराची क्षमा मागू लागली. त्या वेळी महाराजांनी अत्यंत करुणामय दृष्टीने तिच्याकडे बघितले व तिला अभयदान दिले. त्यांचे कारुण्यरूप पाहून ती विरघळली व ती शरण आली. पुढे ती महाराजांची निःस्सीम भक्त झाली.

श्रीमहाराजांच्या बालपणीचीच गोष्ट घ्या ना. ते पाच वर्षांचे असताना त्यांच्या आजोबांनी त्यांना प्रश्न केला की, 'गणू, तुला जर हंडाभर सोन्याच्या मोहरा दिल्यात तर तू काय करशील ?' त्या बालवयातही महाराजांनी जे उत्तर दिले त्यावरून त्यांच्या ठिकाणी कारुण्य कसे उपजतच होते याचा प्रत्यय येतो. महाराज म्हणाले, 'अंध, पंगू, गरीब यांना मी मोहरा वाटून टाकीन.' आजोबांनी पुन्हा विचारले, 'तुला राजा केले तर काय करशील ?' त्यावर त्यांनी तात्काळ उत्तर दिले की, 'माझ्या राज्यात मी अन्नछत्र चालवीन व गावात कुणी उपाशी राहू देणार नाही.' दीनदुःखितांविषयीची ही कळकळ शेवटपर्यंत त्यांच्या प्रत्येक कृतीतून अशी व्यक्त होत असे.

कऱ्हाड येथील दुसंगे नावाची एक विधवा स्त्री महाराजांकडे आली. तिच्याबरोबर कुसंगतीने व्यसनी बनलेला तिचा २० वर्षांचा मुलगा होता. महाराज त्याच्याशी अत्यंत प्रेमाने वागत. त्याच्या वर्तनात थोडी सुधारणा होऊ लागली. पुढे ती स्त्री वारली. त्यापूर्वी तिने मुलाला महाराजांच्या पदरात टाकले व याला सांभाळा असे बोलून प्राण सोडला. महाराजांनी त्याचा अतिशय प्रेमाने सांभाळ केला. महाराज त्याला सतत आपल्याबरोबरच वागवित. जरा दिसला नाही की त्याला प्रेमाने हाक मारून आपल्याजवळ बोलावून घेत. परंतु एकदा एकादशीला सर्व लोक भजनात तल्लीन असताना तो तिथून निसटला. भजन आटोपल्यावर

प्रसाद वाटताना तो नाही हे लक्षात येताच महाराजांनी स्वतः त्याचा शोध घेतला, तेव्हा तो ओढ्याच्या काठी एका स्त्री समवेत निजलेला आढळला. त्याला त्या अवस्थेत पाहून त्यांचे मन द्रवले. येवढा चांगला नरदेह प्राप्त झाल्यावर तो असा वाया घालवणार. अरेरे ! असे मनात येऊन काही न बोलता आपली कफनी काढून त्याच्या अंगावर टाकून हळूच तेथून निघून गेले. या काही न बोलण्याने खरे काम झाले. जाग आल्यानंतर आपल्या अंगावरील महाराजांची कफनी पाहून तो मुलगा वरमला. त्याच्या जीवाचे पाणी पाणी झाले. लगेच ओढ्यावर स्नान करून मंदिरातील महाराजांच्या खोलीसमोर तो जप करीत उभा राहिला. महाराजांनी त्याला गिरनार पर्वतावर जाण्यास सांगितले. पुढे तो नैमिषारण्यात गेला व परमार्थ मार्गात उच्च पातळीवर पोहचला. श्रीमहाराज म्हणायचे की मला व्यसनी माणसे आवडतात. त्यांची व्यसनावरची निष्ठा भगवंताकडे वळविली की काम झाले. 'माझे गांजाचे व्यसन तुम्ही पुरवाल तर मी वाटेल तितके नाम घ्यायला तयार आहे.' अशी अट घालणाऱ्या औंध येथील एका सत्शील, उदार व सत्यभाषी अशा बाळंभट गुरुजींचे व्यसन महाराजांनी त्याला स्वतः गांजा पुरवून मोठ्या खुबीने सोडवले आणि त्याला नामाला लावले.

साऱ्या जगाने तुला सोडले तरी मी तुला सोडणार नाही. येवढेच नव्हे तर रामाने जरी तुला टाकले तरी मी तुला अंतर देणार नाही' महाराजांच्या रूपाने जणूकाही करुणाच त्यांच्या मुखातून स्त्रवत होती. कर्नाटकातील गदग येथे घडलेला हा प्रसंग. महाराजांचा एक शिष्य मनापासून नामस्मरण करीत असे. त्याची महाराजांवर नितांत निष्ठा होती. प्रारब्धवशात् त्याची परिस्थिती पालटली. तो अतिशय व्यसनी बनला. त्याचे नामही सुटले. आर्थिक परिस्थितीपण खालावली. लोकांच्या उपेक्षेचाच तो विषय बनला. एकदा महाराज गदगला आल्याचे त्याला कळले. ज्या घरी महाराज उतरले होते, त्या घराच्या फाटकाशी हा जाऊन बसला. आत येण्याची त्याची हिम्मत झाली नाही. महाराजांनी मात्र तो आल्याचे जाणून त्याला आत बोलावून घेतले व वरील उद्गार काढले. ह्या प्रसंगाने तो पार विरघळला. त्याने महाराजांच्या पायाशी लोटांगण घातले. महाराजांनी त्याला पोटाशी घेतले. त्याला पुन्हा नामस्मरण करण्याचा उपदेश केला. पुढे तो साधकच बनला. आईसुद्धा ज्या अवस्थेत आपल्या मुलाला जवळ करणार नाही त्या ठिकाणी महाराजांनी आपल्या प्रेमापोटी त्याला जवळ केले. असे किती प्रसंग सांगावेत ?

दुष्काळाचा प्रसंग तर अगदी थक्क करणारा आहे. इ. स. १८७६ साली दुष्काळाने अगदी कहर केला होता. लोकांची उपासमार होऊ लागली होती. त्या वेळी सरकारनेसुद्धा काही दुष्काळी कामे काढली होती. पण तेवढ्याने निभण्यासारखी परिस्थिती नव्हती. या वेळी महाराजांच्या अंतःकरणाला पाझर फुटला नसता तरच नवल. त्यांनी आपल्या शेतात जवळ जवळ दीडशे बैलगाड्या दुष्काळी कामावर लावल्या. एका शेतातून माती काढून ती दुसऱ्या शेतात टाकणे असे कामाचे स्वरूप होते. काम करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला एक भांडे भरून आमटी व एक भाकरी दिली जाई. स्वतः महाराज भाकरीचे वाटप करीत. आसपासच्या भागातून असंख्य लोक कामावर येऊ लागले. सर्वांसाठी त्यांनी मुक्तद्वार ठेवले होते. वृद्ध मंडळींना ते फुकट धान्य देत. शिवाय मंदिरात जो कोणी रोज दहा हजार रामनामाचा जप करी, त्यालाही जेवायला मिळे. भुकेने कासाविस झालेल्या लोकांच्या त्या नजरा पाहून महाराजांचे डोळे पाणावित. बालपणात आजोबांना दिलेले उत्तर खरे करून ते दीनांचे खरे कैवारी बनले. औंधचा राजा त्या वेळी गोंदवल्यावरून जात असता येवढा प्रचंड जनसमुदाय पाहून थबकला व येवढ्या लोकांना कामाला लावणारा हा राजा आहे तरी कोण याची चौकशी करू लागला. महाराजांचे नाव कळल्यावर त्यांचे दर्शन घेऊनच तो पुढे गेला. त्यानंतर वीस वर्षांनी पडलेल्या दुष्काळातदेखील महाराजांनी कामे काढून लोकांची उपासमार टाळण्याचा प्रयत्न केला. अशा रीतीने केवळ व्यक्ती पुरते नव्हे तर सामाजिक स्तरावरसुद्धा त्यांचे कार्य नजरेत भरते. पर्यायाने लोकांच्या मुखी घास देतानाच नाम देण्याचे कार्य व त्या अनुषंगाने भगवंताचे अनुसंधान ठेवण्यास लोकांना प्रवृत्त केले. कारण नाम हा तर त्यांचा प्राणच होता. त्यासाठीच त्यांचा जन्म होता.

सज्जनांशी तर कुणीही चांगला वागेल. परंतु खटनटांशीसुद्धा प्रेमाचा धागा जोडून महाराजांनी त्यांना दुष्ट प्रवृत्तीपासून काढून भगवंताकडे वळविण्याचे प्रयास केले. यातच दरोडेखोर, चोर यांच्याशी सुद्धा प्रेमाने वागून त्यांना सन्मार्गावर आणले. एकदा अबूच्या जंगलात महाराज फिरत असताना त्यांना भिल्लांच्या टोळीने गाठले. त्यांचे धष्टपुष्ट व रुबाबदार शरीर पाहून त्यांना त्रास द्यायला सुरुवात केली. परंतु त्यांची शांत आणि तेजस्वी मुद्रा बघून ही व्यक्ती सामान्य दिसत नाही हे जाणून एका वयस्क भिल्लाने अड्ड्यापर्यंत येण्याची त्यांना विनंती केली. तिथे गेल्यावर त्यांना फलाहाराचा आग्रह केला. महाराजांनी त्याला नकार दिला तेव्हा काही उनाड भिल्लांनी एक दांडगट वांझ गाय त्यांच्यासमोर आणून उभी केली व एक मडके देऊन त्या गाईचे दूध काढून पिण्यास सांगितले. महाराजांनी प्रेमाने तिच्या पाठीवर हात फिरविताच ती गाय हंबरू लागली. ती त्यांचे अंग चाटू लागली व तिला पान्हा फुटला. तिची धार काढून महाराज पोटभर दूध प्यायले. ज्यांनी महाराजांसमोर ती गाय आणून ठेवली होती त्यांच्या तर काळजाचे पाणीच झाले. आपल्याला आता शिक्षा होणार अशी त्यांची खात्री झाली. वृद्ध भिल्लाने सर्वांच्या वतीने महाराजांची क्षमा मागितली. महाराज तर साक्षात् क्षमामूर्तीच होते. त्यांच्या विनंतीनुसार त्यांनी सर्वांना अनुग्रह देऊन रामोपासना सांगितली व अशा दुष्कर्मापासून परावृत्त केले. असेच एकदा वाई येथील चोरांना मुद्देमालासकट पोलिसांनी पकडले व सातारा येथील कलेक्टरकडे आणले. पण तो फिरतीवर असल्याने चोरांना त्याच्या मागोमाग गोंदवल्यास आणले. नदीच्या बाजूने हा सर्व ताफा येताना महाराजांनी पाहिला. त्यांनी चौकशी केली. तहान भुकेने त्यांचे ते सुकलेले चेहरे पाहून महाराज द्रवले. नियमाविरुद्ध असले तरी जबाबदारी स्वतःवर घेऊन त्यांनी चोरांच्या बेड्या काढण्यास सांगितले व सर्वांना पोटभर जेऊ घातले. त्यांना आपल्या कृत्याचा पश्चात्ताप

झाला तेव्हा श्रीरामाच्या पायावर डोके ठेवून पुनः असे कृत्य करणार नाही, हे वचन त्यांच्याकडून घेतले व आशीर्वाद देऊन त्यांची सुटकाही करवून घेतली.

मानवजातीवर महाराजांनी प्रेम केलेच पण त्यांचे व मुक्या प्राण्यांचे परस्परप्रेम विलक्षण होते. एका भक्ताने त्यांना एक उमदा, शुभ्र सुंदर घोडा अर्पण केला होता. बताशा त्याचे नाव. तो भारी खट्याळ होता. पण महाराजांचा प्रेमळ हात पाठीवर फिरताच तो फुरफरू लागे. इतरांना तो मुळीच दाद देत नसे. एकदा शाहू चिवटे या शिष्याने महाराजांना विचारून तो घोडा आपल्या घरी नेला. पण त्या प्राण्याने तीन दिवस दाणापाण्याला स्पर्शही केला नाही. येवढंच नव्हे तर त्याच्या डोळ्यांतून सारखी आसवे गळत होती. केवढे हे अलौकिक प्रेम ! शेवटी त्यांनी तो घोडा महाराजांना परत आणून दिला. त्याला त्यांनी थोपटताच तो शांत झाला. तेव्हापासून सर्वांना त्याचे महत्त्व पटले. गोंदवल्याला समाधी मंदिरासमोर बताशा घोड्याचीही समाधी आहे.

गायींवर तर महाराजांचा खूपच जीव होता. सर्व प्राण्यांमध्ये गायीमध्ये जास्त मानवता आहे, असे ते सांगत. कितीतरी गायी कसायांच्या तावडीतून सोडवून त्यांनी विकत घेतल्या होत्या. कसाई गायी विकत घेणार असे कळले की त्यांच्या डोळ्यांना पाणी येई व स्वतः तिथे जाऊन वाटेल ती किंमत देऊन गायी विकत घेत. गोंदवल्याला गोशाळाच तयार झाली. महाराज स्वतः तिथे झाडलोट करीत. गायींची सेवा करीत.

एका गृहस्थाने महाराजांना एक लंगडी गाय दिली. तिच्यावर त्यांचे अतिशय प्रेम होते. पण काही दिवसांनी तिचा मालक तिला परत न्यायला आला असता महाराज गायीला म्हणाले, 'गंगे, तुला न्यायला आले आहेत बरं का. तेव्हा त्यांच्याबरोबर परत जा. तिचे दावे सोडून त्यांच्या हातात देण्याचाच अवकाश, गंगीने जोरात हंबरडा फोडला. तिच्या डोळ्यांत अश्रू तरळले. तिची दीन नजर पाहून महाराजांना गहिवरून आले. शेवटी तिला मी मुलीप्रमाणे सांभाळीन असे, असे त्या गृहस्थाला सांगून महाराजांनी तिला ठेवून घेतले. महाराज दिसले की, दावे तोडून त्यांच्याकडे ती धाव घेई. असे किती प्रसंग सांगावेत ? प्रत्येक प्रसंगात त्यांच्या अंतःकरणातील कारुण्याचेच दर्शन घडते. दुसऱ्याचे अगदी क्षुल्लक दुःखसुद्धा त्यांना पाहवत नसे. दुसऱ्यांच्या दुःखाचे अश्रू त्यांच्याही डोळ्यांत अश्रू आणीत.

शेवटच्या दिवसात महाराजांनी एक बैल विकत घेतला. लोकांनी त्यांना तो बैल न घेण्याविषयी खूप समजाविण्याचा प्रयत्न केला. कारण तो जिथे जाईल तिथे हानीच होईल, असा तो खोडगुणी होता. त्यावर महाराज म्हणाले, 'मग बरेच झाले. इतरांना कष्टदायक होण्यापेक्षा माझ्यासारख्या गोसाव्याची हानी झाली तर दुःखाचे काय कारण ?'' इतकी त्यांना लोकांच्या कल्याणाची तळमळ होती. याउलट सामान्य माणूस हा परदुःख शीतल या न्यायाने वागतो.

कृष्णराव तरडे नावाचे भक्त एकदा आडरानातून जात असता समोर एक भुजंग आडवा आला. त्याला पाहून ते खूप घाबरले. त्या वेळी त्याला महाराजांची शपथ घालून त्याला हलू नको म्हणून सांगताच तो जागीच स्थिर राहिला आणि महाराजांकडे येऊन हे वृत्त सांगितले. ते ऐकताच महाराज एकदम म्हणाले की, त्याची शपथ मोकळी करून त्याला बंधनातून सोडव. तो बिचारा आपल्या घरी जाईल आणि तसेच झाले. प्राणिमात्राविषयी सुद्धा त्यांच्या अंतःकरणातील असे प्रेम पाहिले की आश्चर्य वाटते.

असा हा दुसऱ्याच्या दुःखाने कळवळणारा महात्मा अपकार करणाऱ्यांवरही दया बुद्धीनेच वागला. महाराजांचे दुष्काळातील कार्य पाहिल्यानंतर औंधच्या राजाची त्यांच्यावर निष्ठा बसली होती. कालांतराने तो दिवंगत झाल्यावर त्याच्या राज्यात दुफळी माजली. अंतर्गत कलह वाढू लागला. त्या वेळी सरकारने जेकब नावाच्या व्यक्तीला प्रशासक म्हणून नेमले. एक पांगळीबाई त्याच्या मनाविरुद्ध केवळ महाराजांच्या सल्ल्याने वागते असे वाटून त्याने महाराजांवर एक खोटेच कुभांड रचले. पण त्यात त्याला यश न आल्याने त्याने महाराजांवर विष प्रयोग करण्याचे ठरविले. हा प्रसंग म्हणजे त्यांच्या जीवनातील कळसाध्यायच होय. जेकबने एकामागून एक अशी तीन माणसे पाठविली. तो मनुष्य आला की महाराज त्याच्याशी इतके प्रेमाने वागत की त्याला आपलासा करून घेत. परिणामतः आपण कशासाठी आलो हे सांगून त्यांची क्षमा मागे व शेवटी अनुग्रह घेऊन परत जाई. यानंतर येणारा इसम मात्र पक्का निघाला. महाराजांच्या गोड व प्रेमळ वागणुकीला तो बळी पडला नाही. त्याने महाराजांना व भाऊसाहेब केतकर आणि आप्पासाहेब भडगावकर अशा तिघांना भोजनाचे आमंत्रण दिले. त्याचा हेतू जाणूनही महाराजांनी ते स्वीकारले. दुपारी १२ वाजता श्रीरामाला त्यांच्याकडून आलेला नैवेद्य महाराजांनी जमिनीत पुरावयास सांगितले. मी एकटाच जेवायला जातो, माझ्याबरोबर कुणी येऊ नये असे म्हणाले. त्यावर भाऊसाहेब केतकर म्हणाले, 'आपण तरी एकटे का जाता ?' त्यावर महाराजांनी दिलेले उत्तर त्यांच्या दर्याद्र अंतःकरणाची साक्ष देते. महाराज म्हणाले, 'भाऊसाहेब मी जेवायला गेलो नाही, तर त्याचे अंतःकरण दुखेल. राम आपला पाठीराखा आहे. आपण स्वस्थ असा.' महाराज जेवायला गेले. त्या माणसाने अन्नात सोमल घालून खायला घातले व आपले काम झाले या आनंदात तो परत गेला. महाराज परत आल्यानंतर त्यांना अतिशय त्रास झाला. पोटात भयंकर आग होऊ लागली. ते सारखे पाणी मागू लागले. ओंजळभर वेलदोडेसुद्धा खाल्ले. तरीही बराच वेळ आग शमली नाही. शेवटी ते मानवी शरीरच होते. त्यावर विषाचा परिणाम होणे अनिवार्य होते. महाराजांची होणारी ही जिवाची तगमग पाहून महाराजांच्या भोवतालच्या मंडळींच्याही काळजात चर्र झाले. संध्याकाळी पोटातील आग जरा कमी झाली. महाराजांना जरा बरे वाटू लागले, तेव्हा कुठे सर्वांनी निःश्वास सोडला. या वेळी हलाहल पचविणाऱ्या शंकराचे स्मरण झाल्याखेरीज राहत नाही. रात्री नऊ वाजता मंदिरात सर्व मंडळी फराळाला बसली तेव्हा ज्याने महाराजांना प्रत्यक्ष विष खाऊ घालून जीवे मारण्याचा डाव रचला होता त्याला फराळाला बोलावणे पाठविले. पण तो निघून गेल्याचे कळताच, 'अरेरे ! हाती आलेला मोठा

लाभ त्याने घालविला. असो रामाची इच्छा.' येवढेच ते बोलले. यापेक्षा कारुण्य ते कोणते असू शकेल ?

तात्पर्य, बुडती हे जन न देखवे डोळा । म्हणुनी कळवळा संतालागी।। ही तुकारामांची उक्ती महाराजांनी पूर्णांशाने सार्थ केली. स्वतः प्रपंचात राहून त्यात ते अलिप्तच राहिले. परंतु लोकांचे प्रपंच मात्र त्यांनी सांभाळले. पुष्कळदा स्वतःची पदरमोड करून लोकांना मदत केली. हे करताना त्यांची प्रपंचाची आसक्ती कमी व्हावी म्हणून, बालकाला कडू औषध घेण्यासाठी जसा गुळाचा खडा अगोदर द्यावा तशी त्यांची वागण्याची रीत होती. प्रपंच सुखे करावा । परी परमार्थ अवघाचि बुडवावा । हे विहित नव्हे ।। ह्याची खूणगाठ मनाशी बांधून ते प्रापंचिकाशी त्यांची नाडी ओळखून वागले. प्रपंचातून हळूहळू मन काढून परमार्थाकडे लोक कसे वळतील यासाठी त्यांनी त्यांच्याच भाषेत सांगायचे म्हणजे नामाचा बाजार मांडला आणि जन्मभर तो सांभाळला. परंतु जाण्यापूर्वी त्यांनी श्री. भाऊसाहेब केतकरांजवळ जे उद्गार काढले ते मोठे मार्मिक होते. 'मी कस्तुरीचे दुकान लावून बसलो. पण मला हिंगजिऱ्याचेच गिऱ्हाईक जास्त मिळाले.' यामागे लोकांच्या पारमार्थिक कल्याणाची त्यांची तळमळ स्पष्ट दिसून येते. म्हणूनच त्यांच्यावर निष्ठा नसणाऱ्या लोकांनी सुद्धा त्यांच्याविषयी धन्यतेचे उद्गार काढलेत, अशा या अलौकीक महापुरुषाला शतशः वंदन.

सौ. प्रभा टेंभेकर
२१६, हनुमान नगर, नागपूर.

# अद्वैत व नामस्मरण

श्री. भास्कर रामदास कुलकर्णी

*एम्. ए. (संस्कृत), बी. टी. (बेसिक) शासकीय शिक्षण महाविद्यालय २० वर्षे नोकरी. १९८७ निवृत्त. शिक्षक, मुख्याध्यापक व प्राध्यापक म्हणून शासकीय सेवा. श्रीराम ट्रस्ट अमरावतीच्या 'दिपार्चन' याचा सांस्कृतिक व शैक्षणिक विभाग सचिव. लेखन व प्रवचन प्रसंगानुसार.*

स्मरण देवाचे करावे । अखंड नाम जपत जावे ।
नामस्मरणे पावावे । समाधान ॥ श्रीराम ॥

- श्रीदासबोध ४.३.२, चतुर्थ दशक, तृतीय समास, श्लोक दुसरा.

श्रीब्रह्मचैतन्य महाराज म्हणत, 'अखेर सुटणाऱ्या श्वासाबरोबर नामस्मरण थांबावे.' वरील ओवीचाच आशय श्रीमहाराजांनी अभिव्यक्त केला आहे. स्मरण भगवंताचे हे नामजपाचे पूर्वांग आहे. त्याची फलश्रुती म्हणजे समाधान. हे प्राप्त व्हावे म्हणून मनुष्य जीवनभर प्रयत्नांची पराकाष्ठा करतो. विविध वासनांमुळे कार्यप्रवृत्त होण्यामागे समाधान मिळावे हा हेतू असतो. आपल्या अनुभवाच्या कक्षेत येणारी प्रत्येक वस्तू व व्यक्ती नाशिवंत असल्यामुळे संसारात शाश्वत समाधान म्हणजेच दुःखाचा स्पर्श नसलेले सुख प्राप्त होणे शक्य नाही. हे उमगल्यानंतर तरी प्रयत्नांची दिशा बदलणे आवश्यक आहे.

श्रीमहाराज म्हणतात, 'आपण ज्या कार्यासाठी आलो ते कार्य झाले की समाधान होते, मग जो पर्यंत आपल्या कृतीने आपल्याला समाधान होत नाही तो पर्यंत आपण त्या कार्यासाठी आलो नाही असे म्हणायला हरकत आहे ? आपण भगवंतासाठी आलो आहोत आणि त्याच्या प्राप्तीत समाधान आहे.'

परमार्थात समाधान म्हणजे आनंदरूप स्थिती. ती बाहेरून मिळवावयाची नसून स्वसंवेद्य आहे. नारदीय भक्तिसूत्रांत भक्तीची व्याख्या करताना ती - सात्वस्मिन् परमप्रेमस्वरूपा । म्हटली आहे. अस्मिन हे रूपच हृदयस्थ भगवंतावरील परमप्रेमाकरिता आहे. खंडित न होणारा आनंद, प्रेम प्रत्येकाला हवे असते. आनंद हे भगवत्स्वरूप आहे.

'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियंभवति ।' या जगातील कोणतीही गोष्ट आपल्याला तो पर्यंतच प्रिय असते जोपर्यंत ती आपल्या सुखकारक वृत्तीला अनुकूल असते. आपल्याशी ऐक्य पावणाऱ्या व्यक्तीचे वा वस्तूचे प्रेम अखंड राहील. देहतादात्म्यामुळे स्त्रीपुत्रादीच्यापेक्षा देहाचे प्रेम जास्त असते. म्हणूनच देहविस्मृती होत नाही. भगवंताला आपण जोपर्यंत भिन्नत्वाने पाहू तो पर्यंत त्याचे अखंड प्रेम राहणार नाही व अखंड स्मरण राहणार नाही. अखंड स्मरणाशिवाय अखंड नाम मुखांत येणार नाही.

'मज माझी अनावर झाली वाचा । छंद या नामाचा घेतला असे।' हे संतवचन अखंड नामस्मरणाकडेच निर्देश करते. याकरिता भगवंत माझ्यापासून कोणी निराळा नाही असे अद्वैतस्वरूपाचे ज्ञान होणे आवश्यक आहे. श्रीमहाराज रामपाठात म्हणतात -

सद्गुरु म्हणे ऊठ लवलाही । ज्ञानदीपाचे प्रकाशे पाही ।
वस्तु आपुली शोधून घेई । मग पावशी निजसुखा ॥

आपल्याला आपल्याच ठिकाणी ही वस्तु (भगवंत) शोधावयाची आहे. ज्ञानदीपाने म्हणजेच विवेकाने स्वस्वरूप कळणे अत्यंत आवश्यक आहे. कै. पू. श्री. बाबासाहेब बेलसरे या संदर्भात म्हणतात,

'व्यक्ति म्हणजे आपले स्वरूप तर व्यक्तिमधील स्वयंप्रकाश साक्षी आपले स्वस्वरूप होय.' 'यो बुद्धेः परतस्तु सः' हे गीतावचन तेच सांगते. स्वस्वरूपाची अनुभूती आनंदमय आहे. देहतादात्म्याने राहणारा स्व म्हणजे देहबुद्धी. साक्षीभूतस्वरूपाशी तादात्म्य म्हणजे आत्मबुद्धी. स्वस्वरूपाचे अनुसंधानाशिवाय होणाऱ्या नामजपाचे वर्णन श्रीएकनाथ महाराज करतात -

नाम घेता वैखरी । चित्त धावे विषयावरी ।
कैसे होत आहे स्मरण । स्मरणामाजी विस्मरण ।
नामरूपा नव्हता मेळ । अवघा वाचेचा गोंधळ ।।

श्रीमहाराजांनी दिलेल्या दृष्टांतावरून सांगावयाचे म्हणजे घड्याळाच्या आंतील संलग्न चक्र न फिरता केवळ घड्याळाची किल्ली फिरविण्यासारखे होईल. आनंदाची अनुभूती क्षितिजाप्रमाणे दूर दूर जाईल. मानवाचा जन्म निजानंदानुभूती करिताच आहे.

निजात्मप्राप्ति लागुनी । देवे केली मनुष्य योनी ।

असे श्रीएकनाथ महाराज म्हणतात,

आत्मसुख अतींद्रिय, सूक्ष्म व व्यापक स्वरूपाचे आहे. साक्षीभूत चैतन्याचे हे स्वरूप आहे. सुखरूपता हा त्याचा अंगभूत गुण आहे. कै. श्री. बाबासाहेब बेलसरे म्हणतात, त्याचा आशय हाच की स्वस्वरूप आत्मा म्हणजेच व्यक्तिचैतन्य किंवा व्यक्तिगत जाणीव होय. या व्यक्तिविशेषांना कवेत घेणारे विश्वात्मक चैतन्य किंवा विश्वात्मक जाणीव, हे व्यापक सूक्ष्म व सृजनशील असते. संतांना स्फुरणारी नवनवोन्मेषशाली अशी प्रतिभा याच अवस्थेची निदर्शक होय. याच प्रतिभेच्या संदर्भात श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

तिये सिद्ध प्रज्ञचेनि लाभे । मन सारस्वतें दुभे ।
सकलशास्त्रे स्वयंभे । निघती मुखे ॥ ज्ञा. अ. ६

विश्वात्मक जाणीवेला म्हणजेच या सामान्याला कवेत घेणारा परमात्मा महासामान्य होय. त्यालाच अंतरात्मा, शब्दब्रह्म किंवा ॐ कार म्हणतात. हेच अंतिम सत्य होय. संताचे नाम ते हेच. सूक्ष्माला दृश्याशी जोडणारा दुवा म्हणजेच हे नाम. जड किंवा रूप सूक्ष्मातून नामांतून

आकाराला येते, त्याच्याच सत्तेवर जगते आणि त्यातच अंतर्धान पावते.

श्रीमहाराज म्हणतात, 'शुद्ध परमात्मस्वरूपाच्या अगदी जवळ कोणी असेल तर ते फक्त नामच होय. नाम हे चिन्मय असल्यामुळे त्याचा आनंद ओसंडून येतो आणि ही सृष्टि तयार होते. अनेक रूपे घडविणे, ती मोडणे आणि ती नवीन तयार करणे पण आपण मूळ स्वरूपाने राहणे ही केवढी विलक्षण लीला आहे.'

श्रीमहाराज कोणत्याही प्रकारे, तत्त्वज्ञानातील पारिभाषिक शब्द न वापरता - एक परमात्मसत्ताच सत्य आहे हेच सांगतात. त्यांच्याच सत्तेने नामरूपाचि भासमान अभिव्यक्ती आहे. वस्तुरूपाने केवळ परमात्माच सत्य तर नामरूपे त्याचा विवर्त आहे. सुवर्णाचे अलंकार नामरूपाने भिन्न पण वस्तुरूपाने सुवर्णच सत्य. सुवर्णाचे गुण-कांति, वर्ण आदी अलंकारात प्रगट होतात. त्याचप्रमाणे सच्चिदानंद रूप परमात्म्याचा विवर्त असणारी सृष्टि सच्चिदानंदरूपच आहे. म्हणूनच श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणते -

तरी पार्था परियेसा । मी तव येथ ऐसा ।
रत्नी किळावो जैसा । रत्नचि तो ।। अ. १४

चैतन्यरूप तो परमात्मा - शिव स्वशक्तीने स्फुरण पावतो. तेच त्याचे स्वात्मप्रेम आहे. अमृतानुभवांत ज्ञानेश्वर माऊली म्हणते, 'तो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचे सरोभरी ।' कै. पू. बाबासाहेब म्हणतात -

'प्रत्येक जीवामध्ये ती शक्ती अंशरूपाने कार्य करते. माणसामध्ये मात्र ती विशेषरूपाने म्हणजे विद्या व अविद्यारूपाने प्रगटते.'

दृश्याला सत्य मानणारी अविद्याजन्य देहबुद्धि हेच त्या शक्तीचे अविद्यारूप. स्वस्वरूप असे साक्षीभूत चैतन्य तिचे विद्यारूप होय. नामानेच या साक्षीभूत स्वस्वरूपाचे अनुसंधान साधते. हीच सम्यक् दृष्टी होय. ते सत् आहे, शांत आहे म्हणूनच समाधानरूप आहे.

आनंदात खलु इमानि भूतानि जायन्ते ।
आनन्देन जातेन जीवन्ति ।
आनन्दं प्रयन्त्यभिसं विशन्ति ।

या उपनिषद वचनाप्रमाणे आत्मा, विश्वात्मा व परमात्मा - सच्चिदानंद रूपच आहे, हे अत्यंत निरूपाधिक आहे. श्रीमहाराज म्हणूनच श्रीतुकाराम शास्त्रींना सांगतात, 'निरूपाधिक भगवंताशी नाते जोडण्यास अत्यंत निरूपाधिक साधन नामच.' हृदयस्थ भगवंताची प्रचीती नामस्मरणानेच, अनुसंधान नामानेच साधते. अनुसंधानात श्रवण, मनन, व निदिध्यास अंतर्भूत आहे. श्रीसमर्थ म्हणतात, 'मनन ध्यास साक्षात्कारे। पावन होईजे ।

नामस्मरणाला वेदशास्त्राचा भरभक्कम आधार आहे. हरिपाठात श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणते -

'वेदशास्त्र प्रमाण श्रुतीचे वचन । एक नारायण सार जप ।

१) मर्ता अर्मतस्य ते भूरि नाम मनामहे । विप्रासो जातवेदसः ।।

२) अस्य जानन्तो नाम चिद्विवक्तनमहस्ते । विष्णो सुमति भजामहे।।

असे दोन नाममहात्म्य सांगणारे मन्त्र ऋग्वेदात दिलेले आहेत. त्यामुळे नामस्मरण हे प्राकृतजनाकरिताच आहे असे नव्हे. श्रीब्रह्मानंदासारखे महापंडित श्रीमहाराजांच्या चरणी सर्वभावे समर्पित झाल्यानंतर त्यांनी नामस्मरणाशिवाय अन्य काही केले नाही. भगवंत व त्याचे नाम सच्चिदानंदरूप आहे. त्या भगवंताच्या साक्षात्काराकरिता नामस्मरण सर्वश्रेष्ठ साधन आहे हेच श्रीब्रह्मानंदांनी दाखविले.

भगवंताच्या अनुसंधानात काही करावयाचे नसून तोच होऊन जायचे आहे. स्वस्वरूप प्राप्तीचे समाधान एका गुरुकृपेनेच शक्य आहे. श्रीरामपाठात श्रीमहाराज म्हणतात,

सद्गुरु राजवैद्य पूर्ण । रामनामाचे रसायन ।
स्वहस्ते मम मुखी पाजून । केले सावध स्वरूपी ।।

या रामनाम रसायनाला गुरुदेव रानडे सबीज नाम म्हणतात. गोंदवल्याचे वैभव ही तुकामाईची कृपा आहे असे श्रीमहाराज म्हणत. श्रीतुकामाईने श्रीमहाराजांना सांगितलेले जीवित कार्य त्यांच्याच शब्दात बघून पूर्णविराम देऊ.

'प्रापंचिक लोकांना, विशेषतः मधल्या स्थितीतल्या लोकांना आपल्या प्रपंचामध्ये परमार्थ कसा करावा हे शिकव. राममंदिराची स्थापना करून रामनामाचा प्रसार कर. माझे महत्त्व वाढविण्यापेक्षा समर्थांचे महत्त्व वाढव. लोकांमध्ये भजनाचे प्रेम निर्माण होईल असा मार्ग दाखव. जे खरे दीन असतील अशांची सेवा कर आणि सर्व ठिकाणी प्रेम वाढेल असा उपाय कर.'

भास्कर रा. कुलकर्णी,
सुंदरम् २, रहेजा कॉम्पलेक्स, मालाड (पूर्व), मुंबई.

# श्रीमहाराजांची स्वभाव वैशिष्ट्ये

**श्री. विनायक (श्याम) शंकर सरवटे**

*एम्. ए. (मराठी), एम्. एड., डी.पी.एड., नागपुरातील धरमपेठ शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातून उपमुख्याध्यापक पदावरून निवृत्ती. स्थानिक 'तरुण भारत' व 'नागपूर पत्रिका' या दैनिकातून क्रीडा-विषयक लिखाण सातत्याने केले. आकाशवाणीवर क्रिकेट समालोचन केले. श्रीमहाराजांनी आपला म्हटले ही सगळ्यात मोठी व महत्त्वाची पात्रता.*

संतांच्या चित्ताचे वर्णन करताना 'मृदू सबाह्य नवनीत । तैसे सज्जनांचे चित्त ।।' असे म्हटले जाते. श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांना ही उक्ती सही सही लागू पडते. महाराजांच्या जीवन चरित्राचा विचार करताना त्यात आलेली विविध स्वभावांची, वृत्तींची असंख्य माणसे आढळतात. या सर्वांना सांभाळून घेऊन नामाला लावण्याची किमया श्रीमहाराजच करू शकतात. घरी साध्या समारंभासाठी दहा लोक जमले तर त्यांच्याशी जमवून घेता घेता आपली काय अवस्था होते याचा विचार केला म्हणजे महाराजांच्या स्वभावाची खरी कल्पना येते.

महाराजांच्या स्वभावातील वैशिष्ट्ये बालपणापासूनच दिसून येतीत. त्यांच्या ठिकाणी जन्मापासूनच अध्यात्मवृत्ती होती. त्यांचे आजोबा लिंगोपंत यांनी श्रींना एकदा विचारले, 'बाळ, तुला हंडा भरून मोहोरा दिल्या तर तू काय करशील ?' श्रींनी ताडदिशी उत्तर दिले, 'आंधळे, पांगळे, रोगी, गरीब आणि भिकारी यांना मी सगळ्या वाटून टाकीन !' त्यावर आजोबा पुन्हा म्हणाले, 'पण तुला राजा केला तर काय करशील ?' श्रींनी लगेच उत्तर दिले, 'माझ्या राज्यात भिकारी असा कुणी राहू देणार नाही. माझ्या दारी अन्नछत्र घालीन.' या वेळी श्री पाच वर्षांचे होते. अन्नदान महाराजांना अतिशय आवडत असे हे पुढे स्पष्टच झाले.

ज्या नामाला महाराजांनी आयुष्यात कधी दूर होऊ दिले नाही ते नाम बालपणापासूनच त्यांच्या वृत्तीत भिनले होते. लहान असतानाच ते नदीकाठच्या स्मशानाच्या बाजूला एका लहानशा गुहेत ध्यान लावून बसत. त्या एकांतात मन नामात लवकर रंगून जाते असे ते सांगत.

स्वतःजवळ जे असेल ते दुसऱ्याला देऊन टाकणे हा महाराजांच्या स्वभावाचा फार मोठा भाग होता. नऊ-दहा वर्षांचे असताना ते गुरुच्या शोधार्थ घराबाहेर पडले व कोल्हापूरला गेले. या वेळी त्यांच्या अंगावर एक लंगोटी व सदरा आणि कानात एक भिकबाळी होती. अंबाबाईच्या देवळात एक भिकारी त्यांच्या मागे लागला, 'माझ्याजवळ तुला द्यायला काहीही नाही,' असे सांगूनही तो ऐकेना तेव्हा त्यांनी आपल्या कानातील भिकबाळी खसकन ओढली व ती त्याच्या हातावर टाकली. महाराजांचा कान तुटून त्यातून रक्त वाहू लागले. नंतर बाराव्या वर्षीच ते गुरुच्या शोधार्थ पुन्हा बाहेर पडले. अंगावर फक्त लंगोटी होती. ते भारतभर अनेक ठिकाणी हिंडले व शेवटी मराठवाड्यात नांदेडजवळ असलेल्या येहळेगावला आले. येथेच त्यांना श्रीतुकामाई गुरुरूपाने भेटले. गुरुसेवा कशी करावी याचा आदर्श महाराजांच्या येथील वागण्यातून कळतो. आपण गुरुसेवेत किती कमी पडतो याची स्पष्ट कल्पना येते.

महाराज अतिशय साध्या वृत्तीचे होते. त्यांचे बोलणे साधे होते, खाणे साधे होते व कपडेदेखील अगदी साधे असत. साधी व हलकी कामे करण्यात त्यांनी कधी लाज बाळगली नाही. या साधेपणामुळे सर्व लोकांना त्यांनी आपलेसे करून सोडले.

'आपला अभिमान नष्ट करायला लीनतेसारखे साधन नाही. म्हणून भगवंताच्या नामाला लीनतेची जोड द्यावी.' असे ते वारंवार सांगत. सर्वसामान्य माणसाच्या अंगी नेमकी याच गुणाची उणीव भासते. नामस्मरण फार मोठ्या प्रमाणात करणारे लोक अनेक आढळतील. पण त्याचा सात्त्विक अहंकारदेखील उत्पन्न न होऊ देणारे विरळाच. 'महापुरे झाडे जाती - तेथे लव्हाळे वाचती' या संतवचनात हाच अर्थ आढळतो. अहंकाराने ताठ उभी राहणारी झाडे महापुरात टिकत नाहीत. पण लीन होऊन वाकणारी लव्हाळी मात्र कायम राहतात. परमेश्वरापुढे अनन्य शरणागती पत्करायची असेल तर प्रथम अंगी लीनता येणे फार आवश्यक आहे.

महाराजांनी सहन तरी किती करावे ? त्यांनी अपमान सहन केले, निंदा सहन केली, आघात सहन केलेत. पण कोणत्याही प्रसंगात त्यांच्या मनाची शांत वृत्ती भंगली नाही. संसारातले छोटे-मोठे आघात सहन करताना आपली कोण त्रेधा उडते नाही ? महाराजांचे भाऊबंद जमिनीवरून महाराजांशी भांडणे करीत. प्रकरण अगदी हातघाईवर येई. महाराजही तितक्याच गंभीरपणे त्यांच्याशी भांडत आणि हे सगळे आटोपल्यावर त्यांना चांदीच्या ताटात आपल्या शेजारी जेवू घालीत. एकदा तर त्यांच्या भाऊबंदांपैकी एकाने एक भला मोठा धोंडा त्यांच्या डोक्यात टाकला. महाराज चटदिशी बाजूला सरले म्हणून बरे पण जरादेखील न संतापता ते त्याला म्हणाले, 'अरेरे ! हे काय केलेस ! ब्रह्महत्त्या घडली असती ना ?' रात्री त्याच माणसाला जवळ घेऊन जेवायला बसले. महाराजांच्या मनाची उंची ही अशी होती.

महाराजांना प्रसिद्धी मुळीच मान्य नव्हती. म्हणूनच कितीतरी वर्षे त्यांना लोक ओळखत नव्हते. ते म्हणत, 'खरे कार्य इतके प्रचंड आहे, आपल्या जीवनाचा काल इतका थोडा आहे आणि या जगात आपण इतके कःपदार्थ आहोत की आपली प्रसिद्धी होऊ देणे किंवा ती करणे हा मूर्खपणा आहे.' महाराजांची ही विचारसरणी आजच्या काळात किती लोकांना पटण्यासारखी आहे, याचा विचार व्हावयास हवा.

समाधान हा श्रींच्या जीवनातील अत्यंत महत्त्वाचा भाग होता. माणसाने प्रयत्न करावा पण मिळेल त्या फळात समाधान मानावे, असे

ते नेहमी सांगत. सर्वसामान्य माणूस पैसा, कौटुंबिक समस्या यामुळे सदैव असमाधानीच असतो. त्यामुळे त्याच्यामागची काळजी कधीच संपत नाही. महाराज सर्वांना चिंतामुक्त राहण्यास सांगत. रामावर भार टाकून निश्चिंत व्हा, असे ते आश्वासन देत. अर्थात त्यासाठी रामावर व त्याच्या नामावर तेवढी निष्ठा असणे अत्यंत आवश्यक आहे. सामान्य माणूस नेमका येथेच कमी पडतो. 'राम कर्ता' ही भावना लौकर रुजत नाही. सुखासाठी धडपड करताना माणूस असमाधानाचा संचय मात्र करीत जातो. समाधान प्राप्त करण्यासाठी भगवंताच्या अनुसंधानाशिवाय दुसरा मार्ग नाही, असे महाराज नेहमी सांगत.

, जनप्रियत्व हा महाराजांचा अतिशय महत्त्वाचा गुण होता. 'मन कोणाचे कधी न दुखवावे' हा सिद्धांत म्हणजे महाराजांचे व्रत होते. प्रत्येकाच्या हृदयात परमात्मा आहे. ही गोष्ट जर खरी असेल तर अंतःकरण दुखवणे म्हणजे भगवंताला दुखविण्यासारखेच आहे, असे ते वारंवार सांगत. महाराजांनी सतत लोक जोडले. एखाद्याला आपला म्हटल्यानंतर महाराजांनी, तो कसाही असला तरी त्याला तोडला नाही. त्यांच्या या स्वभावामुळे ते सर्वांना हवेहवेसे वाटत. त्यांचा वियोग लोकांना सहन होत नसे. निखारे खाऊ घालणाऱ्या जिजीबाईवरही त्यांनी कृपाच केली. जेकबच्या ज्या माणसाने त्यांना विष घातले त्याच्यावर राग न धरता तो फराळाला का आला नाही, अशी चौकशी महाराजांनी केली, हा त्यांचा किती थोरपणा !

कोणतीही गोष्ट मनापासून करावी असे महाराज नेहमी सांगत. कशीतरी माळ ओढत खूप वेळ जप करण्यापेक्षा जीव ओतून पाचच मिनिटे देवाचे नाव घेणे त्यांना जास्त आवडत असे. मनापासून गोष्ट करणे याचाच अर्थ एकाग्रता. एकाग्रतेत आपण स्वतःला विसरू शकतो. भगवंताचे प्रेम येण्यास हे अत्यंत आवश्यक आहे.

महाराजांनी व्यवहाराचा परमार्थासाठी भरपूर उपयोग करून घेतला. नशिबाने जो काही बरा-वाईट प्रपंच असेल त्यात समाधान मानून भगवंताकडे लक्ष लावावे, असा त्यांचा आग्रह असे.

महाराजांचा अत्यंत महत्त्वाचा स्वभाव विशेष म्हणजे 'मला अमुक एक गोष्ट हवी' असे त्यांनी कधीही म्हटले नाही.

गोंदवल्यास श्रीरामाने तीन वेळा अश्रू गाळले. १८९७ साली श्रीमहाराज एकाएकी नैमिषारण्यात जाण्यास निघाले त्या वेळी, १९०१ साली श्रीमहाराजांना प्लेग झाला त्या वेळी व १९१३ साली देह ठेवण्याच्या चार दिवस अगोदर, श्रींचे भजन सुरू असताना. ज्या महापुरुषासाठी प्रत्यक्ष भगवंताच्या डोळ्यात अश्रू आले त्याचे स्वभाव विशेष माझ्यासारख्या पामराने काय वर्णन करावे ?

महाराजांनी माणसांवर जितके प्रेम केले तितकेच प्राण्यांवरही केले. भिकाजी श्रीपत नावाच्या फौजदारांनी महाराजांना बताशा नावाचा एक पांढरा, सुंदर घोडा अर्पण केला होता. हा घोडा भारी खट्याळ होता. इतरांना तो दाद देत नसे. पण महाराजांवर त्याचे विलक्षण प्रेम होते. महाराजांनी त्याच्यावर स्वारी करण्यास काही काळ गेला तर तो नुसता धिंगाणा घाली. महाराजांच्या निर्वाणानंतर तोही जास्त काळ राहिला नाही. महाराजांच्या समाधीसमोरच त्याचीही समाधी बांधली गेली.

गायींवरही महाराजांची विलक्षण माया होती. त्यासाठी त्यांनी गोंदवल्यात गोशाळा बांधली. आपल्या मुलीप्रमाणे ते गायींना सांभाळीत. गोंदवल्यास मुक्काम करणाऱ्या कसायांच्या हातून त्यांनी गायींचे रक्षण केले. गोंदवल्याच्या जवळच असलेल्या म्हसवड या गावी जाऊन महाराज गायी विकत घेत व त्यांना कसायांच्या कचाट्यातून सोडवीत.

बताशा घोडा, गंगी नावाची लंगडी गाय व इतर गायी, नेहमी नियमाने एकादशी करणारे कुत्रे, चारापाणी सोडून त्यांच्या मागे फिरत राहणारा त्यांचा बैल या प्राण्याचे महाराजांवर निष्कपट व अलोट प्रेम होते.

संत देहाने गेले तरी त्यांच्या अस्तित्वाच्या खुणा मागे राहतात. त्याचे अनुभव आपल्याला येतात. श्रीमहाराजांच्या बाबतीतही अनेकांनी असे अनुभव घेतले आहेत. 'ज्या ठिकाणी भगवंताचे नाम आहे त्याठिकाणी मी खात्रीने असतो.' असे आश्वासन महाराजच देऊन गेले आहेत. तेव्हा सतत नामात असणे ही आपली जबाबदारी नाही का ?

(संदर्भ - श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज, चरित्र आणि वाङ्मय - लेखक - के. वि. बेलसरे)

विनायक (श्याम) शंकर सरवटे
६९ वसंतनगर, नागपूर २२.

- **मायेचे निरूपण मायेतच राहून करताच येणार नाही. कारण मायेत म्हणजे अज्ञानात राहून सत्यासत्याचे विवरण आपल्याला करता येणार नाही. तसेच नुसते ब्रह्मरूप राहूनही निरूपण करता येणार नाही. कारण नुसता ब्रह्मरूपाने राहील त्याला माया दिसणारच नाही. त्याला फक्त रामच दिसेल. दोन्हींत राहून जो साक्षित्वाने राहील त्यालाच मायेचे निरूपण करता येईल.**

- **खरे म्हणजे नामस्मरण हा बोलण्याचा विषयच नव्हे. कारण नाम विषयाच्या पलीकडचे म्हणजे निर्विषयरूप आहे. आपण जास्तीत जास्त कल्पना व तर्क यांच्या मर्यादेत बोलणार. पण नामाचे माहात्म्य या दोहोंच्याही पलीकडे आहे.**

# भूलोकीचे आनंद-धाम श्रीमहाराजांचे गोंदवले

**पश्यंती जोशी**

*बी. ए., एस. एस. सी. बोर्डात काही वर्षे नोकरी. १०-१२ वर्षे गोंदवल्याला मुक्काम.*

श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांच्यासारखे संत-सत्पुरुष विशिष्ट कार्यासाठी अवतार घेतात. अलौकिक तत्त्व जगात येऊन आपल्या तेजाने, वाणीने आणि आचरणाने लोकांना अध्यात्म विद्येचे मार्गदर्शन करते त्यालाच अवतार म्हणतात. मानवी रूप धारण करून जगाचा सर्जनहार ह्या जगात विशिष्ट कारणासाठी येतो त्याला अवतार मानतात. ही अवतारी शक्ती अवतीर्ण होते त्याचे मुख्य प्रयोजन 'परित्राणाय साधूनां' हे असते. साधूंचे रक्षण करण्यासाठी, श्रेष्ठांना भेटण्यासाठी ही अवतारी शक्ती येते. जी माणसे अशा अवतारी शक्तीच्या सान्निध्यात, सहवासात येतात त्यांच्या ठिकाणी आध्यात्मिक श्रद्धा स्थिर बनते. ज्यांची श्रद्धा उपासनेमुळे, साधनेमुळे स्थिर झालेली असते ती सात्त्विक बनते. स्थिर आणि सात्त्विक श्रद्धा बनते जेव्हा त्यांना अवतारी शक्तीच्या सहवासाचा लाभ घडतो तेव्हा त्यांच्या श्रद्धेला दैवी श्रद्धेचं रूप प्राप्त होतं. त्यांना आत्मज्ञानाचा, आत्मदर्शनाचा लाभ घडतो.

गोंदवले (जि. सातारा) येथे शके १७६६, माघ शुद्ध द्वादशीस, (१९ फेब्रुवारी १८४५) सकाळी श्रीमहाराजांचा जन्म झाला. आपले अवतारकार्य पूर्ण होताच शके १८३५ ला (इ. स. १९१३ डिसेंबर) वयाच्या एकुणसत्तराव्या वर्षी गोंदवले येथे ते महासमाधिस्त झाले. वयाच्या बाराव्या वर्षी सद्गुरु शोधार्थ ते एकाकी घराबाहेर निघून गेले होते. पोरसवदा वय, शरीरयष्टी चांगली, सतेज गोरा वर्ण, चलाख बुद्धी आणि मुखामध्ये अखंड रामनाम असा हा बालब्रह्मचारी सद्गुरुच्या भेटीसाठी, जेथे कोठे संत-सत्पुरुष आहे असे समजले तेथे पायी जात राहिला. पोटापुरत्या माधुकरीशिवाय अन्य कोणाकडे कशाची कधी याचना केली नाही.

परमार्थाच्या मार्गातील अनेक भेटले. त्यातील बहुतेकांनी त्यांच्याजवळ असलेली अध्यात्मविद्या या मुलाला दिली. काहींनी आशिर्वाद देऊन पुढे पाठवले. परंतु भगवंताचे दर्शन घडवून देणारा सद्गुरु कोणी भेटला नाही. अध्यात्म विद्येत जे पोचलेले आहेत असेही काही भेटले परंतु तुझे काम करणारा निराळा आहे असे त्यांच्याकडून ऐकावे लागले. संपूर्ण उत्तर हिंदुस्थान म्हणजे अर्धा-अधिक हिंदुस्थान, तेथील तीर्थस्थाने, अरण्ये, गुहा, पर्वतशिखरे, नदीकाठ, मंदिरे, मठ सर्व शोधून झाले. आता दक्षिण हिंदुस्थानात शोध घ्यावा असा विचार करून हैद्राबाद भागात पोहोचून एका नदीकाठी एकांत स्थळी बसून विचार करीत असतानाच श्रीसमर्थ सांप्रदायातले मोठे सत्पुरुष श्रीरामकृष्ण अचानक तेथे प्रकट झाले. त्यांना या मुलाने साष्टांग नमस्कार घातला. ते बोलले, 'बाळ, येहळेगावला, तुकाराम चैतन्यांकडे जा. तेथे तुझे पूर्ण समाधान होईल.' ते बोलले आणि क्षणार्धात नाहीसे झाले.

येहळेगाव कुठे आहे याची चौकशी आणि भ्रमंती सुरू झाली, तेव्हा मराठवाड्यात, नांदेडपासून काही अंतरावर येहळेगाव हे एक खेडे असल्याचा ठावठिकाणा समजला. त्या काळात प्रवासाची काही साधने नव्हतीच. शेकडो मैलांची पायपीट करावी लागणार होती. ओढे, नद्या, डोंगरे, जंगले पार करावी लागणार होती. परंतु मनीमानसी, सद्गुरुचा शोध हा एक ध्यास आणि बळकट निर्धार असल्याने देहकष्टाचे किंवा अन्य कशाचे भानच उरले नव्हते. मनाच्या याच अवस्थेत एक दिवस येहळेगावात पोचल्यावर सद्गुरुंचे जे प्रथम दर्शन घडले ते असे - कमरेला लंगोटी, डोक्याला टोपडे, एका हातात चिलीम आणि दुसऱ्या हातात उसाचे कांडके ! दोघांची दृष्टादृष्ट होताच, 'तुझा खून करतो' असे ओरडून गुरु तुकामाईंनी उसाचे कांडके उगारले आणि 'मी पण माझा जीव देतो' असे बोलून सद्गुरु शोधार्थ आलेल्या या बालमूर्तीने तुकामाईंच्या चरणांवर साष्टांग नमस्कार घातला. ती बालमूर्ती पाहून तुकामाई आनंदले, त्यांनी त्यास पोटाशी धरले आणि हात धरून घरी नेले.

गुरुशोधाच्या भ्रमंतीत अनेक ठिकाणी संत-सत्पुरुषांच्या भेटी झाल्या होत्या तरी तुकामाईंचे दर्शन घडले आणि मनाला समाधान वाटले. आपल्याला जे पाहिजे ते यांच्याजवळ खात्रीने मिळेल असा विश्वास उत्पन्न झाला. गुरुकृपा संपादन करावयाची, भगवंताचे दर्शन घडावयाचे म्हणजेच आत्मज्ञानाची साक्षात प्राप्ती व्हावयाची तर कठोर गुरुसेवा, गुरुंच्या आज्ञेचे पालन, साधन आणि 'स्व' चे गुरुमध्ये विसर्जन या गोष्टींचा प्रसन्न चित्ताने अवलंब करावाच लागतो. देहभान विसरून गुरुची सेवा करणारालाच हे शक्य असते.

श्रीतुकामाईंच्या ठिकाणी योग आणि भक्ती याचे अपूर्व मिश्रण होते. त्यांचे दर्शनीरूप म्हणजे बाह्यरूप तसे अस्ताव्यस्त होते. रानावनात-शेतात कुठेही हिंडत असत. नदीकाठी, विहिरीत, झाडावर बसत असत. कधी लहान मुलांबरोबर खेळायचे तर कधी कुत्र्यांबरोबर ! कांदा-भाकरी खायची. चिलीम पीत असत. अपवित्र, लबाड माणूस दिसलाच

की शिव्या देत. सरळ अंतःकरणाच्या सश्रद्ध माणसांशी व्यवस्थित बोलायचे. त्यांच्या कसोटीला उतरणे ही अत्यंत अवघड गोष्ट असून कसोटीला उतरल्याशिवाय अनुग्रह मिळणे अशक्य. तुकामाई म्हणजे मूर्तिमंत विरक्ती होती. शांती होती. आनंद होता. पूज्यभाव निर्माण व्हावा, पाहताक्षणी नतमस्तक व्हावं असं तेजस्वी दैवी, बळ लाभलेलं हे नाथपंथी सिद्ध पुरुषाचं व्यक्तिमत्त्व होतं.

श्रीमहाराजांनी तुकामाईंची नऊ महिने अखंड सेवा केली. सेवेच्या रूपाने तुकामाईंनी या शिष्याला अतिशय देहकष्ट दिले. कटू शब्द ऐकवले. अपमानित केले. दिवसभर कष्ट, गुरु जातील त्यांच्यामागे अनवाणी काट्याकुट्यातून, धुळीतून, उन्हात, पावसात फिरणे, मधेच कुठेतरी अचानक गुप्त होणे आणि दूरवर कुठेतरी प्रकट होऊन तेथून हाक ऐकून पळत पळत गुरुंच्या सान्निध्यात जाणे, असे एक ना दोन अनेक प्रकार ! परंतु देहभान विसरून हे सर्व ताण-तणाव, कटू शब्द, श्रीमहाराजांनी आनंदाने सोसले याचे कारण - त्यांची चित्तवृत्ती तुकामाईंशी पूर्णपणे चिकटली होती. नऊ महिने ते सतत तुकामाईंच्या पाठीशी सावलीप्रमाणे राहिले. रात्री तुकामाईंचे पाय दाबत बसत असत. त्यांना झोप लागली म्हणजे तेथेच पायाशी बसून राहात. या नऊ महिन्यांत महाराजांना कधी झोप घेता आली नाही. तुकामाई उठण्यापूर्वी स्वतः उठून सेवेसाठी तयार असत. ते कधी शांतपणे सेवा घेत तर कधी संतापी बनून झिडकारून टाकीत. कधी प्रेमाने जवळ घेऊन कुरुवाळीत तर कधी हातात सापडेल ते घेऊन मारहाण करीत. असे जरी असले तरी तुकामाईंचे आणि महाराजांचे मनोमीलन इतके झाले होते की या संपूर्ण सेवाकाळात दिवस-रात्रीच्या कोणत्याही प्रहरात महाराजांचे मन तुकामाईंच्या चिंतनाने अखंड व्यापून राहिलेले असे. सर्वज्ञ आणि सर्वव्यापी असणाऱ्या तुकामाईंना या सर्व मानसिक चलनवलनाची खूण अंतर्यामी मिळत असणार हे तर खरेच. परंतु शिष्याला साक्षात भगवंत दर्शन घडावयाचे, आत्मज्ञानाचा लाभ व्हावयाचा तर आणखी बराच पल्ला गाठावा लागणार होता. एकाहून एक अधिक बिकट आणि कसोटी पाहणारे प्रसंग निर्माण करून तुकामाईंनी आज्ञापालनाची कठोर परीक्षा घेतली. या सर्व कसोट्या आणि जीवघेण्या परीक्षा यातून तावून-सुलाखून महाराज बाहेर पडले तेव्हा ते आता देहाभिमानशून्य झाले आहेत अशी तुकामाईंची खात्री झाली. येहळेगावात राहून गुरुसेवा करण्यात नऊ महिन्यांचा काळ संपला होता. गुरुसेवेत अखंड असताना ते स्वतःचे भान विसरले, गोंदवले आणि तेथील माता-पिता यांना विसरले, भूक, झोप, देहधर्म सुटले, अंतःकरण पूर्ण निर्वासन झाले आणि शरीरकांती चित्तशुद्धीने तेजस्वी झाली. दिवस उलटत होते. गुरुसेवेत खंड नव्हता.

लवकरच रामनवमी आली. त्या दिवशी भरदुपारी रखरखीत उन्हात, तुकामाई शिष्याला बरोबर घेऊन रानात गेले. तेथे शेतामध्ये दोघांनी एका विहिरीवर स्नाने केली. एका अशोक वृक्षाखाली तुकामाईंनी हाताला धरून आपल्या समोर बसविले आणि बोलले, 'आजपर्यंत तुला फक्त कष्ट दिले. पण पूर्वी वसिष्ठांनी रामचंद्राला जे दिले ते मी तुला आज या क्षणी देतो.'

तुकामाईंनी महाराजांच्या डोक्यावर हात ठेवला, तेव्हा तात्काळ श्रीमहाराजांना समाधी लागली. पुष्कळ वेळानंतर समाधी उतरली तेव्हा तुकामाईंनी त्यांचे 'ब्रह्मचैतन्य' असे नाव ठेवले. त्यांना आलिंगन दिले. 'श्रीराम जयराम जय जय राम' हा त्रयोदशाक्षरी मंत्र जपून रामोपासना करावी असे सांगून रामदासी दीक्षा दिली. अनुग्रह देण्याचा अधिकार दिला. सद्गुरुंचा अनुग्रह होऊन महाराजांना आत्मज्ञानाचा लाभ घडला त्या वेळी सूर्य बरोबर डोक्यावर आला होता.

अनुग्रह झाल्यानंतर, आत्मज्ञान झाले तरी ते अंगामध्ये चांगले मुरले पाहिजे, आत्मज्ञान जिरवण्यासाठी एकांतात राहून खोल आत्मचिंतन केले पाहिजे, असे तुकामाईंनी महाराजांना सांगितले आणि यासाठी हिमालयात जावे, तेथे काही काळ एकांतात घालवून नंतर अन्यत्र प्रमुख तीर्थस्थानांचे दर्शन घ्यावे आणि मग आई-वडील, कुटुंबीय यांच्या भेटीसाठी घरी जावे, अशी आज्ञा केली.

आज्ञेप्रमाणे हिमालयात काही काळ एकांतात आत्मचिंतन केल्यानंतर नैमिषारण्यात एका गुहेत एकान्तवासात वास्तव्य करून तपःश्चर्या केली. तेथून अयोध्या, काशी, प्रयाग, मथुरा, वृंदावन अशा तीर्थक्षेत्री त्यांचा संचार झाला. त्यांच्या समवेत आणखी काही बैरागी होते. हे सर्व बैरागी महाराजांना महंत म्हणून आदराने वागवीत असत. महाराज काशी येथे असताना तेथे त्यांना एक बंगाली जमीनदार भेटला होता. महाराजांच्या आशीर्वादाने त्यास पुत्रप्राप्ती झाल्याने तो महाराजांचा शोध घेत होता. एक वर्षाहून अधिक काळ त्याचा हा शोध सुरू होता. शोधासाठी त्याने आपल्या काही माणसांना निरनिराळ्या तीर्थक्षेत्री पाठविले होते. त्यातील एकाने महाराजांना मथुरेत पाहिले आणि आपल्या जमीनदार धन्याचे आमंत्रण दिले. त्यानुसार सर्व परिवारासह महाराज कलकत्त्यात येऊन दाखल झाले. जमीनदाराने आपला छोटा मुलगा महाराजांच्या पायांवर घातला आणि काही सेवा करण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्यावर महाराज बोलले, 'आम्ही वैरागी ! आम्हाला कशाचीही जरुरी नाही. तुम्ही मंडळी आनंदात राहा; पण मुख्य असे की भगवंताला विसरू नका. म्हणजे मला सर्व पोचले.' सर्व प्रकाराने सांगून झाले तरी ती मंडळी ऐकेनात तेव्हा महाराजांनी त्यांना हरिहाट करण्यास सांगितले. हरिहाट करणे म्हणजे अतिशय कष्टाचे, खर्चाचे आणि जोखमीचे कार्य असते. सात दिवस, अखंड चोवीस तास अन्नछत्र सुरू ठेवणे, यज्ञ, नामस्मरण, सत्संग, विद्वान-शास्त्री पंडित, कलावंत, पुराणिक, कीर्तनकार, प्रवचनकार यांचा आदरसत्कार, वस्त्रदान, द्रव्यदान आदी मुक्तहस्ते करावयाचे असते. हजारो रुपये खर्चाचा हा हरिहाट बंगालमध्ये प्रथमच महाराजांच्या उपस्थितीत त्या काळात यथासांग झाला.

हरिहाट समाप्तीनंतर फार मोठ्या संख्येने लोक रोज महाराजांच्या दर्शनासाठी येऊ लागले. गर्दी फारच वाढली तेव्हा महाराजांनी जमीनदार व त्याच्या मंडळींचा निरोप घेतला आणि एक दिवस रात्री कलकत्ता येथून गुपचूप बाहेर पडले. बरेच दिवसांनी ते सातपुडा पर्वताच्या जवळ आले आणि नर्मदेच्या काठाकाठाने प्रवास करीत राहिले. या वाटचालीत त्यांना एक तरुण मुलगा भेटला. तो इंदूरचा होता. त्याच्याबरोबर महाराज इंदूरला आले. या वेळी महाराज उन्मनी अवस्थेत होते. कुठेही

बसत असत. बोलता बोलता समाधीवस्थेत जायचे. त्यांची ही अवस्था पाहून तो तरुण मुलगा त्यांना एकट्याला सोडून पळून गेला. त्या तरुणाशी बोलत असतानाच महाराजांना समाधी लागली होती. दिवसभर ते समाधी अवस्थेतच होते. सायंकाळच्या सुमारास रस्त्याने जाणाऱ्या एका माणसाने त्यांना पाहिले. पाण्याच्या डबक्यात बसलेले असल्याने अंगाला चिखल लागला होता. त्या माणसाने त्यांना तेथून उचलले, अंग स्वच्छ केले आणि एका मारुतीच्या मंदिरात नेऊन ठेवले.

इंदूरमध्ये एक श्रीमंत इनामदार होते. रोज सायंकाळी गावाबाहेर ते फिरावयास गेले म्हणजे मारुती मंदिरात जाऊन दर्शन घेऊन स्वतःच्या बागेत विश्रांतीसाठी जात असत. महाराजांना मारुती मंदिरात ठेवले त्याच्या दुसऱ्या दिवशी हे इनामदार मंदिरात आले असताना, महाराज दृष्टीस पडताच हा कोणीतरी सिद्ध पुरुष आहे, असे वाटून त्यांनी त्यांना साष्टांग दंडवत घातला. 'इथे बसण्यापेक्षा बागेत राहायला या.' अशी विनंतीही केली. त्यांच्याबरोबर महाराज बागेत गेले. ज्यांनी त्यांना मंदिरात ठेवले होते तो एक गवळी होता. तोही सकाळ-संध्याकाळ गाईचे दूध घेऊन महाराजांसाठी बागेत जाऊ लागला. अशा प्रकारे महाराज इंदुरात प्रथम प्रकट झाले. तेथे त्यांनी सहा महिने वास्तव्य केले. या वास्तव्यात इंदुरमध्ये रंकापासून रावापर्यंत महाराजांचे नाव सर्वतोमुखी झाले हे खरे. पण हे कोण ? कुठले ? यांचे नाव काय ? याचा कोणास थांगपत्ता लागला नाही. काशी, अयोध्या, कलकत्ता, बंगाल, हिमालय या भागात फिरत असताना त्यांना दख्खन का साधू असे लोक म्हणत असत. इंदुरमध्ये महाराज या नावानेच ओळखले जायचे.

इंदूरहून एके दिवशी सर्वांचा प्रेमाने निरोप घेऊन महाराज पुन्हा तीर्थयात्रा करीत निघाले. गोंदवल्याचा आणि घराचा त्याग करून आता आठ वर्षांचा काळ उलटला होता. त्यांच्या मूर्तीत आमूलाग्र बदल घडला होता. मस्तकावर ऋषींप्रमाणे जटाभार, छान वाढलेली दाढी, प्रसन्न मुखकांती, तेजस्वी, पाणीदार डोळे, गळ्यात रुद्राक्ष माळ, कमरेला कौपीन, पायात खडावा, एका हातात कुबडी, सोबतीला चार बैरागी, शरीरबांधा मजबूत अशी ही तेजस्वी विभूती पाहिली की, पाहताक्षणीच पूज्यभाव निर्माण व्हायचा. मुखी रामनाम आणि मारुती मंदिरात मुक्काम. कोणत्याही गावी मुक्काम केला तरी दर्शनासाठी गावकऱ्यांची गर्दी व्हायची. मोठी तीर्थे पहात महाराज आठ वर्षांनंतर खुद्द गोंदवल्यास आले. नदीकाठी मारुती मंदिरात मुक्काम ठेवला. चार बैरागी सोबत होते. गावचे लोक दर्शनास येऊ लागले. त्यामध्ये मातोश्री गीताबाई आणि वडील रावजी यांना येताना दुरून पाहिले तेव्हा महाराजांनी मनोमन नमस्कार केला. गीताबाईंनी आपल्या मुलाचे वर्णन करून अशा एखाद्या मुलाला आपण कुठे पाहिले आहे का असे गोसावीबुवांना म्हणजे खुद्द महाराजांनाच विचारले. गोसावीबुवा बोलले, 'होय, मी असा मुलगा पाहिला आहे. तो सुखरूप असून तीर्थयात्रा करीत आहे. तुम्ही नामस्मरण करीत रहा. एक वर्षानंतर तो तुम्हाला नक्की भेटेल.' दुसरे दिवशी पहाटेच गाव जागे होण्याआधीच महाराज गोंदवल्यातून निघून गेले. सज्जनगडावर जाऊन श्रीसमर्थांचे दर्शन घेतले आणि तीन दिवस मुक्काम करून तिरूपती, रामेश्वर, कांची आदि दक्षिणेतील तीर्थयात्रेस निघाले. दक्षिणेतील तीर्थस्थळांच्या यात्रा पूर्ण करून सद्गुरु तुकामाईंच्या दर्शनासाठी ते येहळेगावी परतले आणि गुरुंच्या दर्शनाने यात्रेची सांगता केली.

आत्मज्ञान जिरवण्यासाठी एकांतात राहून खोल आत्मचिंतन करायला पाहिजे असे सांगून तुकामाईंनी हिमालयापासून तीर्थयात्रा सुरू करण्याची आज्ञा केली होती. आज्ञेचे पालन करून ते गुरुचरणी परतले. ते पूर्णावस्था प्राप्त करूनच परतले असले पाहिजेत. कारण तुकामाईंनी त्यांना थोड्याच दिवसांत आई-वडिलांची भेट घेऊन प्रगट होण्यासाठी गोंदवल्यास जाण्यास सांगितले. एक वर्षानंतर मुलाची भेट होईल असे महाराजांनी मातोश्री गीताबाईंस सांगितले होते. गुरुंच्या आज्ञेनुसार एक वर्षाने पुन्हा महाराज गोंदवल्यास आले आणि घरासमोर उभे राहून 'जय जय रघुवीर समर्थ' म्हटले. घर सोडून गेल्यानंतर नऊ वर्षांनी महाराजांनी आई-वडिलांच्या चरणी साष्टांग नमस्कार घातला.

रामदासी दीक्षा आणि अनुग्रह देण्याचा अधिकार गुरु तुकामाई यांनी महाराजांना दिलेला होता. त्रयोदशाक्षरी मंत्र देऊन रामोपासना करावी व रामोपासनेचा प्रसार करावा, प्रापंचिक लोकांना - विशेषतः मध्यम स्थितीतल्या लोकांना आपल्या प्रपंचामध्येच परमार्थ कसा करावा हे शिकवावे. लोकांमध्ये भजनाचे प्रेम निर्माण होईल असा मार्ग दाखवावा. जे खरे दीन असतील त्यांची सेवा करावी. सर्व ठिकाणी प्रेम वाढेल असा उपाय करावा. इतक्या गोष्टी तुकामाईंनी महाराजांना सांगितल्या होत्या. महाराजांचे हेच अवतार कार्य असल्याने गुरु तुकामाईंनी ब्रह्मचैतन्य असे त्यांचे नामकरण करून या अवतार कार्यासाठीच वरदान दिले होते.

गोंदवल्यात वास्तव्य करून महाराजांनी हे कार्य अखंड करून प्रपंचामध्येच परमार्थ कसा करावा हे प्रत्यक्ष कृतीने हजारो-लाखो भक्तांना शिकविले. तुकामाईंनी महाराजांना कोणते वरदान दिले होते ? स्वतः श्रीमहाराजांनाच याबाबत एका सद्गृहस्थांनी पृच्छा केली. त्या वेळी श्रीमहाराज बोलले, '१) सर्वज्ञता - संपूर्ण ज्ञान. मला ज्या विषयी माहिती हवी असते ते ज्ञान मला लगेच होते. २) सर्वव्यापकता - कुठेही एका क्षणात जाणे. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी क्षणार्धात देहाने जाणे किंवा एकाच वेळी अनेक ठिकाणी प्रगट होणे. ३) जो माझा अनुग्रहित झाला त्याच्या संसारात ढवळाढवळ न करता त्याला नकळत संसाराची आसक्ती शोषून घेणे. ४) ज्याला मी माझा म्हटला त्याचा अंतकाळ साधून घेणे.

श्रीब्रह्मचैतन्य म्हणजे साकार झालेलं परब्रह्म स्वरूप. गोंदवले गावच्या भूमीवर हे परब्रह्म अवतरले. कोणी त्यांचेकडे अन्तब्रह्म म्हणून पाहिले तर कोणाला ते नादब्रह्म म्हणून वंदनीय ठरले. अवतार धारण केल्यापासून (इ. स. १८४५) तो अवतार समाप्तीपर्यंत (इ.स. १९१३) रामोपासना, नामस्मरण, स्वतः करणे आणि अनुग्रहितांकडून करून घेणे हेच एक कार्य त्यांनी केले. श्रीमहाराज सांगत की, जन्मल्यापासून अखेरीपर्यंत एका नामाशिवाय अन्य कशाचीही आठवण ठेवली नाही. हेच माझे चरित्र होय. फार थोड्या लोकांनी मला ओळखले. नामामध्ये

जे स्वतःला विसरले त्यांनाच मी थोडाफार कळलो. मी इथे नाही; मी तिथे नाही. मी गेलो नाही आणि जात नाही. मी फक्त नामात आहे. जेथे नाम आहे तेथे मी आहे.

श्रीक्षेत्र गोंदवले हे 'श्री' च्या वास्तव्याने आणि नामस्मरणाने पुण्यपावन झालेले पवित्र तीर्थस्थान असून शुद्ध परमार्थाचे सजीव केंद्र आहे ते यासाठी की समाधीरूपाने श्रीमहाराजांचे वास्तव्य या भूमीला अखंड लाभले आहे.

या समाधीस्थानाची निवड आणि योजना निरंतरच्या वास्तव्यासाठी महाराजांनीच करून ठेवलेली आहे. आज जेथे समाधीस्थान आहे तेथे पूर्वी गोशाळा होती. महाराज नेहमी गोशाळेत येत असत. गाईविषयी त्यांना नितांत प्रेम असे. समाधिस्त होण्याच्या म्हणजे देहत्यागाच्या आदल्या दिवशी सायंकाळच्या सुमारास महाराज गोशाळेत आले. गाईंच्या पाठीवरून त्यांनी प्रेमाने हात फिरवला. तेथेच एका विशिष्ट ठिकाणी थांबले आणि बोलले, 'मी थोडा वेळ इथे बसतो.' ते थांबले त्या जागेवर गवत वगैरे चारा पडलेला होता. गोशाळेत अभ्यंकर मास्तर या नावाचे गृहस्थ व्यवस्था पहात असत. त्यांनी महाराजांचे बोल ऐकताच जागा साफ केली. तेथे खुर्चीसारखे आसन आणून ठेवले. महाराज बसले. तेथील लोकांशी बोलताना श्री म्हणाले, 'ही जागा फार उत्तम आहे. इथे कायमचे येऊन रहावे असे मला फार वाटते.'

श्रीमहाराज तेथून परत जावयास निघाले तेव्हा पायातील पादुका-खडावा तेथेच काढून ठेवल्या आणि बोलले, या येथेच ठेवा. मी परत येतो.'

हे सूचक बोलणे कोणाच्या लक्षात आले नाही. लक्षात येणे शक्य नव्हते. परंतु दुसरा दिवस उजाडण्यापूर्वीच थोरले राम मंदिरात, महाराजांचे जेथे वास्तव्य असावयाचे त्या ठिकाणी, श्रीराम प्रभूंचे दर्शन घेऊन, निरोप घेऊन समाधी लावून बसले आणि महासमाधिस्त झाले.

श्रीमहाराज देहात असताना गोशाळेत ज्या ठिकाणी बसले होते आणि इथे कायमचे येऊन रहावे असे फार वाटते म्हणून बोलले होते त्याच ठिकाणी महाराजांचे प्रमुख शिष्य श्रीब्रह्मानंद यांनी विधीपूर्वक पादुकांची स्थापना केली.

श्रीमहाराज इ. स. १९०९ मध्ये कर्नाटकात बिंदरहळ्ळी येथे श्रीब्रह्मानंदांनी भरविलेल्या तेरा कोटी नामजपाच्या सांगतेसाठी गेले होते. त्या वेळी श्रीमहाभागवत डॉ. कूर्तकोटी यांनी महाराजांना कूर्तकोटी येथे नेले. डॉ. कूर्तकोटी यांनी महाराजांना सन्मानपूर्वक मारुतीरायाची मूर्ती आणि सुबक सिंहासनावर कोरलेल्या सुंदर पादुका अर्पण केल्या. श्रीमहाराज त्या सिंहासनारुढ पादुकांवर उभे राहिले आणि श्रीमहाभागवतांच्या हस्ते विधिपूर्वक पाद्यपूजेचा स्वीकार केला. पाद्यपूजा झाल्यावर श्रीमहाराज बोलले, 'या पादुकांची सध्या कोठेही स्थापना करू नये. चार-पाच वर्षांनंतर करू. तोवर येथेच ठेवून त्यांची नित्य पूजा चालू ठेवावी.'

पुढे चारच वर्षांनी श्रीमहाराज महासमाधिस्त झाले. (इ. स. १९१३). त्यानंतर शके १८३६ मध्ये श्रीब्रह्मानंदांनी श्रीमहाभागवत डॉ. कूर्तकोटी यांचेकडे नित्य पूजेत असलेल्या या पादुका गोंदवले येथे आणून समाधीच्या चौथऱ्यावर त्यांची विधिपूर्वक चिरप्रतिष्ठापना केली. या निर्गुण पादुकांच्या रूपाने श्रीमहाराजांचे या ठिकाणी निरंतरचे वास्तव्य झालेले आहे. 'जेथे नाम तेथे माझे प्राण, ही सांभाळावी खूण' हे श्रीमहाराजांचे महासमाधीस्त होण्यापूर्वीचे अखेरचे शब्द. समाधीचे दर्शन घेताना याची नित्य प्रचिती मिळते. समाधीवरील पादुका या साक्षात महाराजांचा पदस्पर्श झालेल्या, प्रसाद-पादुका आहेत.'

श्रीब्रह्मानंदांनी सद्गुरुंचे समाधीमंदिर बांधून तेथे जी नित्य-नैमित्तिक उपासना पद्धती घालून दिलेली आहे, त्यात अन्नदान, उपासना आणि नामस्मरण ही प्रधान अंगे आहेत. गोंदवले येथे मार्गशीर्ष वद्य प्रतिपदेपासून दशमीपर्यंत महाराजांचा पुण्यतिथी उत्सव होत असतो. याशिवाय गुरुपौर्णिमा, गोकुळअष्टमी, रामनवमी, हनुमान जयंती, दत्तजयंती हे उत्सव अव्याहत सुरू आहेत. गोंदवल्यात जोपर्यंत अन्नदान, उपासना व नामस्मरण सुरू आहे तोपर्यंत येथे कशाचीही, कधीही कमतरता पडणार नाही असे श्रीब्रह्मानंदांचे आश्वासन आहे. पहिला पुण्यतिथी उत्सव सुरू केला तेव्हा ब्रह्मानंदांनी काही चांदीची नाणी व एक पिशवी दिली होती. पुण्यतिथी उत्सवाच्या पहिल्या दिवशी, कोठी पूजनाच्या वेळी श्रीब्रह्मानंदांच्या सांगण्यानुसार या अक्षय पिशवीची आणि तीमधील नाण्यांची येथे प्रतिवर्षी पूजा केली जाते.

श्रीब्रह्मानंद हे श्रीमहाराजांचे मुख्य शिष्य होते. तसे महाराजांनी नियुक्त केलेले पहिले विश्वस्त होते. त्यांच्यापासून आजवर झालेल्या आणि सध्या कार्यभार सांभाळणाऱ्या विश्वस्तांच्या ठिकाणी अशी ठाम श्रद्धा आणि निष्ठा असल्याचे दर्शन घडते की गोंदवल्यात घडणारी प्रत्येक लहान-मोठी गोष्ट ही 'श्रीं' च्या सत्तेने घडत आहे. आपण केवळ निमित्त मात्र आहोत. या विश्वस्तांची एक उज्ज्वल परंपरा आहे. ते साधनी आहेत, निष्ठावान आहेत. निरपेक्ष आहेत. श्रींच्या इच्छेनुसार पण प्रेमाने, निःस्वार्थ बुद्धीने विश्वस्तपदाची जबाबदारी पार पाडावयाची आणि जें घडेल त्याचे कर्तृत्व श्रीमहाराजांचे या भावनेने कार्यरत रहावयाचे एवढेच हे विश्वस्त जाणतात.

अखंड नामस्मरण आणि अन्नदान हे गोंदवल्याचे वैभव आहे. श्रीमहाराजांचे हजारो अनुग्रहित येथे सतत येत असतात. गोंदवले तसे लहानसे गाव आहे. गावात फार काही सुविधा आहेत असेही नाही. माण तालुका हा मुळात दुष्काळी भाग आहे. गोंदवल्यात पैशाची श्रीमंती नसेल परंतु नामाची श्रीमंती मात्र दांडगी आहे. उत्सवाच्या पहिल्या दिवशी प्रतिवर्षी तेरा कोटी रामनामाचा संकल्प समाधीस्थानी करण्यात येतो व हा संकल्प समाधी मंदिराच्या परिसरात वास्तव्यास असणारे आणि बाहेरगावाहून येणारे भक्त पूर्ण करतात. उत्सवाच्या दहा दिवसांत, गुरुपौर्णिमा, रामनवमी, दासनवमी, गोकुळअष्टमी या वेळीही अखंड रामनाम पहारा सुरू असतो. येथील सेवक वर्ग कोणतेही काम करीत असताना - खाणे-पिणे, जेवणे, मंदिर परिसर साफसफाई करणे, भोजनपंक्ती वाढणे, स्वयंपाक करणे - कोणतेही काम असो मुखाने रामनाम घेतो.

समाधी मंदिराच्या परिसराचे वेगळे वैशिष्ट्य म्हणून सांगता येते ते असे की, परिसरात वावरत असताना श्रीमंत-गरीब, अधिकारी,

सामान्य माणूस, लहान-मोठी, प्रतिष्ठित वगैरे लौकिक जगातील ज्या गोष्टी पावलोपावली आढळतात त्याचा आढळ या परिसरात होत नाही. मान-सन्मान, वैभव, मोठेपणा या सर्वांचा विसर पडून सर्वजण स्त्री-पुरुष सेवाकार्यात, उपासनेत, नामस्मरणात रमलेले आढळतात. प्रत्येक पौर्णिमेस किमान बारा-पंधरा हजार भक्त मंडळी पंचक्रोशीतून आणि दूर दूर ठिकाणाहून मंदिरात दर्शनासाठी, प्रसादासाठी येतात. पण कुठे कसली गडबड नसते, गोंधळ नसतो. स्वयंशिस्तीने सर्व सुरू असते. येणारा प्रत्येकजण प्रसाद घेऊन म्हणजे यथास्थित भोजन करून परत जात असतो. वर्षानुवर्ष हे सर्व सुरू आहे. प्रसाद घेणे, निवास करणे इत्यादींसाठी व्यवस्थापनाची कोणाकडून कसलीही अपेक्षा नसते. मागणी नसते. अपेक्षा एकच असते - ती नामस्मरणाची ! 'कोणा मागू नका कांही ।' असे महाराजांनीच सांगून ठेवले आहे.

गोंदवल्यातील हा सर्व नित्याचा कारभार आणि व्यवहार पाहिला म्हणजे श्रीमहाराजांची सत्ता आणि शक्ती आजही तेथे कशी उपस्थित आहे आणि कार्य करून घेत आहे याचे दर्शन घडते. श्रीमहाराज म्हणायचे, 'साध्या घराची भिंत साध्या पायावर उभी रहाते. परंतु समुद्रातील भिंतीचा पाया फार खोल असावा लागतो. गोंदवल्याचा पाया तसा खोल पाहिजे. त्याकरिता होईल तितके नाम घ्यावे. तुम्ही नाम घ्यावे यापलिकडे सत्य सांगतो, मला कसलीही अपेक्षा नाही.'

'श्रीं'च्या या वचनानुसार गोंदवल्यात येणाऱ्या प्रत्येक भक्ताने होईल तितके नाम घ्यावे असा येथील व्यवस्थापकांचा आग्रह असतो. सुलभपणे नामसाधना करता यावी यासाठी आवश्यक त्या सर्व सुखसोयी उपलब्ध करून देण्याकडे त्यांचा कटाक्ष असतो.

गोंदवल्याचा सर्व परिसर नाम-तेजाने भारलेला आहे. या तीर्थस्थानात प्रवेश घडला की वृत्ती अंतर्मुख होते. समाधीचे दर्शन घेतले की काळजी, चिंता, भय यातून मुक्त झाल्याची अनुभूती मिळते. समाधीचे दर्शन घेतले याचा अर्थ आपल्या सर्व अडी-अडचणी, इच्छा महाराजांना निवेदन केल्या, आता ते पाहतील असा भाव मनात उमटतो आणि माणूस निश्चिंत बनतो. मनात परिवर्तन घडण्याची प्रक्रिया त्याच्या नकळत सुरू होते आणि तो नाम-साधनेत हळूहळू स्थिर होऊ लागतो. आत्मविकास होऊन आत्मदर्शन घडावयाचे तर अंतःकरणात, भगवंताचे म्हणजेच नामाचे बीज रुजावे लागते. श्रीमहाराजांनी देहात असताना हजारो माणसांच्या अंतःकरणात असे बीज रुजविले. हेच कार्य आज केवळ समाधीच्या सान्निध्यात, समाधी दर्शनाने घडून येत असल्याचे प्रत्ययास येते. माणसातील परमार्थ बुद्धी येथे जागृत होते आणि नामसाधनेत ती स्थिर बनते.

श्रीमहाराज हे गोंदवल्यात येणाऱ्या प्रत्येकाच्या प्रेमाचे, आदराचे, श्रद्धेचे, विश्वासाचे आणि निष्ठेचे केंद्रबिंदु असतात. येथील वास्तव्यात संसारी व्यथा, देहव्याधी, भौतिक स्वार्थ, मत्सर याचा आपोआप विसर पडतो आणि माणूस नामस्मरणात तल्लीन बनून वावरतो. येथील अणुरेणु नामाच्या तेजाने जसा भारलेला आहे तसा समाधानाने ओतप्रोत भरलेला आहे.

मानवाची सर्व धडपड सुख, समाधान मिळावे यासाठी असते. व्यवहारी जगात समाधान आणि मनःशांती ही गोष्ट अन्य कोणाकडून मिळत नाही. स्वतःची स्वतःलाच मिळवावी लागते. समाधान ही मनाची एक स्थिती आहे. संत-सत्पुरुषांनी सांगितले आहे तसे आचरण केले तर अशी स्थिती अंगी बाणवता येते. साधू-संतांनी यासाठी जे साधन सांगितले आहे ते म्हणजे नाम. कलियुगात दुसरा अवतार नाही. पण नामावतार आहे. तोच खरा तारक आहे.

श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज हे नामावतारी असून त्यांनी सांगितले आहे की नाम हे सर्वव्यापक असल्याने सर्वांना साध्य आहे. नाम हे अत्यंत देवाजवळ आहे. आपले मन आपण नामाशी चिकटविले तर नाम हे एक असे साधन आहे की त्यायोगे मन हे अधिकाधिक शांत व समाधानी बनत जाते. मनाच्या या अवस्थेत मनाचे इतर सर्व व्यापार थांबून ते निर्विषय, निर्लेप होऊन अनंत तत्त्वाकडे धावू लागते. ह्यालाच परमार्थ म्हणायला हरकत नाही. ही एक शुद्ध आनंदाच्या, सत्याच्या ज्ञानाची जीवनप्रणाली आहे. या संदर्भात श्रीमहाराजांचे स्वानुभवाचे बोल असे - 'डोळे उघडे ठेवून जग नाहीसे होईल तर ते नामानेच होईल हा माझा अनुभव तुम्ही घ्या.'

श्रीमहाराज नामस्वरूपात गोंदवल्यात आहेत याचा प्रत्यय पावलोपावली गोंदवल्यात आजही येतो. 'नामात मन ठेवा हे माझे खरे दर्शन आहे. नाम सूक्ष्मावर परिणाम करते. पण ते लवकर दिसत नाही. मी तुमचा भार घेतला आहे. तुमच्या जीवाची मूर्ति घडविण्याचे माझे काम सतत चालू आहे. मी सांगितले तेवढे करीन असा तुम्ही निश्चय करा. तुम्ही रामरूप व्हाल.' असे आश्वासन महाराजांनी दिलेले आहे. त्यांच्या या आश्वासनाचे आणि त्यांच्या अवतारकार्याचे सातत्य राखणारे गोंदवले आणि तेथील श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचे समाधीस्थान हे या भूलोकीचे दिव्य आनंद-धाम आहे.

या आनंद धामाचं वैभव काही आगळं-वेगळंच आहे. येथे येणारा प्रत्येक भक्त श्रीमहाराज हे एकच गुरु, ते एकच देव आणि त्यांनी सांगितलेले नाम हे एकच साधन या भावनेने येतो. श्रीमहाराज प्रत्यक्ष देहात असताना त्यांच्याकडे येणाऱ्या प्रत्येक जीवाकडे ते 'रामरूप' म्हणूनच पहात असत. ते स्वतःही रामरूपच होते. महासमाधिस्त झाले तेव्हा मानवी देहाचा त्याग करून सूक्ष्मरूपाने त्यांचे वास्तव्य झाले. या अवस्थेत महाराज गोंदवल्यास आहेत म्हणजे त्यांची शक्ती आणि सत्ता काम करीत आहे. याचे शेकडो दाखले उपलब्ध आहेत. त्यामुळे गोंदवल्यात येणारा भक्त त्यांचे दर्शन 'रामरूप' या भावनेने घेतो आणि नामस्मरण करतो. भगवंताचे अनुसंधान आणि अखंड नामस्मरण याशिवाय या आनंद - धामात अन्य काहीही प्रिय नाही याची त्याला तीव्रतेने जाणीव होते आणि त्याच्या हृदयामध्ये अखंड नामाची ज्योत तेवत राहाते. हे आहे या समाधीस्थानाचे, आनंद-धामाचे, श्रीमहाराजांच्या गोंदवल्याचे वैशिष्ट्य.

पश्यंति जोशी
गोंदवले समाधी मंदिर, गोंदवले.

# प्रेमात राम रमतो प्रेमाला ना मोल जगामाजि । हाचि सुबोध गुरुंचा गुरुरायाला तहान प्रेमाचि ॥

**डॉ. कु. कमल पटवर्धन (रामदासी)**

*औपचारिक शिक्षणानंतर आध्यात्मिक शिक्षणाच्या शोधात. प. पू. श्रीश्रीधरस्वामींच्या रूपाने सद्‌गुरु लाभ. त्यांच्या परंपरेतील आध्यात्मिक शिक्षण व वाटचाल. दोनदा श्रीनर्मदा परिक्रमा व अन्यत्र कारणपरत्वे देशाटन. 'कल्याण' मासिकात अधून-मधून लिखाण. सध्या जबलपूरमधे वास्तव्य व आपल्या परंपरेतील व्यक्तींना अध्यापन व मार्गदर्शन.*

'प्रेमरूपं स्वसंवेद्यं ध्यानगम्यं मनोहरम् ।
नामरूपगुरुं वंदे ब्रह्मचैतन्य विग्रहम् ॥'

भक्ती सः प्रेमस्वरूपच अमृतस्वरूपच ॥ असे नारदभक्तीसूत्र सांगते. प्रेमाची खरी साधना ही नामस्मरण भक्तीतून साकार होते. श्रीसद्‌गुरुंच्या श्रीमुखातूनच नवविधा भक्तीचे स्वरूप समजाऊन घ्यावे लागते, असा श्रृतीमातेचा निर्देश आहे. सद्‌गुरुंच्या हृदयात साकारलेला नवविधा भक्तीचा वृक्ष आत्मनिवेदन स्वरूपी भक्तीची फळे देतो. ज्यामध्ये सच्चिदानंद श्रीराम नामाचे बीज साठविलेले असते. हे सबीजरूप रामनाम शिष्याच्या अंतःकरणाच्या भूमीवर पेरण्यासाठी सद्‌गुरु आतुर असतात. पण शिष्याच्या अंतःकरणात ब्रह्मजिज्ञासा जागृत झाल्यावरच सद्‌गुरु ते सबीज नाम संक्रामित करतात. खरे तर ज्ञानाचा अधिकारी आध्यात्मिक आधिभौतिक, आधिदैविक तापत्रयांच्या वणव्यात होरपळून गेलेला शिष्यच असतो. या शिष्याला संसाराची क्षणभंगुरता प्रचितीस आलेली असते. म्हणून त्याचे संसाराबद्दलचे निरासक्त मन शाश्वत सुखाच्या शोधार्थ प्रवृत्त होते. त्याची मनाची संभ्रमित अवस्था त्याला अस्वस्थ करते. जगातील कशाचा आधार शाश्वत स्वरूपाचा आहे व कशाचा आधार शाश्वत स्वरूपाचा नाही हे त्याला स्पष्ट कळत नाही. म्हणून तो शाश्वत स्वरूपाची ओळख असणाऱ्या सद्‌गुरुंच्या शोधात निघतो. त्याचे आर्ततेने व्याकुळ झालेले मन भवसागरातून पार होण्यासाठी सद्‌गुरुरूपी तारुची वाट पाहात असते. सद्‌गुरुंच्या पूजेसाठी त्याच्याजवळ आत्मसमर्पणाचा नारळ व सद्‌भक्तीची गुरुदक्षिणा असते. डोळ्याच्या ज्योतीतून आर्त असणारे मन सद्‌गुरुंच्या आत्मस्वरूप तेजाची आरती करण्यास उत्सुक असते.

त्याच क्षणी स्वात्मानंदी निमग्न असलेले श्रीसद्‌गुरु शिष्याच्या आंतरिक हाकेला पावतात व प्रगट होतात. गुरु-शिष्यांचा भक्तीमय संवाद सुरू होतो. भयाने ग्रसित अज्ञानाने आवृत्त शिष्य अभय मुद्रेने आश्वासन देणाऱ्या ज्ञानस्वरूप सद्‌गुरुंना शरण जातो. शिष्याच्या कर्णात रामनामाच्या अमृतमय मुद्रेचा रस गुरु ओततात आणि गुरुशिष्य ऐक्याची परब्रह्म स्वरूप रामनामाची मुद्रा शिष्याच्या अंतःकरणावर ठसावते. शिष्याचा देह व मन गुरुंच्या स्वाधीन होते आणि तो सद्‌गुरुंचा अंकित साधक होतो. गुरुजवळ येताना ज्ञानेंद्रियांचे व कर्मेंद्रियांचे प्रतिक असलेले दोनही हात शरणागत मनाबरोबरच जोडून यावयाचे असते. भावांच्या समिधा गुरुंना अर्पण करावयाच्या असतात.

पदार्थ मने काया वाचा तो सद्‌गुरुंना शरण जातो. वैखरीत नाम घेतो, आपल्या कानाने नामाचे श्रवण करतो. त्या वेळी मी सद्‌गुरुंचा आहे अशी त्याची भावना असते. या अवस्थेत बाह्य त्यागाची भूमिका असते. सर्वही गुरुला अर्पण करण्याची भूमिका असते. पण सद्‌गुरुंना शिष्याची चिंता असते. शिष्याकडून केवळ बाह्य जड पदार्थांचा त्याग घडविल्यास शिष्याचे मन अंतर्मुख होणार नाही म्हणून संदेहरूप मनात भासमान होणारे विश्व व त्याची भीती जाण्यासाठी सद्‌गुरु त्याला आंतरिक त्यागाचा उपदेश करतात. ते शिष्याला विचारतात, मी तुला शाश्वत सच्चिदानंदरूप रामाची व त्याच्या प्रेमाची प्राप्ती करून दिल्यास तू मला गुरुदक्षिणा म्हणून काय देशील ? श्रीगोंदवलेकर महाराजांनी 'गुरुरायाला तहान प्रेमाची' या शब्दात गुरुंना शिष्याकडून काय समर्पण घ्यावयाचे आहे ते सांगितले आहे. शिष्य 'मी - माझे' या मायेत गुरफटलेला असतो. 'मी व माझे दोनही नश्वर ते सद्‌गुरु या गुंत्यातून सोडविण्यासाठी त्यांच्या चरणी अर्पण करून टाकण्याचा सल्ला देतात. अशा रीतीने शिष्यापासून अशाश्वत मायेचा त्याग घडवून शिष्याला शाश्वत स्वरूपाच्या राज्य पदवीची प्राप्ती अकस्मात प्रदान करावयाची असते. पांचभौतिक मायिकाचा त्याग घडत असताना पंचभौतिक देह, पंच ज्ञानेंद्रिये, पंच कर्मेंद्रिये, त्यांना जोडणारे मन व पंचभूतात्मक तन्मात्रा यांचेही समर्पण घडावे लागते. या अंतर्बाह्य सद्‌गुरुचरणी नाशिवंत समर्पित करण्याच्या प्रक्रियेत नामस्मरणाचे अनन्यसाधारण महत्त्व आहे.

नामस्मरणाचे तात्त्विक विवेचन खालीलप्रमाणे करता येईल. सद्‌गुरु आपल्या अंतःकरणातील 'तत्वमसि' हा बोध रामनाम मंत्राच्या दीक्षेच्या रूपाने शिष्याच्या अंतःकरणात घडवितात. 'राम' हे पद तीन वाचक पदांचे बनते. १) तत्पदवाचक 'रा' २) त्वंपदवाचक 'म' व ३) असिपदवाचक 'रा + म' जोडल्यानंतर दोनही ततूपद व त्वंपदाची ऐक्यात्मक स्थिती असिपदाने प्रकाशित होते. या तत्त्वज्ञानाचा अर्थ असा - स्वयंप्रकाश सच्चिदानंद परब्रह्मस्वरूप 'रा' या अक्षरात व 'म' या अक्षराने निर्देशित होणारी विश्वरुपिणी परब्रह्मी लयाला जाते. 'रं' हे अग्निबीज आहे. 'रा' या शब्दाच्या उच्चाराने चिद्‌ग्नीस्वरूप प्रगट होते आणि या अग्नित 'म' या अक्षराने उपलक्षीत माया आहुत होते. म्हणजेच मायेचे हवन होते. अशा रीतीने 'म' रूपी जाणिवेचे 'रा' रूपी परब्रह्मात ऐक्य असे हे जीवात्मा व परमात्मा यांचे ऐक्य घडविणारे

रामनाम आहे. रामनाम जीव-शिवाचे सामरस्यरूप ऐक्य दर्शविते म्हणून ते भक्ती व प्रेमाचे प्रतीक आहे.

श्रीरामनामाच्या उच्चाराबरोबर नाद उत्पन्न होतो. तो नाद एका बिंदुत लयाला जातो. बिंदुतून चित्कलारूपी श्रीसद्‌गुरुकृपेचे प्रगटीकरण होते व ही कृपा साधकाला सद्‌गुरुंच्या स्वानंदैकाच्या अंकावर विराजमान करते. शिष्याच्या स्थूल जडदेहाच्या अंतरी गतीमान असणारे मन समाधानाच्या प्राप्तीसाठी निश्चय होण्यासाठी नामसंकीर्तनाची कास धरते. शब्द हा आकाशाचा गुण असल्यामुळे शब्दाला व्याप्ती आहे. ही व्याप्ती स्वर व मातृका या रूपाने विश्वात प्रकट होते. लौकीक शब्द परेतुन पश्यंती मध्यमा - वैखरी या क्रमाने बाह्यसृष्टीत येतात. तर श्रीसद्‌गुरुंनी दिलेल्या राममंत्राचा निःशब्दाचे प्रतीक असणारा बीजमंत्र शिष्याला शब्दसृष्टीच्या आवर्तातून सोडवून बीज जिथे शब्द निर्माण होतात, लयाला जातात अशा निःशब्द स्थितीचा साक्षात्कार घडविते. रामनामाच्या उच्चाराने साधक सहजच आनंदस्वरूप असिप वाच्य अनुर्वाच्यात जातो. साधकाची 'म' रूपी जाणीवरूप प्रकृती म्हणजेच वृत्ती 'रा' रूपी परम पुरुषात ऐक्य पावते. सच्चिदानंद स्वरूप आत्मारामाचे सर्वव्यापी सूत्र साधकाच्या हाती आल्यामुळे साधकाचा देह, मन, बुद्धी सर्वही जागृत असूनसुद्धा साधक अंतरी शहाणा होतो म्हणजे निजसुखरूप आत्मारामात ऐक्य पावू शकतो. 'धृ' धारयते - धारणा हा बुद्धीचा धर्म आहे. जोपर्यंत बुद्धी प्रस्वरूपी राहणे या स्वधर्माची धारणा करीत नाही तोपर्यंत बुद्धी स्थिरावत नाही.

'वाच्यावाचकोयो अर्भेदः - सच्चिदानंद रामाचे नाव हे श्रीरामाच्या प्रकाशमय, ज्ञानमय, प्रेममय, आनंदमय स्थितीशी एकरूप असते म्हणून रामाच्या अनुसंधानाबरोबरच हे वरील रूप सहजच प्रगट होते. कानाने नामाचे श्रवण घडते, मनाने नामाचे मनन घडते, बुद्धीने रामाचे चिंतन घडते अशा प्रकारे जीवाला रामनामाचा निदिध्यास घडू लागतो. अशा ध्यानावस्थीत आवस्थेत मन पश्यंती वाणीत नामस्मरणाच्या माध्यमातून प्रवेश पावते तेथे श्रीरामदर्शन घडते. वैखरीतून नाम घेणे व ते ऐकणे यात 'मी' हा देवाचा आहे. असा हा अभ्यास सुरू होतो. मध्यमेतून नाम पश्यंतीत खोलवर जाते तेंव्हा देव व भक्त यामधील अंतर कमी होऊन 'मी' देवासाठी आहे, ही भावना दृढावते. जेव्हा पश्यंतीतून निघणारी ईश्वराची वाणी परावाणीत पोहचते तेव्हा 'अहं सः' हा बोध होऊन शिष्य गुरुचरणी सर्वार्थाने शरणागत होतो. तेव्हा मी नाही व केवळ सद्‌गुरुच आहेत हा बोध होतो. श्रीरामोपनिषदात याचे वर्णन 'सदा रामोऽहमस्मि इति । तत्त्वतः प्रवदंति ये ।। न ते संसारिणो नूनम्। रामोपनिषदि-स्फुटम ।।' असे केले आहे. अशा अवस्थेत साधक रामाच्या सत्तेत रामाच्या अहर्निश पूजेच्या माध्यमाने षड्गुणैश्वर्याचा अधिकारी होतो. षड्गुणैश्वर्य म्हणजे ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, यश, श्री व ओज यांची प्राप्ती म्हणजेच श्रीरामाच्या समीप जाऊन स्वरूपस्थ साक्षात्काराचा अधिकारी बनतो आणि सद्‌गुरुंच्या सानिध्यात गेल्यावर त्याला कळते मी अशाश्वत गोष्टींचा त्याग करून आलो आहे. तरीही मला मानसिक समाधान प्राप्त नाही. असे का असे त्याला वाटते. रात्रंदिवस नामस्मरण घडल्यावर सुद्धा हे मन चंचल का आहे तेव्हा या चंचळ मनाला आवरण्याची प्रार्थना शिष्य सद्‌गुरुंना करतो. शिष्याकडे गुरुंचे लक्ष जाते ही साधनाची दुसरी पायरी. सद्‌गुरुंचे स्वरूप व्यापक अस्तित्वमय रामाचे अधिष्ठान असल्यामुळे आपल्या व्यापक मनामध्ये शिष्याचे अज्ञान हरण करून शिष्याला ज्ञानमय करण्याची किमया असते.

सगुण साकार रूपात शिष्याचा सहवास श्रीसद्‌गुरुंबरोबर घडल्यावरच सद्‌गुरु शिष्याचा पूर्णपणे अंगिकार करू शकतात. सगुण साकार पूजेत जडदेहबुद्धी लयाला जाऊन सूक्ष्म मनोमय बुद्धीरूप सृष्टीत शिष्याचा प्रवेश होतो. या मनोमय स्फूर्तीरूप पसाऱ्याचे कारण 'अहं' म्हणजे 'मी' हे स्फुरण असते. पण ते तमोगुणाने आवृत्त असल्यामुळे या तमोगुणाचे म्हणजेच 'मी' स्वरूप अज्ञानाचा शुद्ध सत्वमय 'अहं' या सद्‌गुरुंच्या जगद्‌व्यापी जाणीवेत लय व्हावा लागतो. म्हणजेच हा महान अंतरात्मा प्रगट होतो. जो 'भक्तीचेनी योगे' खऱ्या देवाचे म्हणजेच आत्मारामाचे दर्शन घडवितो. ईशावास्य उपनिषदात या व्यापक जाणीवेबद्दलचे सुंदर वर्णन आहे. 'मी' रूपी अहंकाराचे झाकण लागल्यामुळे त्याच्या पलीकडील म्हणजेच अहंकाराच्या पलीकडील सर्वव्यापी स्वसंवेद्य रामाचे दर्शन घडविणारी चिन्मय अवस्था तिचे ज्ञान होत नाही. हे 'मी' रूपी अहंकाराचे झाकण सद्‌गुरु आपल्या शरणागत शिष्यासाठी उघडतात. तेव्हा वेगळा पडलेला 'मी' रूपी शिष्य 'तू'रूपी सद्‌गुरुंच्या अस्तित्वमय सागरात विलीन होतो. थेंबुटा सागरी मिळतो. सरितेचा सागराशी संगम होतो. मग शिष्य वेगळा राहत नाही. या वेगळे न राहण्याच्या नऊ अवस्थांचे वर्णन श्रीनारदांनी आपल्या भक्तिसूत्रात सांगितले आहे. सद्‌गुरु मुखातून देवाबद्दलचे यथार्थ ज्ञान ऐकणे हे श्रवण. कारण सद्‌गुरुंनी देव पाहिलेला असतो, अनुभवलेला असतो, देवाशी संवाद साधलेला असतो. त्यांच्या अनुभवाचे उद्‌गार ऐकणे हे श्रेष्ठ श्रवण होय. हेच ब्रह्मनिरूपण होय. या ब्रह्मनिरूपणाने मनाला देवाचा वेध लागतो. मनाच्या स्मृतीत ऐकलेले श्रवण उतरते व देवाचे गुणानुवादाचे संकीर्तनभक्तीत साधकाचा प्रवेश होतो. नामस्मरण आनंदाने, प्रेमाने सदासर्वकाळ घडणे ही भक्तीची तिसरी पायरी. पादसेवन भक्तीच्या मिषाने सद्‌गुरुंच्या अंतरी प्रगट असलेल्या रामाचे साधकाकडून अर्चन, वंदन, नमन, दास्य घडते. या सातही भक्तींच्या अवस्थांतून रामनामाच्या मुद्रेने अंकीत झालेला साधक सद्‌गुरुंच्या चरणी समर्पित झाल्यामुळे कृतकृत्य होतो. त्याची जड देहबुद्धीची वृत्ती हरपते. लयाला जाते.

यानंतर साधकाला एक चिन्मय मानसिक अवस्थेची दृष्टी प्राप्त होते. त्याच्या प्रत्येक मानसिक अवस्थेतून पंचोपचार पूजा सुरू होते. शिष्याचे उर्ध्वमुख मन गुरुंच्या पाद्य-पूजेचे चंदन बनते. तर कधी नामस्मरणरूपी पुष्प गुरुंच्या चरणांवरची पुष्पांजली ठरते. कधी धुप बनून मन गुरुचरणी समर्पित होते तर कधी दीप बनून गुरुचरणांची आरती करते. अतींद्रिय मनाला आलेल्या नानाविध अनाहत नाद व प्रकाशदर्शन या अनुभवांचा नैवेद्य समर्पित होतो. ही अंतर्पूजेतील सामग्री गुरुचरणी पंचम तन्मात्रेच्या स्वरूपात समर्पित होते. साधकाच्या आंतरिक विश्वाचे समर्पण झाल्यावर साधक आत्मनिवेदन भक्तीच्या अभेद भूमिकेवर आरुढ होतो. गुरुवाक्यरूपी रामनामाच्या प्रेमनौकेमध्ये आरुढ झाल्यावर गुरु ही नौका चालवित असल्यामुळे मी हे स्फुरण व्यापक

परब्रह्मात लयाला जाण्याचा आत्माभ्यास सद्‌गुरुंच्या सान्निध्यात सुरू होतो. आत्मारामाच्या अस्तित्वमय स्थितीचे रामनाम वाच्य आहे. ज्या आत्माराम स्वरूपाच्या पदी अखिल विश्व उत्पत्ती स्थिती लयाला पावते ते रामपद सर्वव्यापक नित्यानंद प्रेममय असते. श्रीरामनामाच्या अनुसंधानात मन मग्न होते त्या वेळी नादानुसंधानाच्या प्रभावामुळे इंद्रियावाटे मनाचे धावणारे कार्यकारी अस्तित्व शनैः शनैः लयाला जाते. अशा रीतीने मन इकडे तिकडे न जाता केवळ सद्‌गुरुंच्या चरणी स्थिर होऊन तिथेच रममाण होऊ लागते. याच अवस्थेला श्रीगोंदवलेकर महाराजांनी 'प्रेमात राम रमतो प्रेमाला ना मोल जगामाजि ।' असे म्हटले आहे.

'मनाचे ते एक बरे । मोहरेतांचि मोहरे ।।' मनाचा एक स्वभाव आहे. ज्या वेळी मन एका विषयावर एकाग्र होते त्या वेळी ते दुसरीकडे जाऊ शकत नाही. स्वात्मानंदवाचक रामनाम मनाला आनंददायी असल्यामुळे रामनामाच्या अनुसंधानात मन अंतर्मुख होऊन आनंदी होते. जरी साधकाच्या बाहेरील विश्व कार्यकारी असूनही मनाची गती अंतर्मुख असल्यामुळे बहिर्मुख विश्वाचा प्रभाव साधकाच्या अंतःकरणावर पडत नाही. असे नामस्मरणात तल्लीन झालेले अंतर्मुख मन श्रीसद्‌गुरुंच्या किंवा इष्ट देवतेच्या अस्तित्वात रममाण झाल्यामुळे त्याच्या मनाचे भासात्मक अस्तित्व हे केवळ सद्‌गुरुंच्या सगुण साकार व निर्गुण निराकार रूपापुरतेच भासमान होते. इतर विश्वाबद्दल भासमान होत नाही. याचे वर्णन श्रीसमर्थांच्या आत्माराम ग्रंथात खालीलप्रमाणे आहे.

'माया योगियांची माऊली । जेथील तेथे नेऊन घाली ।। कृपालुपणे नाथिली आपण होये ।।' हे ऐक्यात्मक ज्ञान शिष्याला प्राप्त होऊनसुद्धा सूक्ष्म मनाचे अहंकाररूप अस्तित्व संदेह रूपाने त्रासदायक ठरते. संदेह संपूर्ण मावळल्याशिवाय पूर्ण ज्ञानाची प्राप्ती होत नाही. अज्ञानात संदेहाची व्याप्ती असते. कारण शब्दाची उत्पत्ती आकाशापासून झाली. आकाश तमातून निर्माण झाले. तम म्हणजेच अज्ञान. स्वरूपाबद्दलचे अज्ञान म्हणजेच हे आवरण. शिष्याला गुरुपदी ऐक्य पावण्यासाठी हे अज्ञान म्हणजेच आवरणात्मक तम बाधक सिद्ध ठरते. स्वात्मबोध या ग्रंथात त्याचे वर्णन 'तुजवरीच तुझे तम दाटले.' असे आहे. म्हणजे जसे ढगामुळे आकाश झाकले जाते व सूर्य दिसत नाही पण थोड्या वेळाने, सूर्य प्रगट होतो व मेघ बाजूला सरकतात. तद्‌वतच शिष्याचे हे 'मी' रूप अज्ञानाचे आवरण सद्‌गुरुप्रेमाच्या ज्ञानमय प्रकाशात लयाला जाते. शिष्य निःसंदेह होतो. सद्‌गुरुंसाठी जगतो. शिष्याच्या दृष्टीत अंतर्बाह्य फरक पडून त्याची सृष्टीकडे पाहण्याची दृष्टीच बदलते. त्याचे जीवनातील सर्वही उपचार सद्‌गुरुंच्या सेवेसाठी घडतात. 'सेवेलागी देह देहेवीण राहे । दिनकर पाहे नवलाहो ।।' ही सद्‌गुरुप्रेमाची पराकाष्ठा होय. आनंदरूप श्रीराम नामरसात बुडून तृप्त झालेले सद्‌गुरु शिष्याच्या अंतःकरणावर रामनामाची मुद्रा अंकित करतात. त्यानंतर देहाला 'मी' म्हणून मानणारा शिष्य जगाला आत्म्याच्या प्रकाशातून पाहावयास शिकतो. नाना वृत्तींच्या जंजाळात गोंधळून जाणारा जीव एका राममय वृत्तीच्या सागरात या अनेक वृत्तींची तिळांजली देतो. नानाविध निश्चयांच्या अवलंबनासाठी बहिर्मुख धावणारी बुद्धी बाहेर बघण्याचे थांबवून आत बघू लागते, रामपदी तन्मय होते, परब्रह्मी लयाला जाते. नामस्मरणाच्या माध्यमाने रामनामाचे अनुसंधान म्हणजेच नादानुसंधान. ज्याच्या योगे चंचल मन व चंचल पवन हे दोनही स्थिरावतात. त्यामुळे चित्ताची एकाग्रता होते. मनाच्या अंतर्मुखतेत चित्ताचे संस्कार परिशुद्ध होतात, मनाचे उन्मन होते. शुद्ध जाणीव हीच प्रकाशमान होते. हीच सतरावी जीवनकळा शिष्याच्या अंतःकरणात उदय पावते. जड देह भाव हरपतो. मनाचे व्यापार थांबतात. मन लयाला जाते. बुद्धीचे साक्षीत्व 'मी' या तुरीय अवस्थेत पोहोचते. 'मी' शिवस्वरूप अंतरात्मामय बनते; 'तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ।' इति । व्यापक विष्णु म्हणजे आत्माराम. व्यापक शिव म्हणजे अंतरात्मा म्हणजेच एकोऽहम् ही ईश्वराची स्फूर्ती, एकोऽहम् अंतरात्मामय शिवस्वरूपाचे ऐक्य आत्माराम स्वरूपात होते. या हरिहरांच्या सामरस्यमय प्रेममय अवस्थेला 'राम' या वचनाने संबोधिले जाते. हीच ऐक्यरूप स्थिती संजीवन समाधी असते.

प. पू. श्रीगोंदवलेकर महाराजांनी आनंदमय, प्रेममय रामनाम सर्वांसाठी प्रगट केले. त्यांचा अवतार स्वतः रामनामात दंग होऊन रामनामरूपी प्रभुप्रेम वाटण्यासाठीच झाला होता. ही दुर्लभ सहजावस्था श्रीरामनामाच्या स्मरणाने प्राप्त होऊन साधक श्रीसद्‌गुरु गोंदवलेकर महाराजांच्या स्वरूपात मुक्तीचा अधिकारी होतो. ज्या वेळी साधक रामनामात स्वतःला विसरतो तेव्हा, 'सः युज्यते' म्हणजेच सद्‌गुरुपदी ऐक्य पावून सायुज्यमुक्तीचा अधिकारी होतो.

श्रीश्रीधरस्वामींच्या शब्दात 'स्वरूप रामाचे मनी आठवावे । नाम उच्चारावे रात्रंदिवस ।। तया नाही शोक तया नाही दुःख । दास म्हणे एक राम ध्याता ।।' अशी ही प्रेममय नामस्मरणाची गंगोत्री जीवाला पावन करून श्रीसद्‌गुरुपदी ऐक्यरूपता प्राप्त करून देते. इहपर कृतार्थ होऊन आत्मनिवेदन घडविते.

डॉ. कमल पटवर्धन
३६, इंद्रपुरी कॉलनी, नर्मदा रोड,
जबलपूर - ४८२००८. फो. - ४१०८७०

- **आम्हाला कर्तेपणानेच काहीही झाले तरी करता येते. कर्तेपणाला सोडून काहीच करता येत नाही. नामस्मरण हे साधन सोपे असूनही आमच्या कर्तेपणाला सोडून असल्यामुळे आम्हाला ते आवडत नाही.**
- **परमार्थ पोळलेल्यां करता आहे. आम्ही तर निवांत आहोत.**
- **भगवंताच्या साक्षित्वाने कर्म करणे हे खरे सत्कर्म आहे. त्यावाचून ते सत्कर्म होत नाही. नुसते कर्म होते.**

# निवडुंग

## श्री. श्रीपाद गोविंद जोशी

*शासकीय सेवेतून निवृत्त. श्रीब्रह्मचैतन्याचे पोस्टमन अशी त्यांची धारणा. 'बोलक्या परास मुकी बरी' हे श्रीब्रह्मचैतन्यांच्या चरित्रांतील मुक्या प्राण्यांच्या भक्तीवरील लोकप्रिय पुस्तक. दुसरी आवृत्ती, व्यक्ती चरित्रे आणि स्मरणिकांची १९ पुस्तके प्रकाशित. सध्या 'चैतन्यजप संकुल' हा अध्यात्मिक प्रकल्प राबवीत आहेत.*

(कथासूत्र श्रीसद्‌गुरु ब्रह्मचैतन्यांच्या प्रथम पत्नी सौ. सरस्वती, थोरल्या आई - त्यांच्या जीवनावरील 'माझा खेळ मांडिला' - या लवकरच प्रकाशित होणाऱ्या पुस्तकातील हे एक व्यक्तीचित्रण.)

द्वारका आत्या म्हणजे आबांची चुलत चुलत बहीण आणि त्या आबांच्यापेक्षा दोन वर्षांनी वडील. तरीपण आम्ही सारी भावंडं त्यांना द्वारका आत्या म्हणत असू. थोड्याशा सावळ्या वर्णाची शेलाट्या अंगाची पण कामाला अगदी वाघ असलेली ही आमची आत्या.

- पण

- पण माझी आजी म्हणायची 'द्वारकीची बत्तीशी म्हणजे –'

लहानपणी द्वारका आत्या माझं किती कौतुक करायची. ती कातरखटावाहून आली की मला फार आनंद व्हायचा. आत्या आली की मी खुशीत असायची. मला वाटायचं आपण कातरखटावला आत्याच्या घरी राहायला जावं. तिच्या परसातल्या सीताफळीची सीताफळं मला खूप आवडायची.

- आणि खरं सांगू का ? कधी कधी मला आमच्या आईपेक्षा द्वारका आत्याच जास्त आवडायची. मला आवडतात म्हणून ती मुगाचे लाडू आणायची. द्वारका आत्याची बैलगाडी आमच्या वाड्याच्या दारात थांबली की तिचं गाठोडं उतरायला मी पळत जायची. माझा आत्याकडं असलेला ओढा आणि आत्याचा माझ्याकडं असलेला लळा पाहून माझी आई एकदा गमतीनं द्वारका आत्याला म्हणाली होती, 'वन्संबाई, सरस्वती तुम्हाला भारी आवडती तर न्या तिला तुमच्या कातरखटावला.'

आईचं ते वाक्य ऐकल्यानंतर मला खूप बरं वाटलं. आपल्याला आत्याच्या घरी राहायला मिळणार या गोष्टीचा मला फार आनंद झाला. आईच्या त्या वाक्यावर माझ्याकडं बघत बघत द्वारकाआत्या आईला म्हणाली, 'नाहीतरी मी सरस्वतीला माझ्या घरी नेणारच आहे. मी ते केव्हाच ठरवलंय. बरं का वहिनी, तिचंच घर आहे ते.'

७-८ वर्षांच्या माझ्यासारख्या पोरीला त्या नणंदा भावजयीच्या बोलण्यातला सरळ अर्थ समजत होता. त्या वाक्याचा गर्भितार्थ कळण्याचं माझं ते वयही नव्हतं. आणि तो अगदी कळायला हवा असंही नव्हतं. पण माझ्या आईला द्वारकाआत्याचं ते वाक्य आवडलं नव्हतं. ती म्हणाली, 'वन्सं, तशी कायमची नाही यायची सरस्वती तुमच्या घरात.'

'का ? न यायला काय झालं ? मनात आलं की सगळं होतं.' आत्या.

'पण मनात यायला हवं.' आई म्हणाली.

'काय गैर आहे गं त्यात ?' आत्या.

'ते काही मला माहीत नाही. पण इकडच्या मनात तसं काही नाही आणि मामंजींच्या मनात तर हा विचार मुळी यायचाच नाही.' आई.

'काकांच्याच मनात नसेल तर मग नाही बाई जमायचं.' आत्या.

आणि मला वाटतं नेमकं या क्षणापासून आत्याच्या मर्जीतून मी उतरले. तिच्या मनाला तो डंख सहन झाला नाही हे खरं. पण त्याचा परिणाम मात्र तिची माझ्याकडची ओढ कमी होण्यात झाला. बायकांचा स्वभावच असा असतो. धतरा, -

मी 'आत्या, आत्या' करून तिच्या मागं मागं करायची पण ती दुर्लक्षच करी. तिच्या मनात माझ्याबद्दलची ओढच उरली नाही. आत्याच्या मनातलं माझ्याबद्दलच्या आपलेपणाचं रसरशीत रोपटं मग हळूहळू वाळायला लागलं. मी त्याला 'आत्या, आत्या' करून प्रेमाचं पाणी घालायची पण ते बाळसेदार रोपटं एकदा खुरपटलं ते खुरपटलंच.

माझं लग्न झाल्यानंतर तर त्या रोपट्याची मूळ तुटलीच.

आणि तिथं अढीचा निवडुंग वाढायला सुरुवात झाली. या निवडुंगाचे काटे पुढं साऱ्या आयुष्यभर मला टोचतच राहिले. पण त्या टोचण्याची कधी बोच मला लागली नाही. आणि त्याचं कारण म्हणजे यांची जागती सोबत.

माझ्या लग्नानंतरच्या प्रत्येक गोष्टीची चिकित्सक चिरफाड द्वारका आत्याकडून कधी झाली नाही असं नाही. माणसं अशी एकदम कशी बदलतात हे मला अजून समजत नाही आणि हे असं वागल्यानं या माणसांना काय मिळतं कुणास ठाऊक ? दुसऱ्याचं सुख न पहावणारी ही अशी माणसं पाहिली की मला अगदी वाईट वाटतं. मी तिची सून झाले नाही यात माझा काय दोष होता ? पण तरीही ती दुस्वास करायची.

लग्न झाल्यानंतर थोरले मामंजी आम्हा दोघांना घेऊन पंढरपूरला गेले होते. 'गणराया' म्हणजे त्यांचा लाडका नातू आणि विठ्ठल-रुक्मिणी त्यांचं आराध्य दैवत. सहाजिकच आषाढी वारीला त्यांनी आम्हा दोघांना पंढरीला विठ्ठल-रुक्मिणीच्या दर्शनाला नेलं.

आता वारीला नेलं यात थोरल्या मामंजींनी काही गैर केलं नव्हतं. पण द्वारका आत्या त्यावर काय म्हणाली ते मला एकदा आईनं सांगितलं होतं. द्वारका आत्या म्हणाली होती, 'सरस्वतीच्या नशिबात एवढ्यातच वारी यायला नको होती. अहो लाडका नातू आणि लाडकी नातसून झाली म्हणून लिंगोपंतांनी त्यांना वारीला कशाला न्यायचं ? काही कुलधर्म, कुलाचार तरी पाहायचा होता.'

तिला काय म्हणायचं होतं त्याचा मला उलगडा होत नव्हता. वाऱ्या

करायला लागायच्या या तिच्या वाक्यात तिनं कसल्या अभद्र विचारांचा उग्र मसाला भरला होता कोण जाणे ? ते तिचं तिलाच माहीत. पण इकडून घर सोडून जाणं झाल्यानंतर माझं सारखं गोंदवल्याला आणि खातवळला येणं-जाणं घडायचं. त्या वाऱ्या तिच्या मनात आल्या होत्या काय ? आणि या अशा माणसांची बत्तीशी तशी कधी खोटी होत नाही.

पण असा विचार जरी मनात आला तरी लगेच आतल्या आत ऐकू यायचं, 'अगं सरस्वती, सगळ्याच जणी अहिल्या, कुंती, द्रौपदी, मंदोदरी नसतात. अगं कुणीतरी कैकयी, आनंदी, पूतना, मंथरा व्हायला नको का ?'

आमचं लग्न झाल्यानंतर अवघ्या आठ महिन्यांच्या आत थोरले मामंजी अन् थोरल्या सासूबाई गेल्या. तसे त्यांचे म्हातारपण झाले होते. पण जगाची रीत कशी असते ते सांगते तुम्हाला. 'लिंगोपंत गेले. भला माणूस गेला. पण भाग्यवान माणूस नातू, नातसून पाहिली. त्यांची पुण्याई मोठी.' असं कुणी म्हणायचं तर कुणी म्हणत 'पंत गावचा आधार होता. पंतांच्या जिवावर रावजी सुखात होता. आता एवढ्या पसाऱ्याचा व्याप रावजीवर अन् गीताबाईवर पडला.'

पण आमची द्वारका आत्याच्या तोंडची मुक्ताफळं ऐका. 'सरीच्या लग्नाला अजून वरिस व्हायचंय तेवढ्यात आजे सासरा गचकला. हा नातसुनेचा पायगुण. कशी माया आता हिच्या सासू-सासऱ्यांना लागायची.' पण खरं सांगते मामंजी सासूबाईंनी कधी एका शब्दानंही मला दुखवलं नाही.

अशीच एकदा मी खातवळला आले होते. इकडचा काही ठावठिकाणा लागत नव्हता. गोंदवल्याला जायची तशी ओढ असायची नाही. हे नसल्यानं माझं सगळं आयुष्यच उस्कटून गेलं होतं. तर खातवळलाच राहिले. आबा आणि आई माझ्या काळजीत असायचे. आईचे नवस सायास सतत चालू असायचे. आईनं माझ्यासाठी सोळा सोमवार करायचं ठरवलं म्हणून मी पाच महिने राहणार होते. त्या वेळी एकदम आमच्या आत्याबाई आल्या. अलीकडे ती आमच्याकडे उतरायची नाही. निळूकाकांकडे उतरायची. एकदा घरी आल्यावर तिनं आईला विचारलं, 'सरू केव्हा आली गोंदवल्याहून ?'

'झाले चार महिने.' आईनं सरळ उत्तर दिलं. खरं तर आत्याला सगळं माहीत होतं. पण काही माणसांना तशी चांभार चवकशा करायची सवयच असते.

'हं बरी आठवण झाली बाई. अगं शारदालाही चार महिने झाले. आता पाचवा लागेल. आता नातू होतोय का पाहायचं !' असं म्हणून द्वारकाआत्यानं माझ्याकडं अगदी निक्षून पाहिलं. त्या निवडुंगाचा काटा माझ्या काळजात घुसला. तिला काय म्हणायचय ते मला तिच्या डोळ्यांतून कळत होतं.

'पाचवा लागेल का ? मग बाळंतपण कुठं ? माहेरी नेणार आहेत का कातरखटावला घरीच ?' आईनं अगदी सरळ विचारलं. माझी आई तशी सरळ स्वभावाची. पण लगेच त्यावर द्वारका आत्या म्हणाली, ' माहेरी कुठली नेतायत तिला ? आमच्या का तोलामोलाची मंडळी आहेत ? कुठं आमचा व्याप, आमचा पसारा आणि कुठं कुडत्यात पाणी घेऊन जगण्याचं त्यांचं जिणं ? कारतखटावलाच करणारायं!' आत्याच्या बोलण्यातला ठसका, गर्व आणि शारदेच्या माहेरचा उद्धार मला मुळीच आवडला नाही. त्याच्यापेक्षा तिची ती माझ्यावरची धारदार नजर मला काट्यासारखी टोचत होती. माझ्या अगदी ओठांवर आलं होतं की म्हणावं, 'बरं झालं आत्या, मी तुझी सून झाली नाही ते. अगं गोडसे मंडळी तरी तुमच्या तुलनेनं कमीच की.' पण का कोण जाणे मी बोललेच नाही. माझंच नव्हे पण असं कितीतरी माणसांचं होतं. अगदी ओठांवर आलेले शब्द माणसाला बोलायचं धारिष्ट होत नाही. ते धाडसच आमच्यासारख्या नेभळ्या माणसांना करवत नाही हेच खरं.

मी बोलले नाही पण माझ्या कानांत मात्र यांचे शब्द ऐकायला आले, 'सरस्वती, अगं दुसऱ्यांच्या जिवाला लागेल असं कशाला बोलायचं? आत्या वर्मी बोलली की आपणही तसंच बोलायचं का ? अगं साप माणसाला चावतो तो त्याचा धर्मच आहे पण म्हणून माणूस कधी माणसाला चावायला गेलाय का ?'

महाभारतातल्या शकुनींची आठवण मला आमच्या आत्याकडं पाहिल्यानंतर येते. पांडवांच्या बद्दलचा खरा द्वेष, खरी असूया ही शकुनीच्या अंगात अगदी रोमरोमी भरली होती. दुर्योधन, दुःशासन यांच्या मनातसुद्धा पांडवांच्याबद्दल शकुनी एवढी तेढ नसेल. पांडवांच्या उणेपणांवर दंश करण्याची एकही संधी शकुनी कधी सोडत नसत. शकुनी मामा आणि द्वारका आत्या मला सारखेच वाटत. तसे पाहिलं तर पांडवांच्या चुलत भावांचा मामा म्हणजे शकुनी हे काही फारसं जवळचं नातं नव्हतं. तरीपण पांडवही शकुनींना मामाचा मान देत. पण ते पांडवांचं कधीही भलं चिंतीत नव्हते. पांडवांच्या पराभवानं शकुनीचा काय फायदा होणार होता ? तरीपण गांधार देशीचा राज्यकारभार पाहायचं सोडून शकुनी मामांनी आपली उभी हयात कुंतीपुत्रांचा द्वेष करण्यात घालवली. शकुनींच्या रक्तात पंडुपुत्रांचा हा द्वेष भगवंताने का घातला हे एक कोडंच आहे. अगदी तस्सं माझ्या चुलत आत्यानं माझं अहित चिंतण्यानं काय साधलं हे एक न उलगडणारं कोडंच आहे.

पण मग मला वाटायचं महर्षी व्यासांनी अनाठायी द्वेष करणारी ही व्यक्ती उगीच नाही निर्माण केली. कुठला तरी एक सल मनात ठेवून निष्कारण एखाद्याचा द्वेष सतत करणारी ही शकुनी प्रवृत्ती समाजात सतत असते. ही प्रवृत्ती प्रत्येकाच्या मनात थोडीफार असतेच. गोंदवल्याच्या भागीरथी काकू त्यातल्याच.

एकदा गोंदवल्याला कातरखटावची कुणी मंडळी आली होती. फडतऱ्यांच्या पाहुण्यांपैकी होती. त्यांनी बोलता बोलता फडतऱ्यांच्या पुतळाबाईला विचारलं, 'हितं खातवळच्या आबा बामणाची ल्येक घुगुरदऱ्याच्या पोराला दिल्याली हाय नव्हं ?'

'व्हय, सरस्वती - गुणबुवाची बायको ती.' पुतळाबाई.

'पर गणुबुवाला मारुन टाकायला नव्हं. आन् त्ये ह्या माणसान्नी माहीत नाही नव्हं ?' त्या कातरखटावच्या माणसांनी पुतळाबाईला विचारलं. पुतळाबाई त्यांच्याकडं पहातच राहिली. ती मंडळी पुढं म्हणाली, 'नव्हं ती आबा बामणाची पोरगी अजून कुकू लावतीया म्हणं.'

'छे छे ! अहो गणुबुवा तसा नाही. येईल परत.पण हे तुम्हाला कुणी सांगितलं ?' पुतळाबाई.

'तकडं लोक म्हणत्याती. द्वारकाबाईबी म्हणाली.'

हे सगळं जेव्हा मला समजलं तेव्हा माझा धीरच खचला. गंगेहून पाणी आणताना कुणीतरी मला सांगितलं. अन् माझ्या हातापायांना मुंग्याच आल्या. द्वारकाआत्याचं नाव ऐकून तर मी अगदी घाबरलेच. तिची वाचा -,

पण

पण पिंपळाजवळ मी कशीबशी आले तेव्हा माझ्या कानी शब्द आले, 'सरस्वती, गावगप्पांवर माणसानं विश्वास कशाला ठेवायचा ? मायावी रावणाने रामाचे शीर अशोक वनातल्या जानकीपुढं ठेवलं पण जानकी तसूभरसुद्धा विचलीत झाली नाही की शोकाकुल झाली नाही आणि तू अशी का बावरलीस ?'

अगदी इंकडचेच ते शब्द होते. मला धीर आला. मी सावरले. पिंपळ शांत उभा होता. आजूबाजूला मात्र निवडुंगाच्या काटेरी फड्या होत्या.

मी अगदी तृप्त मनानी हसले. यांची सोबत होती मला. माझ्या तोंडून शब्द गेले, 'निवडुंग'..

श्री. श्रीपाद गो. जोशी,
१२१, यादो गोपाळ पेठ, सातारा ४१५ ००२.

# मला सापडलेले महाराज

**सौ. माधुरी सुरेश नाकाडे**

*बी. ए. मराठी, एम.ए. समाजशास्त्र. संगीत माध्यमा पूर्ण. हस्तकला, समाजसेवा संतवाङ्मयाबद्दल आवड. संज्ञा संवर्धन मतीमंद मुलांकरिता संस्थेमध्ये योगदान.*

'नामाचे अनुभव ज्याचे त्याला. ते सांगू नयेत हे खरे, पण नामस्मरण करणाऱ्या माणसाची नामावरील श्रद्धा घट्ट व्हावी ह्या शुद्ध हेतूने नामाचे अनुभव सांगायला सद्गुरु परवानगी देतात. म्हणून प्रचीति सांगण्यास दोष नाही.' असे श्रीगोंदवलेकर महाराजांचे परमशिष्य श्री. के. वि. बेलसरे आपल्या 'नामामृत-पान' मधे सांगतात.

'प्रेम नये सांगता, बोलता, दाविता, अनुभव चित्ता चित्त जाणें' अगदी हीच स्थिती श्रीमहाराजांच्याबद्दल माझी झाली आहे. शाळेत असताना मासिकांमधे आलेले भविष्य बघण्याचा मला अगदी छंदच होता. त्यातच 'धनुर्धारी' मासिकांतील भविष्य अगदी तंतोतंत लागू पडतं ही मनाची धारणा झालेली असल्याने अगदी अगत्याने ते पाहण्याची उत्सुकता असे. त्यात श्रीअक्कलकोट स्वामी महाराज, श्रीगोंदवलेकर महाराज यांचे उल्लेख असत. मी विदर्भातील वर्ध्याची असल्याने आणि पुण्या-मुंबईकडे एखादेच नातेवाईक असल्यामुळे त्या उल्लेखापलीकडे काहीच माहिती नसे. परंतु श्रीगोंदवलेकर महाराजांचे नाव ऐकून मात्र होते.

लग्न झाल्यानंतर ४-५ वर्ष (१९७८ ते ८२) नवी मुंबई (वाशी) येथे राहिल्यानंतर ज्या वेळी मी नागपुरात आले त्या वेळी बऱ्याच सामाजिक व सांस्कृतिक संस्थांशी संबंध आला. तशातच एका रांगोळी स्पर्धा व हार ओवण्याच्या स्पर्धेचे परीक्षक म्हणून मला बोलाविण्यात आले. ज्यांच्या हॉलमधे ही स्पर्धा होती ती झाल्यानंतर त्यांनी खाली चहा-पाण्याला बोलावलं, तेव्हा त्यांचं सुंदर देवघर पाहून मी त्यांना म्हटलं, 'मी आत जाऊन नमस्कार करू का ?' माझं दर्शन घेणं झालं. मी घरी आले, पण देवघर काही मनातून जाईना. त्यांचे राम माझ्या मनात घर करून राहिले. त्या रात्री मला स्वप्नात त्यांचे राम दिसले व आपल्या घरी जे देवीबालाजी आहेत त्यांचेच हे रूप आहे, ही जाणीव मला झाली.

दुसऱ्या दिवशी मी पुन्हा माझ्या एका मैत्रिणीला सोबत घेऊन त्यांना भेटून सांगितले की मला तुमचे देवघरातील राम दिसले. तेव्हा त्या म्हणाल्या, 'आमचे राम सहसा कुणाच्या स्वप्नात जात नाहीत. पण काहीतरी नक्की प्रयोजन आहे तुम्हाला 'रामा' ने दर्शन देण्यात ! आजपासून हे घर माहेरघर समजा.' त्या देवघरात मला श्रीमहाराजांचा 'फोटो' दिसला. मी विचारलं की हा फोटो कोणत्या महाराजांचा आहे ? तेव्हा त्यांनी मला महाराजांची माहिती सांगितलीच सांगितली व चरित्रही वाचायला दिले व अगदी त्याच दिवसापासून मला श्रीमहाराजांचं प्रेम मिळालं, त्यांचं वेळोवेळी मार्गदर्शन झालं. मी माझी सर्व सुख-दुःखं महाराजांना सांगते व त्यातून मला दुसऱ्या दिवशी माझ्या समस्या सुटायला मदत होते. श्रीमहाराजांनी केलेली गुरुसेवा, त्यांची शरणागती, त्यांचे प्रेम, त्यांचा गोरगरिबांविषयीचा कळवळा हे सर्व गुण पाहिले की मन अगदी भरून येते. पण हे सर्व मिळवून देण्यात महत्त्वाचा वाटा आहे तो सौ. प्रभाताई टेंभेकर (मावशी) यांचा. कारण वरील सर्व घटना त्यांचे घरीच घडली व त्यांनीच मला श्रीमहाराजांपर्यंत पोहोचविलं. तसेच नागपूर येथील एल्. आय. सी. कॉलनीतील श्री. बाबासाहेब कुलकर्णी व सौ. वहिनीसाहेब कुलकर्णी यांचेकडे श्रीमहाराजांचा उत्सवाचा आणि गुरुपादुकांचा लाभ झाला.

संसार माणसाला गुंतवून ठेवतो. पण त्यातील नश्वरता कळली म्हणजे माणूस परमार्थासाठी नेटाने प्रयत्न करतो. परमार्थाचा मुख्य हेतू अखंड आनंदमय आणि तृप्त जीवन जगता येणे हा असतो. दृढ श्रद्धेने व निश्चयात्मक बुद्धीने संतांना, सत्पुरुषांना 'सद्गुरु' मानून त्यांच्याच साक्षीने नाम घ्यावे. मनुष्य 'नराचा नारायण' होण्याकरिता परमार्थाकडे वळतो. नामाने इंद्रिये 'पुण्यशील' होतात. म्हणजे उद्धरतात व मुखी नाम येते. हात जुळून येतात व पाय तीर्थक्षेत्री चालू लागतात. निश्चयात्मक नामाचे सातत्यपूर्ण स्मरण केल्यास संसार दुःखे ओलांडून सुखाच्या पैलतीरी जाता येते.

महाराज म्हणतात, 'संसार जेवढ्यास तेवढा करावा. अंतःकरणातील पालट झाला पाहिजे. मनाला उलटे केले की नामच येते. भगवंतांनी भगवद्गीतेत सांगितलेच आहे, 'ह्या मनाचे एक खूप चांगले आहे. ते ज्या ठिकाणी जाते तेथे ते सोकावते. त्याला जर चांगल्या जागी नेले व नामस्मरणात रंगवून टाकले तर नरदेहाचे सार्थक होऊन, त्याला परिसस्पर्श होऊन जीवनाचे सोने होईल.' ईश्वर प्राप्तीसाठी जो प्रयत्न करतो त्या प्रयत्नांमुळे भगवंताला आनंद होतो म्हणून उपासक व्हावे.

थोरल्या राममंदिरात एकदा महाराज बसलेले असताना सर्वांना म्हणाले, 'समजा तुम्हाला राम भेटला व काहीतरी माग म्हणाला तर काय मागाल ?' तेव्हा कुणी काहीच बोलेना. तेव्हा महाराजच म्हणाले, 'मी-माझी जाणीव, मीपणाची जाणीव नाहीशी कर, असं मी मागेन. कारण ही मीपणाची जाणीव परमार्थात फार घात करते. ती समूळ नष्ट झाल्याशिवाय परमार्थात प्रगती होणार नाही.'

श्रीमहाराजांचे सांगणे आहे, 'सद्गुरुंच्या आज्ञापालनासारखा

भगवंतापर्यंत चटदिशी पोहोचवणारा दुसरा मार्ग नाही. तो मात्र साधला पाहिजे. जो आज्ञा पालन करतो, त्याचा अहंकार न कळत मरतो. शिवाय आज्ञा पाळली म्हणजे जबाबदारी सद्गुरुवर जाते. म्हणून त्यांची 'आज्ञा' म्हणून नाम घ्यावे. सत्पुरुषांची बुद्धी सर्व जाणणारी व निःस्वार्थी असते म्हणून त्यांच्या सांगण्याप्रमाणे वागण्यात आपले कल्याण असते. आज्ञा पाळण्याचे हे मर्म आहे.

योगाने जे साधते ते अखंड नामस्मरणाने साधते यांत संशय नाही, हे वामनराव पोतनीसांच्या उदाहरणांवरून दाखवून दिले आहे. ज्याला नामाची चटक लागली त्याच्यावर रामाने कृपा केली हे निश्चित समजावे. पण त्यासाठी स्वतः नामामध्ये मुरले पाहिजे. चित्ताची व चैतन्याची मिठी पडली की सर्व सृष्टी - दृष्टी बदलून जाते. अशा भक्ताला 'तयाते मी माथा मुकुट करी' असे आश्वासन भगवंत गीतेत देतात.

नामस्मरणाच्या योगाने आनंदाचा व समाधानाचा लाभ सहज होतो यात शंका नाही. श्रीमहाराज सांगतात, 'ताजी जिलबी कल्पनेने खाण्यापेक्षा शिळ्या जिलबीचा तुकडा प्रत्यक्ष खाण्यामध्ये जास्त समाधान आहे. त्याप्रमाणे योगापेक्षा नामस्मरणाने माणूस पटकन देवापर्यंत पोहोचतो. भगवंताच्या नामाचा आनंद उपाधिरहित आहे. म्हणून सतत नामात असावे.

श्रीमहाराजांच्या जीवनाचा एकेक पैलु पाहताना असं जाणवतं की महाराजांचे जीवन अत्यंत विलक्षण आहे.

'भाऊसाहेब फॉरेस्ट' यांना महाराजांचे विलक्षण व्यक्तित्व बघून त्यांचे चरित्र लिहावे असे वाटले. पण महाराजांनी ते पहायला मागून फाडून टाकले. महाराज म्हणाले, 'संतांचा चरित्रकार जन्माला यावा लागतो. जो नामात रंगला व ज्याला स्वतःचा विसर पडला त्यालाच माझे चरित्र कळेल. देहाच्या कोणत्याही अवस्थेत जो भगवंताचे अखंड अनुसंधान ठेवेल तोच संतांचे मर्म जाणेल. स्वतः भगवंताला चिकटल्याशिवाय दुसरा तसा जुळलेला आहे किंवा नाही हे कळत नाही. म्हणून संतचरित्रकाराने स्वतः नामात रंगून जावे व नंतर त्यांची आज्ञा घेऊन चरित्र लिहावे.'

छोट्या गोष्टींतून मोठे तात्पर्य सांगण्याची केवढी ही हातोटी !

श्रीमहाराज नाम घेण्याच्या बाबतीत सांगतात - 'पहिल्यांदा प्रपंचातील वस्तू हवी म्हणून भगवंतावर प्रेम करायला लागावे. चिकाटीने प्रेम वाढवावे. म्हणजे त्या वस्तूचे महत्त्व निघून जाते व भगवंत तेवढा शिल्लक राहतो. मग एकदा धरलेल्या भगवंताला कोणत्याही परिस्थितीत सोडू नये. म्हणून मी नाम घेत जा असे सांगतो कारण नामानेच हे सर्व साधते.'

'नामाहून दुजे काही । सत्य त्रिवाचा नाही ।
निर्हेतुक घ्यावे नाम । जेणे जोडेल आत्माराम ॥'

सगुणाची उपासना, नामस्मरण आणि अन्नदान ह्या गोष्टी महाराजांना अत्यंत प्रिय होत्या. 'तुका म्हणे झरा । आहे मुळचाच खरा॥' हे वचन महाराजांना तंतोतंत लागू आहे. म्हैसूरजवळ चिंतामणी येथे श्रीमहाराजांनी रामाची स्थापना केली. त्या वेळी प्राणप्रतिष्ठा करण्याचे वेळी महाराजांनी अत्यंत कळवळ्याने व आर्ततेने पुढील अभंग म्हटला-

'येरे येरे रघुनाथा । तुझे चरणी माझा माथा ॥ १ ॥
तूचि माझा मातापिता । तुजवीण नाही त्राता ॥ २ ॥
जीव झाले कष्टी फार । कृपा करी रघुवीर ॥ ३ ॥
तुझे चरणी माझा माथा । कृपा करी रघुनाथा ॥ ४ ॥
दीनदास येई काकुळती । तुजविण नाही प्रीति ॥ ५ ॥
यावे यावे रघुनाथा । तुमचे चरणी माझा माथा ॥ ६ ॥

एकदा एका राजाने कैदेतील बंदीजनांची भेट घ्यायचं ठरवलं. सर्व कैद्यांना आनंद झाला. राजा प्रत्येकाची अडचण समजून घेऊ लागला. कुणी भाकरी जास्त मागितल्या. कुणी आंथरुण-पांघरुणाची व्यवस्था करून मागितली. पण एक कैदी असा निघाला की तो म्हणाला, मला ह्या सेवकांकडून धक्के मारून कैदेतून काढा. अशा संसाररूपी कैदेत आपण राहत असतो व त्यातच आनंद मानून असतो. त्यातून सुटण्याकरिता व भगवंतापर्यंत पोहचण्याकरिता नामस्मरणासारखे अत्यंत सोपे व सुलभ साधन असताना नामाची काळजी घ्यायला हवी. म्हणजे काळजी करण्याची वेळच येणार नाही.

मला श्रीमहाराजांची काही बोधवचने अत्यंत आवडली ती अशी-

१) नामात आनंदाशिवाय दुसरे काही नाही.

२) नाम म्हणजेच भगवंत होय.

३) नामात गोडी उत्पन्न होण्याकरिता त्यात थोडी श्रद्धा घाला.

४) 'तुम्ही घ्यावे नाम । म्हणजे होईल तुमचे काम ।'

५) समाधान ही वस्तू फक्त भगवंताजवळच मिळते.

६) भगवंताचे प्रेम हे एक वेड आहे. ते ज्याला लागेल तो भाग्याचा खरा. समाधान ही भगवंताची देणगी.

७) म्हातारपणी मन आणि शरीर फार नाजूक बनते. त्या वेळी शरीरसुद्धा बरे राहायला 'आनंद' हे फार मोठे औषध आहे. आनंद हा शाश्वत आहे.

८) प्रपंचातील अनुकुल परिस्थितीपेक्षा प्रतिकूल परिस्थिती हीच परमार्थाला जास्त उपकारक आहे.

९) सदाचरण हा परमार्थाचा पाया आहे.

१०) सर्व रोगांना एक अगदी घरगुती, रामबाण औषध गुणकारी आहे ते म्हणजे कशाचीही काळजी करू नये. ज्याप्रमाणे फार उकाडा झाला की पाऊस पडतो त्याप्रमाणे खरी तळमळ उत्पन्न झाली की ज्ञान प्रगट होते. तळमळ व ज्ञान ही एकाच दोरीची दोन टोके आहेत.

सौ. माधुरी नाकाडे
इ. एस. आय. एस. हॉस्पिटल क्वार्टर्स,
मानेवाडा रोड, सोमवार पेठ,
नागपूर ४४० ००९

# नामाचा महिमा सांगणारे ब्रह्मचैतन्य श्रीगोंदवलेकर महाराज

श्री. [illegible] शिंदे

साहित्य विशारद, ज्योतिष विशारद. ज्योतिषपंडित, ज्योतिषभास्कर, [illegible] विशारद व ज्योतिष महामहोपाध्याय (संपूर्ण भारत), सामाजिक ज्योतिष विषयक वेगवेगळ्या मासिकांत, वृत्तपत्रांत लेखन, सहसंपादक-स्नेहांकित व इंद्रायणी काठी, नागरी संरक्षण दलात [illegible], वायरलेस ऑपरेटर व ऑर्गनायझर - भारत-पाक १९७१ च्या युद्धात उत्तम कामाबद्दल ब्रॉंझ व सिल्व्हर मेडल प्रदान - अखिल भारतीय ज्योतिष संमेलनात, सन्मान व पुरस्कार.

वाचकांनो ! आतापर्यंत कुंडलीवरून अध्यात्म शोध कसा घ्यावा ह्या संबंधात अनेकदा अनेक ठिकाणी विवेचन आलेले आहे. साधारणपणे अध्यात्म योगासाठी मात्र गुरु, शनि, केतू हे शुभ फल देणारे ठरतात. तसेच ह्या प्रकरणी कुंडलीतील प्रथम, पंचम, भाग्य आणि चतुर्थ, अष्टम, व्यय ह्या स्थानांना विशेष करून महत्त्व असते. केतू हा अध्यात्म तृष्णा वाढवितो. कुंडलीतील पंचम तसेच दशम स्थानातील ग्रह आणि लग्न, भाग्य दशमस्थान जर बलवान असेल तर व्यक्ति निश्चितपणे धर्मशास्त्र व वेदांत पारंगत होऊ शकते. मंगळ, गुरु आणि शनि ह्या राशीची जन्म लग्न असून भाग्यस्थानी गुरु असता व्यक्ती धार्मिक वृत्तीची असते. पंचम आणि व्यय स्थानांचे स्वामींचा नवम पंचम योग ईश्वर भक्ती, नामाकडे आणि संन्यास वृत्तीकडे व्यक्ती जाऊ शकते.

### अध्यात्म योगासाठी ग्रहस्थिती

रवि, चंद्र, बुध, गुरु आणि हर्षल या ग्रहांचे युति, लाभ, नवपंचम असे प्रथम दर्जाचे योग - व्यक्तिला बुद्धिच्या शक्तीवर भूत-भविष्य जाणण्याची उत्तम शक्ती देतात. धनु, मकर, कुंभ, मीन ह्या राशी अध्यात्मिक असल्याने त्यांना अध्यात्म योगाकरिता तेवढेच महत्त्व आहे. असे महत्त्वपूर्ण योग ज्या ज्या व्यक्तिंच्या कुंडलीत होतात त्या व्यक्तिंचा ओढा हा परमार्थाकडे निश्चितपणे असतो. संसारात ह्या व्यक्ती सहसा रमतच नाहीत. आजच्या लेखात ज्या थोर अशा अध्यात्म क्षेत्रात प्रगती केलेल्या व्यक्तिंच्या कुंडलीबाबत आपण थोडे विवेचन करणार आहोत.

### नामाला महत्त्व कसे ?

नामाला किती महत्त्व आहे आणि त्याचे नक्की फायदे काय ? हे अनुभवाशिवाय कळत नाही. नवीन जन्म झालेल्या बालकाचा देखील आपण पालकारोहन समारंभ करून त्याचे विशिष्ठ असे नाव ठेवतो. ठराविक नाव घेतले की, अमुकच व्यक्ति लक्ष देणार, म्हणजेच मनुष्य जन्मात नामाला अनन्य साधारण महत्त्व आहे. जर साध्या नावाचा उल्लेख केल्यावर महत्त्व कळतं तर त्या विधात्याच्या, ईश्वराच्या नावाला किती महत्त्व असेल, हे ज्यांना समजले ते श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर यांनी नामजपालाच का महत्त्व दिले तेदेखील तुम्हाला कळून येईल.

### संतांना महत्त्व का आहे ?

संतांना महत्त्व का आहे ? तर तसे म्हटले तर भगवान सर्वांच्या हृदयात आहे. परंतु संतांच्या हृदयात तो फुलतो, नाचतो कारण त्यांचे अन्न सेवन हे अत्यंत सात्त्विक असते. अन्नाने बुद्धी तयार होते आणि म्हणूनच प्रेमाने केलेला, दिलेला, वाढलेला, प्रसाद हा मात्र प्रत्येकाने घ्यावा त्याने बुद्धी शुद्ध होते. तेव्हा संतांची बुद्धी शुद्ध असते विचार पवित्र असतात. कारण त्या विचारामागे तपश्चर्या आणि अनुभव असतो. ज्या विचारधारेमुळे भगवंतापर्यंत पोहचण्याच्या व्यवस्थित अशा बांधलेल्या पायऱ्या आहेत, ज्या हजारो वर्षांच्या विचारधारेला काही परंपरा आहे. तपश्चर्येचे पाठबळ आहे. जी अनुभवावर उभी आहे ती विचारधारा संतांनी स्वतःच्या जीवनात साकार केलेली आहे. म्हणूनच संत हे पवित्र मानले गेलेले आहेत.

### ॥ श्रीगोंदवलेकर महाराज जन्मपत्रिका ॥

अशा एका पवित्र संताची कुंडलीच आपण पाहू या ! त्यातील ग्रहयोग काय सांगतात व अध्यात्म मार्गाकडे ओढ निर्माण होण्यामागे असे कोणते वैशिष्ट्यपूर्ण ग्रहयोग आहेत ते पाहू या !

॥ श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर ॥ यांची जन्मकुंडली -

जन्म दिनांक : १९ फेब्रुवारी १८४५

जन्म वेळ : सकाळी ९=००

माघ शुद्ध - १२, शके १७६६, बुधवार

**जन्मकुंडली**



महाराजांची कुंडलीच मीन लग्नाची असून गुरु हा ग्रहदेखील लग्न स्थानीच आहे. गुरु, चंद्र व मंगळ, राहू यांचा नवपंचम योग कुंडलीत आहे. लग्नेश दशमेश गुरु मीन राशीचा लग्नी असल्याने नामजपाकडे प्रचंड ओढ ! लग्न आणि भाग्यस्थान बलवान असल्याने धर्मशास्त्र पारंगत ! लग्नी गुरु असल्याने व्यक्ति धार्मिक वृत्तीची ! शनि, गुरु, हर्षल, नेपच्यून ह्यांचे लग्न तसेच चंद्र अगर राहू केतू बरोबर होणारे योग अध्यात्म आवड देणारे ठरतात. वरील कुंडलीत गुरुचे मीन लग्न असून तेथेच गुरु त्याचा चंद्राचे बरोबर नवपंचम योग आहे. तर शनि, गुरु, लाभ योग ! केतू गुरु लाभयोग आणि चंद्र-केतूचादेखील लाभ योग कुंडलीत आहे !

### ग्रहयोग काय सांगतात ?

चंद्र हा ग्रह पंचमस्थानी कर्केचा असून त्याचा केतूबरोबर लाभ योग असून पंचमातील चंद्रावर गुरुंची पूर्ण दृष्टी आहे; त्यामुळे अध्यात्म विद्येची प्रगती होऊ शकली. पंचमेश चंद्र, दशमेश गुरु ह्यांचा नवपंचम योग असल्याने धर्मशास्त्र पारंगत ! शनि केतूचा नवपंचम योग ! मंगळ-राहू गुरु यांचा नवपंचम योग ! चंद्र-मंगळ-राहू नवपंचम योग ! भाग्यशाली पंचमस्थान भाग्यस्थान बलवान आहे. पंचमातील चंद्र चांगली बुद्धि देतो तो मनाचा कारक आहे तर भाग्यातला मंगळ पराक्रम, दानशूरता, दानधर्म करणारा आहे. लग्नी मीन गुरु असल्याने नामजपाकडे प्रचंड ओढ ! महाराजांचा नाम जप करणाऱ्यांना तर लाखमोलाचा संदेश आहे, ते म्हणतात -

### नामजपाने साक्षात्कार होतोच

'स्त्री जशी आपल्या गर्भाला अति काळजीपूर्वक जपते, त्याचप्रमाणे श्रीसद्‌गुरुंनी दिलेल्या नामाचे जतन केल्यास याच जन्मामध्ये भगवंताचे सानिध्य खात्रीने अनुभवास येते. नामामध्ये गुरुकृपा व भगवत्कृपा यांचा समावेश आहे; म्हणूनच नाम हे प्रेमाने, निश्चयपूर्वक, मनापासून, उत्साहाने, चिकाटीने आणि नियमाने घ्यावे हेच जास्त महत्त्वाचे आहे. नामाला नीतीची, सदाचरणाची आणि कर्तव्याची जोड देणे आवश्यक आहे; अशा प्रकारे नामाचा अभ्यास करणाऱ्यास साक्षात्कार झाल्याशिवाय राहणार नाही.

### जप होता तेरा कोटी, स्वये भेटेन मी जगजेठी

श्रीगोंदवलेकर महाराजांनी आपल्या राहत्या घरातच थोरले श्रीराममंदिर स्थापन केलेले आहे. ते म्हणायचे, 'जो मी सांगितल्याप्रमाणे वागेल त्याचे काम मी रामाचा हात धरून त्याच्याकडून करवून घेईन. कारण रामानेच हे काम करायला मलाच सांगितलेले आहे.' दुर्गुणी व्यक्तिबद्दल त्यांना सदैव काळजी असे. त्याचे अंतःकरण न दुखविता अगर त्याला प्रेमाने वश करून त्याचे योग्य दोष दाखवून सुधारणेच्या मार्गाला लावण्यात महाराजांची हातोटी होती. कुंडलीतील लग्न, पंचम, भाग्य स्थान पहा, कळून येईल. आपणही काही जप करतो, तोदेखील थोडाथोडका नाही तर तेरा कोटींपर्यंत सुद्धा करतो; पण - 'जप होता तेरा कोटी, स्वये भेटेन मी जगजेठी' या भगवंताच्या वचनाचा कित्येकांना प्रत्यय येतो. काहींना तेवढा येत नाही; परंतु प्रत्यय येत नाही असे मात्र घडत नाही. समर्थ रामदासांनाही प्रत्यय आला. ईश्वर साक्षात्कार झाला. म्हणूनच ते म्हणतात, 'हे तो प्रचितीचे बोलणे । आधी केले मग सांगितले' असा आत्मविश्वासाचा निर्वाळा त्यांनी दिला. त्यामुळे तेरा कोटी जपाची परंपरा सुरू झाली. त्याचा खरा अनुभव महाराजांनी घेऊन उभा जन्मच नामप्रचारार्थ खर्ची घातला. ते म्हणतात, 'मनाच्या कानाने नाम ऐकावे म्हणजे एकाग्रता निश्चित होऊ लागते; कारण 'संकल्प विकल्पात्मकं मनः' अशी मनाची व्याख्या आहे. संकल्प, विकल्प करणे हा तर मनाचा धर्मच आहे. म्हणूनच साधकाने सतत जागृत राहून ज्या ज्या वेळी मन नामावरून बाजूला जाईल त्या त्या वेळी त्याला पुनः नामावर आणले पाहिजे.'

### देवाशी एकरूप होणे प्रक्रिया

नामासंबंधात गुरुदेव रानडे देखील म्हणतात की, 'दिव्यशक्तियुक्त नाम हे देवाचे प्रतीक आहे - म्हणून नामस्मरण ही देवाशी एकरूप होण्याची प्रक्रिया आहे.' (Nama is a symbol of God, Carrying spiritual divine power, and therefore Nama-Smaran is the process of constant identification with the infinite) नामातच सर्व काही आहे असे साधकांना सांगणाऱ्या श्रीसद्‌गुरु ब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकरांनी सारा जन्मच नाम प्रचारार्थ घालविला आहे. त्या ब्रह्मचैतन्य मूर्तीस माझा साष्टांग नमस्कार, करून लेख संपवितो.

'जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला ।
जयाने सदा वास नामात केला ।
जयाच्या मुखी सर्वदा नामकीर्ती ।
नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ती ।।'

श्री. पंडित हिंगे,
अमरबाग, गाडीतळ, हडपसर, पुणे ४११ ००२८.

- **माझे गुरु माझे कल्याणच करतील अशी ज्याची खात्री आहे तो नातेवाईकांबद्दल तक्रार करणार नाही.**
- **मनुष्य सतत उपासनेत राहिला तर परमात्मा त्याचे प्रारब्ध टाळणार नाही. परंतु अतिरेक होऊ देणार नाही.**
- **ब्रह्मचारी किंवा संन्यासी ब्रह्मनिष्ठापेक्षा गृहस्थ ब्रह्मनिष्ठ मला अधिक पसंत आहे.**
- **भगवंताशिवाय सत्यत्वप्रतीति येणे हा प्रपंच व सर्वत्र भगवंतच आहे अशी प्रतीति येणे हा परमार्थ.**

# सहज बोलणे । हेचि उपदेश ॥

**डॉ. मनोहर प्र. वर्टीकर**

*डी. ए. एम. डी., ॲनेस्थेरीस्ट. श्रीमहाराजांचे बरेच वर्ष साधक*

भारत देश हा संतांचा देश समजला जातो. भारतात जेवढे संत जन्माला आले तेवढे इतर सर्व राष्ट्रात मिळूनही जन्माला आले नसतील. प्रत्येक संताची देवाची प्राप्ती करून घेण्याची वेगवेगळी तऱ्हा असते. मोठे मोठे ज्ञानी पुरुष आपल्या शिकवणीला योग म्हणतात. उदाहरणार्थ कर्मयोग, प्रेमयोग, कुंडलिनी योग, पूर्णयोग, महायोग इत्यादी. श्रीगोंदवलेकर महाराज आपल्या शिकवणीला 'सहज-योग' म्हणत. 'नामस्मणाने' 'मी' ला बाजूला सारून तेथे भगवंताला ठेवले की काम झाले. 'मी' च्या जागी भगवंत विराजमान झाला की जीवन ही साधना बनते. राम कर्ता ही भावना होते. मग माझ्या डोळ्यांनी भगवंत पाहतो. माझ्या कानांनी तो ऐकतो, माझ्या तोंडाने तो खातो व बोलतो. नव्हे, माझे अंतरंग व बहिरंग भगवंताने भरून जाते. या चालत्या-बोलत्या समाधीलाच 'सहज-योग' म्हणतात.

श्रीमहाराज नेहमी म्हणत की, भगवंत हा कष्टसाध्य नसून सहजसाध्य आहे. फक्त त्याचे नामस्मरण आपण सतत केले पाहिजे. भगवंताचे अनुसंधान सहजपणे कसे घडेल हे श्रीमहाराज अगदी सहजपणे सांगून जात. त्यांचे बोलणे इतके सोपे, तार्किक असे की ऐकणाऱ्याच्या हृदयाला जाऊन भिडे.

श्रीमहाराजांना लोकांविषयी इतके प्रेम वाटत असे की, प्रत्येकाला 'श्रींचे माझ्यावर सर्वात जास्त प्रेम आहे.' असे वाटते व त्यामुळेच सर्वजण आपल्या मनातील शंका निःसंकोचपणे श्रींना विचारत.

श्रीमहाराज आपल्यासाठी किती झटतात हे बघून श्रींना काहीतरी द्यायची प्रत्येकाचीच इच्छा असे. एकाने सरळ श्रींनाच 'तुम्हाला काय देऊ ?' असे विचारता, श्री म्हणाले, 'कोणालाही त्याच्याकडे जे नसेल ते दिले, तर त्याला खरा आनंद होईल, नाही का?' 'मी कर्ता आहे' ही भावना माझ्याकडे नाही, तेव्हा तुम्ही तुमची 'मी कर्ता' ही भावना मला देऊन टाकावी. त्याने मला आनंद होईल व तुमचेही कल्याण होईल.'

गोंदवल्यावर दर्शनास आल्यावर आजूबाजूची तीर्थक्षेत्र बघून येण्याची इच्छा कित्येकांना होत असे. श्रींची परवानगी मागितल्यावर श्रीमहाराज म्हणत, 'गोंदवल्याला येऊन समाधान झाले नाही का ? इथे आल्यावर आता काही करायचे उरले आहे, असे वाटता कामा नये. गुरु एकदा भेटला की, आता करावयाचे काही कर्तव्य उरले नाही, असे वाटले पाहिजे. तरच गुरु भेटल्याचे सार्थक केले असे म्हणता येईल.' किती सहजपणे त्यांनी गुरुभेटीचे महत्त्व समजवले.

रामाजवळ थोडक्यात काय मागायचे हे सांगताना श्रीमहाराज म्हणत, 'समाधान दे.' एवढेच मागावे. आता समाधान देण्यासाठी आवश्यक त्या वस्तू देण्याची जबाबदारी रामावर आली. तो वस्तू तरी देईल किंवा त्या वस्तूतील आपली आसक्ती काढून टाकेल. दोन्ही बाजूने आपला फायदाच आहे. आहे की नाही गंमत !

प्रपंच व परमार्थ यावर विद्वान लोकांनी कितीतरी पुस्तके लिहिली आहेत. पण श्रीमहाराज एका वाक्यात प्रपंच व परमार्थाची ओळख करून देतात. 'परमात्म्याच्या संगतीत विषयात राहणे याचे नाव परमार्थ, तर विषयाच्या संगतीत परमात्म्यापासून वेगळे असणे याचे नाव प्रपंच.' भगवंताच्या स्मरणात प्रपंच करणे म्हणजेच परमार्थ असे त्यांचे म्हणणे असे व त्यामुळेच त्यांनी कोणाला प्रपंच सोडायला, संन्यास घ्यायला सांगितले नाही. प्रपंच सोडण्यापेक्षा प्रपंचातली आसक्ती सोडा असे ते म्हणत.

आपल्याला समाधानात राहायचे असेल तर आपल्याला हव्या असणाऱ्या वस्तूंची आपण यादी करू लागलो तर ती कधीच पूर्ण होणार नाही. म्हणजेच आपण कधी समाधानाची प्राप्ती करून घेऊ शकणार नाही का ? आपली ही शंका दूर करताना श्रीमहाराज सांगतात, 'सुख हे वस्तूंवर अवलंबून असते, ते परावलंबी असते. दुसऱ्याकडून मिळवायचे ते सुख, स्वतःकडूनच मिळवायचे ते समाधान. एखादा मनुष्य शारीरिक दृष्ट्या सुखी नसेलही. पण मानसिक दृष्ट्या सुखी असू शकेल, त्यालाच समाधान म्हणतात. 'आता एवढे ऐकल्यावर आपल्याला समाधान-प्राप्ती सहज नाही का ?

मोटार कारमधून भटकणे कोणाला नाही आवडणार ? पण म्हणून मोटार हेच काही सर्वस्व नाही. श्रीमहाराज म्हणतात, 'मोटार घेतली तरी पायी चालणाऱ्यांपेक्षा आपण कोणी मोठे आहोत असे समजू नये आणि कितीही अनुकूलता आली तरी त्यामुळे मी सुखी आहे, असे समजू नये.' श्रींचे पुढील वाक्य तर अतिशय मार्मिक आहे. 'मोटारीत नामस्मरण असावे, पण नामस्मरणात मोटार येऊ देऊ नये.'

एकाने गोंदवल्याहून निघताना श्रीमहाराजांकडे त्यांची आठवण म्हणून एखादी वस्तू देण्यास सांगितले. श्री सहजपणे म्हणाले, 'तुम्ही माझी आठवण राहावी म्हणून एखादी वस्तू मागता ? अहो ! माझे प्राणच मी तुम्हाला दिले आहेत. जेथे नाम, तेथे माझे प्राण. नामाव्यतिरिक्त कशातही मी नाही. माझे प्राण तुम्हाला कमी मोलाचे वाटतात का ? ते तुम्ही नीट सांभाळा.' खरोखर श्री म्हणत त्याप्रमाणे 'माझ्यातले नामाचे प्रेम कळले, तर मी नाहीच.'

राम, रामनाम व रामभक्त (हनुमंत व श्रीसमर्थ रामदास स्वामी) ज्यांना जीवापलीकडे प्रिय असते असे श्रीगोंदवलेकर महाराज जाताना म्हणूनच सांगून गेले - 'जेथे नाम, तेथे माझे प्राण । ही सांभाळावी खूण।।'

आपण बाकी काहीही न करता श्रींनी सांगितले म्हणून किंवा श्रींना आवडते म्हणून तरी फक्त मनापासून नामस्मरण केले पाहिजे. श्रींच्या अस्तित्वाची प्रचिती आपणास घडोघडी येईल याची खात्री आहे.

डॉ. मनोहर प्र. वर्टीकर
२१, पल्लवी टॉवर - २, मेमनगर,
फायर स्टेशनसमोर, नवरंगपुरा, अहमदाबाद - ९.

- **शुद्ध आचरण हा परमार्थाचा पाया आहे.**
- **नामाचा खरा अनुभव नामाशिवाय पाहू नये.**
- **मीपणाने मेल्याशिवाय परमेश्वराचे होऊन राहता येणार नाही.**
- **प्रपंचच काय पण जगातील कोणतीही वस्तू वाईट नाही. पण आम्हाला ती कशी वापरायची ते कळत नाही.**

## ब्रह्मचैतन्य सद्गुरु गोंदवलेकर महाराज यांची एक आठवण

महाराजांचे शिष्य गोंदवले येथे रामनवमीचे उत्सवासाठी अगर गुरुपौर्णिमेला जमत असत. त्या वेळेला अशी चर्चा चालायची की, आपण महाराजांना काहीतरी भेट देऊ या. पण हे महाराजांना विचारावयाचे कसे ? कारण महाराज काहीच मागत नाहीत. उलट देत असतात.

महाराजांचे कानांवर ही कुजबुज कुठून गेली कोणास माहीत ?

दुपारी महाराज म्हणाले, 'की अरे इकडे या.' सर्वजण जमले. महाराज म्हणाले की, 'तुम्ही मला काही द्यावे असे ठरवत आहात ना ? मग मी तुमचेकडून भेट स्विकारणार आहे. तुम्ही सर्वांनी पुढील महिन्यात येणाऱ्या चंद्रग्रहणाचे वेळी गोंदवल्याला या.'

चंद्रग्रहण लागणेपूर्वी महाराज सर्वांना घेऊन माण नदीवर गेले. सर्वांकडून 'श्रीराम जयराम जय जय राम' या नामाचा जप करवून घेतला. ग्रहण संपल्यानंतर महाराज म्हणाले, 'अरे तुम्ही सर्वांनी मला देणेसाठी इकडे यावे.' महाराज मध्ये उभे राहिले. सर्वजण सभोवार उभे राहिले. सर्वांच्या चेहऱ्यावर आनंद ओसंडत होता. आता आपण आपल्या वस्तू महाराजांना देऊ.

महाराज म्हणाले, 'मला तुमचे काहीही नको. पण ज्याने पाप केले असेल ते पाप त्याने मला अर्पण करावे.'

पुढे कोणीच आले नाही, हे काही सांगायला नकोच.

संकलक - श्री. अनंतराव करंदीकर

## रंगु कीर्तन भजनी

रंगु कीर्तन भजनी<br>
शब्दरूप अर्पूयाग<br>
कृष्ण गान गाता गाता<br>
ध्यानी मनी श्रीरंगाची<br>
इवली बालकृष्णमूर्ती<br>
परी मानवी जीवनात<br>
सर्व सृष्टिचा नीयंता<br>
त्रिभुवन दाऊनीया सांगे<br>
अशा ये रे बाल कृष्णा<br>
मन तृप्त होऊनि जाई<br>
आज धन्य धन्य वाटे<br>
आज माझा कृष्ण सखा<br>
आला आला वनमाळी<br>
सर्व गोपिकांचा मेळा<br>
मनी माझ्या कृष्ण वसे<br>
माझ्या साऱ्या जीवनाला

रमत जाउ वृंदावनी<br>
रस पंचरंगी भजनी<br>
मन विहरे वृंदावनी<br>
आर्त करू आळवणी<br>
जगताची सूत्रे हाती<br>
दाखविली मातृभक्ती<br>
म्हणे यशोदेसी माता<br>
नको रागावू मज आता<br>
माझ्या अंगणी रांगत<br>
तुझी मूर्ति मम ह्रदयात<br>
कृत कृत्यताही दाटे<br>
मला माझ्या जवळी भेटे<br>
ऐकू येई बासुरी स्वर<br>
पायि नादती घुंगूर<br>
नयनि नित्य कृष्ण दीसे<br>
त्याचा आशिर्वाद असे.

सौ. कमला ना. दातार



भवाचे भयें तापले लोक भारी । स्वयें येइ श्रीमारुती ब्रह्मचारी ।
धरी नाम श्रीब्रह्मचैतन्य येथें । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। १ ।।

किती गोकुळीं पाळिलीं वाचवोनी । किती तारिले रामनामा जपूनी ।
नसे देह साक्षात् तरी बोधिती ते । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। २ ।।

नसे स्थूल सूक्ष्मीं स्वयें रूप ज्यांचें । स्वयें हारिले क्लेश भक्ताजनांचे ।
अमर्याद ते प्रेम नामामृतातें । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। ३ ।।

जरी देहधारी वरी दिसताहे । परी अंतरीं रामरूपांत राहे ।
जया दृश्य श्रीरामरूपी दिसे ते । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। ४ ।।

करी गोकुळीं नित्य श्रीकृष्ण लीला । स्वयें दाविली तेचि भक्ताजनाला ।
असे नित्य आनंद हो पूर्ण येथें । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। ५ ।।

घरीं ऋद्धि सिद्धी तशी अन्नपूर्णा । प्रभू राघवाची कृपा सांग पूर्णा ।
किती अन्नसंतर्पणें नित्य येथें । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। ६ ।।

मुनी वाल्मीकी वर्णिली रामलीला । नसे शक्य तें पामराच्या मतीला ।
जगीं पाहती बालकांचेंच नातें । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। ७ ।।

जपा रामनामा घडे रामभेटी । असें बोलिले लोक कोट्योनुकोटी ।
जयाचेनि संगें सुखी विश्व होतें । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। ८ ।।

किती माधुरी रामनामीं असे या । नसे शक्य हो मन्मुखें हो वदाया ।
करी रंगसूनू पदीं अर्पणाते । नमस्कार श्रीब्रह्मचैतन्यमूर्ते ।। ९ ।।

श्रीब्रह्मचैतन्य महाराज की जय ।। जय जय रघुवीर समर्थ ।।

दासानुदास - गोपाळ रंगराव भरडी, पुणे.

## गोंदवले क्षेत्र महिमा

सत्पात्र भूमि गोंदवलें । सुक्षेत्र महीवरी बनलें ।। सद्गुरु ।।
अद्वैत मार्ग हा धरूनी । जन रामरूपीं त्वां केले ।। सद्गुरु ।।
श्रीरामलक्ष्मणसीता । भक्तास्तव धावुनि आले ।। सद्गुरु ।।
अति मानिति सर्वहि त्यांना । अयोध्यापुर हें बनलें ।। सद्गुरु ।।
चाल - शरयुतीरिं वाहे गंगा । वानरगण शिष्यासमुहें ।।
गुरु वसिष्ठ तूं सदया हे । पाहुनी चित्त (हें) रमलें ।।
रामात्मक प्रेमें डोले ।। सद्गुरु ।।

## रक्षितो ब्रह्मचैतन्य सद्गुरु

संसारसागरीं मोठे । नक्रकामादि मत्सरु ।
भक्तांसि गांजितां रक्षी । ब्रह्मचैतन्य सद्गुरु ।। १ ।।
बळेंचि ओढुनी नेतो । दुराशा दुष्ट कामना ।
स्मरतां रक्षितो तेथें । ब्रह्मचैतन्य सद्गुरु ।। २ ।।
स्वदासा रक्षितो प्रेमें । संकटीं पडतां सदा ।
भक्तासी आश्रयो मोठा । ब्रह्मचैतन्य सद्गुरु ।। ३ ।।
त्रिताप थोर संतापी । तनुमना जाळिती बहु ।
स्मरतां ताप नीवारी । ब्रह्मचैतन्य सद्गुरु ।। ४ ।।
शांतिस्वरूप धर्मात्मा । मुक्तयोगी तपोनिधीची ।
श्रीरामदास संसारीं । ब्रह्मचैतन्य सद्गुरु ।। ५ ।।
रामनामसुधा पाजी । बालका माउली जशी ।
कृपापाखर स्वयें घाली । ब्रह्मचैतन्य सद्गुरु ।। ६ ।।

- शुद्ध आचरण हा परमार्थाचा पाया आहे.
- नामाचा खरा अनुभव नामाशिवाय पाहू नये.
- मीपणाने मेल्याशिवाय परमेश्वराचे होऊन राहता येणार नाही.
- प्रपंचच काय पण जगातील कोणतीही वस्तू वाईट नाही. पण आम्हाला ती कशी वापरायची ते कळत नाही.
- खरे ध्येय तेच की जे गाठल्यावर आणखी काही गाठावयाचे राहात नाही. असे ध्येय एक भगवंतच आहे.
- प्रत्येकाला राम पाहिजे पण नुसता राम नको. काहीतरी अधिक म्हणजे प्रपंचासकट राम पाहिजे आहे. किंबहुना, प्रपंचात बिघाड न होता झाले तर रामदर्शन हवे आहे.

# गोंदवलेच्या पवित्र भूमीत

**प्रा. लक्ष्मण रघुनाथ मालुसरे**

*एम्. ए. एम्. एड., १७ वर्षे प्राध्यापक (एस.एन.डी.टी.). बीएड् पदवीमध्ये प्रथम. पुणे विद्यापीठात तर्कशास्त्र विषयात द्वितीय. भूगोल अभ्यास मंडळांच्या विविध संस्थांचे सदस्य. भूगोल विषयावर निबंध लेखन. विविध सामाजिक संस्थांशी संबंध व सामाजिक कार्य.*




महाराष्ट्र ही संतांची, कवींची, कलावंतांची व विचारवंतांची जन्मभूमी व कर्मभूमी आहे. या पुनीत झालेल्या मातीमध्ये जन्माला आलेल्या समाजमनास संतांच्या विचारांचा परिसस्पर्श झाला असल्याने त्यांना स्वधर्माची व सत्कर्माची जाणीव झालेली आहे. त्यामुळेच मराठी सारस्वताची बाग बहरलेली दिसते. अज्ञानाचा अंधार दूर करून ज्ञानाचा दीप हाती देण्याचे कार्य संतांनी केले असल्याने, संत हे महाराष्ट्राचे पंचप्राण आहेत. अशाच संतनामावलीमध्ये गोंदवलेकर महाराजांचे कार्य वैशिष्ट्यपूर्ण आहे.

सातारा जिल्ह्यातील माण तालुक्यातील गोंदवले बु ॥ हे महाराजांच्या पदस्पर्शाने पुनीत झालेले व महान समाजकार्याने प्रसिद्ध असलेले गाव आहे. गावाच्या उत्तरेकडून माण ही कृष्णेची उपनदी वाहते. गावास जाण्यासाठी पक्की सडक असून सातारा - कोरेगांव - पुसेगांव मार्गे गोंदवल्यास जाता येते. पुणे-बंगलोर महामार्ग क्र. चार च्या पूर्वेस सुमारे २५ कि. मी. अंतरावर हे गाव आहे. कोरेगाव रेल्वेस्टेशनला उतरूनही गोंदवल्यास जाता येते. फलटणवरून शिंगणापूर - दहिवडी मार्गे, कोल्हापूरवरून - कराड - शामगांव - पुसेसावळी वडूज मार्गे गोंदवल्यास जाता येते. हे गाव मान्सून हवामानात आहे. सह्याद्रीच्या पूर्वेस असलेल्या पर्जन्य छायेच्या भागामध्ये हे ठिकाण असल्याने सरासरी पर्जन्य ५० ते ७५ सेमी आहे. उन्हाळ्यातील तापमान ३५ अंश ते ४० अंश सेल्सियसपर्यंत असते. हिवाळासुद्धा फारसा कडक नसतो. महाराष्ट्रातील खेड्याची वैशिष्ट्ये गोंदवल्यास पहावयास मिळतात म्हणूनच महाराजांनी अशा शांत, प्रसन्न परिसरामध्ये आपले सेवाकार्य केलेले आहे. या परिसरामध्ये महाराजांचे भक्तगण आल्यानंतर येथील ऐतिहासिक, धार्मिक व भौगोलिक दृष्टीने संपन्न असलेल्या ठिकाणांची भेट आवश्यक ठरते.

## माहुली

माहुली हे पवित्र ठिकाण सातारा तालुक्यात असून कोरेगांव रेल्वे स्थानकापासून ईशान्येस ८ कि. मी. अंतरावर आहे. सातारा शहर ते माहुली येथे जाण्यासाठी महाराष्ट्र परिवहन मंडळाच्या बसेस, खाजगी जीप अथवा रिक्षा मिळतात. शासकीय विश्रामधाम सातारा येथे आहे. माहुली गाव हे कृष्णा व वेण्णा नद्यांच्या संगमावर आहे. कृष्णा नदीच्या पूर्वकाठावर श्रीक्षेत्र माहुली असून पश्चिम काठावर संगम माहुली आहे. श्रीमंत पंत प्रतिनिधिंनी १८ व्या शतकामध्ये या परिसरामध्ये अनेक मंदिरे बांधली. पूर्व घाटावरील म्हणजेच क्षेत्रमाहुली येथील घाट गीरी घाट म्हणून ओळखला जातो.या घाटावरील राधाशंकर मंदिर प्रसिद्ध आहे. मंदिराच्या समोरील दीपमाळ प्रेक्षणीय असून ती भोरसंस्थानच्या पंत सचिवांनी बांधलेली आहे. पूर्वघाटावर बिलवेश्वर मंदिर असून ते १७४२ मध्ये श्रीपतराव पंतप्रतिनिधींनी बांधले आहे. संगमेश्वर महादेव मंदिर हे नद्यांच्या संगमावर आहे. येथील मंगलाई देवीची देवळे प्रसिद्ध आहेत. मुख्य मंदिर वेण्णा नदीच्या दक्षिण तिरावर असून मंदिराच्या समोर मोठी घंटा आहे. राम, लक्ष्मण व सीतेच्या सुंदर मूर्ती आहेत. माहुली हे रामशास्त्री प्रभुणे यांचे जन्मगांव असून ते माधवराव पेशव्यांचे राजकीय सल्लागार होते. श्रीक्षेत्र माहुली येथे महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते.

येथे छत्रपती शाहू महाराजांची समाधी आहे. माहुलीपासून ४ कि.मी. अंतरावर उंच डोंगरावर जरंडेश्वर हे मारुतीचे देवस्थान आहे.

## शिंगणापूर

शिंगणापूर हे सातारा जिल्ह्यातील माण तालुक्यात आहे. कोरेगाव रेल्वेस्टेशनपासून ईशान्येस ६० किमी अंतरावरआहे. तसेच दहिवडीपासून जवळ आहे. शिंगणापूरला जाण्यासाठी पक्का रस्ता असून एस्.टी. बस अथवा खाजगी वाहनाने जाता येते. शिंगणापूर टेकडीवर वसलेले आहे. माण व नीरा नद्यांच्या दरम्यान असलेल्या टेकडीवर हे ठिकाण आहे.

दहिवडीवरूनही हे ठिकाण दिसते. येथे पावसाचे प्रमाण कमी असल्याने येथे वर्षभर जाता येते. टेकडीच्या शिखर भागात हे मंदिर असल्याने ते अधिक प्रेक्षणीय झालेले आहे. टेकडीच्या पूर्वेस मोठे तळे आहे. टेकडीवर चढताना प्रथम महादेव मंदिर लागते. खडकेश्वर महादेव मंदिर प्रसिद्ध आहे. मुख्य मंदिरामध्ये जाण्यासाठी चार प्रवेशद्वारे आहेत. मुख्य मंदिराच्या समोर शिवाजी महाराजांनी बांधलेली दीपमाळ आहे. दक्षिणद्वाराजवळ संभाजी महाराजांची समाधी आहे. मंदिराच्या नैऋत्येस सुसज्ज असा नगारखाना आहे. मुख्य मंदिर अत्यंत भव्य असून मंदिराच्या समोरील मोठा नंदी व बाजूच्या दोन घंटा वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

मुख्य मंदिराचा गाभारा केवळ खांबावर आधारीत असून तो ताराकृती आहे. मंदिराच्या भिंतीवर अनेक चित्रे कोरलेली असून त्यामध्ये नृत्य, शिकार, इत्यादी विषयांचा समावेश आहे. मंदिराचा कळस शंकूसारखा असून तो उंच आहे. मुख्य मंदिराच्या समोर बाली महादेवाचे सुंदर मंदिर आहे. मंदिराची देखभाल व पूजाअर्चा ही बडवे ब्राह्मण यांच्याकडून केली जाते. देवाचा घोडा हा मानाचा मानला जातो. चैत्र शुद्ध पंचमी ते पौर्णिमा दरम्यान शंभु महादेवाची मोठी जत्रा भरते. महाशिवरात्रीची जत्रा सर्वात मोठी असून या वेळी सुमारे १ लाख लोक जमतात.

शिंगणापूर हे नाव देवगीरीचा यादव राजा शिंगण (१२१० ते १२४७) वरून आलेले आहे. डोंगरमाथ्यावरचा भाग डम्बेल्ससारखा असून एका बाजूला मंदिरे तर दुसऱ्या बाजूस समाधीस्थाने आहेत. मंदिराकडून - समाधीस्थानाच्या बाजूकडे साद दिली असता प्रतिसाद मिळतो म्हणून यास 'इकोपाईंट' म्हणतात.

## चाफळ

चाफळ हे सातारा जिल्ह्यातील पवित्र व धार्मिक ठिकाण आहे. समर्थ रामदास स्वामींच्या वास्तव्याने पुनीत झालेली ही भूमी आहे. हे गाव साताऱ्यापासून ३५ किमी तर पुणे-बंगलोर महामार्गावरील उंब्रज गावापासून १६ कि.मी. अंतरावर आहे. कृष्णा नदीची उपनदी 'मान' हिच्या दोन्ही काठांवर हे गाव वसलेले आहे. समर्थ रामदासांनी नाशिकच्या पंचवटीवरून रामाच्या पादुका आणल्या व त्यांची विधीपूर्वक स्थापना केली. तसेच येथील राममंदिर व प्रभूरामचंद्रांच्या मूर्ती प्रेक्षणीय आहेत. हिन्दू धर्मातील अकरा मारुती स्थानकांपैकी दासमारुती व प्रतापमारुती अशी दोन मारुतीस्थाने चाफळला आहेत.

## कोयनानगर

सातारा जिल्ह्याचा पश्चिम भाग हा सह्याद्री रांगांचा निसर्गरम्य आहे. कृष्णेची उपनदी कोयना हिच्यावर धरण बांधून दक्षिण महाराष्ट्रास जलविद्युत पुरवठा केला जातो. राज्याला नवसंजीवनी देणारे जलविद्युत निर्मिती केंद्र कोयनानगर येथे आहे. डोंगराच्या पायथ्याशी पोफळी येथे जलविद्युत निर्मिती केंद्र आहे. कराडपासून कोयनानगर ४९ कि.मी. दूर आहे. येथे सरकारी विश्रामधाम असल्याने निवासाची उत्तम व्यवस्था आहे.

## निसर्गरम्य धोम

पुण्याहून ११० कि.मी. वर वाईपासून जवळ असलेला हा निसर्गरम्य जलक्रीडा केंद्र व धरण परिसर आहे. कृष्णा व वळकी या दोन नद्यांचा संगम व शांत परिसर मनाला मोहिनी घालतो. येथील मोकळी, स्वच्छ, प्रदूषण विरहित हवा, दूरपर्यंत दिसणारे डोंगर, मावळतीच्या संधी प्रकाशात चमकणारे चंदेरी पाणी, डोंगरांच्या क्षितिज रेषांमध्ये पर्यटक हरवून जातात. कमलगड, रोहिडेश्वर, जवळच आहेत. धोम गावातील प्राचीन नरसिंह मंदिर, पायऱ्यांचा सुंदर घाट व जवळचा नाना फडणीसांचा मेणवली येथील वाडा पाहून इतिहासकालीन वैभवाची साक्ष पटते. धोम धरणाचे निसर्गदेवतेने रंगविलेले चित्र दीर्घकाळ स्मृतींमध्ये ठेवूनच पर्यटक तेथून निघतात.

## औंध

हे खटाव तालुक्यातील ऐतिहासिक दृष्ट्या प्रसिद्ध गाव आहे. रहिमतपूर रेल्वे स्थानकापासून जवळ आहे. तसेच सातारा ते औंध किंवा गोंदवलेवरून वडूज - पुसेसावळी मार्गे औंध येथे जाता येते. सातारा-तासगाव रत्याने खिंड औलांडून गेल्यावर टेकड्यांनी वेढलेले हे गाव आहे. श्रीमंत पंत प्रतिनिधींच्या निवासाने ही भूमी पुनीत झालेली आहे. पंतांचा वाडा व तेथील वस्तूसंग्रहालय ही औंध गावची वैशिष्ट्ये आहेत. पंतप्रतिनिधी यमाई देवीची पूजा करत. यमाईचे मंदिर प्राचीन असून सुंदर आहे. औंध ही पंतांची राजधानी होती. श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी हे प्रमुख संस्थापक होत. यमाई टेकडीवर सुंदर म्युझियम आहे. सभोवती सुंदर बाग आहे. या संग्रहालयामध्ये जागतिक कीर्तिच्या वस्तू व चित्रे आहेत. या वस्तू व चित्र राजासाहेबांनी भारताच्या विविध भागांतून व युरोपमधून आणलेल्या आहेत. या संग्रहालयामध्ये राजासाहेबांनी स्वतः काढलेली प्रसिद्ध पेंटींग्ज आहेत. सध्या या संग्रहालयाची देखभाल शासनातर्फे केली जाते. येथील यमाई श्रीनिवास हायस्कूल व १८८० मधे सुरू केलेले अध्यापक महाविद्यालय या प्रसिद्ध संस्था आहेत. बागेतील ऋतुदर्शनाचे सौंदर्यवतीचे पुतळे पाहून निर्जिवता सजीव झाल्यासारखी वाटते.

## वाई

पुढे कृष्णा नदीच्या काठावरील एक पवित्र ठिकाण आहे. पुणे-खंडाळा-सुरूरवरून वाईस जाता येते. तसेच साताऱ्याच्या उत्तरेला सातारा - पांचवड - बावधन मार्गे वाईस जाता येते. वाठार रेल्वेस्टेशनपासून वाई जवळ आहे. सह्याद्री पर्वताच्या पायथ्याशी निसर्गरम्य परिसरात वाई हे ऐतिहासिक व शैक्षणिक शहर वसलेले आहे. वाईस दक्षिणेकडील काशी असेही म्हणतात. कृष्णा नदीवरील घाट व गणपती मंदिर प्रसिद्ध आहे. रामनवमीस होणारा येथील रथोत्सव प्रसिद्ध आहे. दरवर्षी कृष्णा माईची यात्रा भरते.

## म्हसवड

म्हसवड हे सातारा-पंढरपूर या रस्त्यावर आहे. कोरेगाव स्टेशनपासून किमी तर दहीवाडीपासून कि.मी. अंतरावर आहे. म्हसवड जवळच म्हसवड तलाव प्रसिद्ध आहे. म्हसवड हे माण नदीच्या पूर्व काठावर आहे. म्हसवड हे माण तालुक्यातील मोठे शहर आहे. म्हसवड हे माने-देशमुख यांचे गाव आहे. ते विजापूरच्या दरबारामध्ये मोठे शिलेदार होते. येथे कार्तिक महिन्यात सिद्धनाथाची व मार्गशीर्ष महिन्यात नागोबाची अशी दोनदा जत्रा भरते. नागोबाच्या जत्रेच्या वेळी गुरांचा मोठा बाजार भरतो. तेथे विरोबाचे मोठे मंदिर असून दररोज सायंकाळी ग्रंथाचे वाचन होते.

## पाल

हे कराड तालुक्यातील ठिकाण असून पुणे-बंगलोर महामार्गाच्या पश्चिमेला व महामार्गापासून जवळ आहे. महामार्गावरील उंब्रज गावाजवळील हे गाव खंडोबाच्या दैवतासाठी प्रसिद्ध आहे. या गावास राजापूर असेही म्हणतात. हे गाव तारला नदीच्या काठावर आहे. येथे पौष महिन्यात खंडोबाची मोठी जत्रा भरते. या उत्सवात खंडोबा व म्हाळसा यांचा विवाहसोहळा साजरा होतो. या यात्रेस २००० ते २५०० लोक जमा होतात. या गावास जाण्यासाठी महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाच्या बसेस किंवा खाजगी वाहतूक व्यवस्था उपलब्ध होऊ शकते. कराड हे सर्वात जवळचे रेल्वे स्टेशन आहे.

## कराड

कराड तालुक्याचे ठिकाण आहे. पुणे-बंगलोर महामार्गावरील एक महत्त्वाचे ठिकाण आहे. कोल्हापूरपासून ४० किमी अंतरावर आहे. कृष्णा व कोयनेचा संगम आहे. कराडचा कृष्णा घाट अतिशय रमणीय आहे. काटकोनात झालेला नदीचा संगम हे वैशिष्ट्य. कृष्णा घाटावर एकूण ५२ मंदिरे आहेत. यातील कृष्णामाईचे मंदिर काशीविश्वेश्वराचे मंदिर प्रसिद्ध आहे. संगमावर थोर नेते मा. यशवंतराव चव्हाण यांची समाधी आहे. परिसरातील १९ गुंहा प्रेक्षणीय आहेत.

## महाबळेश्वर

महाबळेश्वर, तालुक्यातील सह्याद्री पर्वताच्या घाटमाथ्यावरील रमणीय थंड हवेचे ठिकाण आहे. महाराष्ट्रातील आरोग्यधाम व थंड हवेच्या ठिकाणांपैकी पर्यटकांचे सर्वाधिक आकर्षण असणारे आल्हाददायक ठिकाण आहे. पुणे हे सर्वात जवळचे लोहमार्गावरील ठिकाण पुणे-वाई-पाचगणी-महाबळेश्वर सुमारे ११५ किमी अंतर रस्तामार्गाने जावे लागते. मुंबईहून-पनवेल-महाड-पोलादपूर-महाबळेश्वर हे २४७ किमी अंतर यावे लागते. मुंबई-पुणे-कोल्हापूर येथून महाबळेश्वरला जाण्या-येण्यासाठी महामंडळाच्या बसेस मिळतात. अनेक हॉटेल्स, पर्यटक निवास महाबळेश्वरला उपलब्ध आहेत. येथील जैवविविधता, प्राणी, पक्षी व वनस्पती मनाला भुरळ घालतात. मधमाशी, मँगोबर्ड, वाघ, चित्ता, माकडे व असंख्य प्रकारचे वृक्ष हे महाबळेश्वरचे खरे वैशिष्ट्य. नयनरम्य निसर्गाचे सान्निध्यात ऑर्थरसीट पॉईंट, केटस् पॉईंट, बॉम्बे पॉईंट, लॉडवीक पॉईंट पहाण्यात विशेष मजा असते. लिंगमळा, धोबी, छिनामेन्स धबधबा पहाणे, वेण्णा सरोवरातील जलविहार, जुने महाबळेश्वर मंदिरातील कृष्णा, वेण्णा, कोयना, सावित्री व गायत्री नद्यांचा उगम या महाबळेश्वरच्या आठवणी दीर्घकाळ लक्षात राहतात.

महाबळेश्वर जवळच 'तापोळा' हे नवीन जलक्रीडा केंद्र विकसित झालेले आहे.

## पाचगणी

वाईवरून महाबळेश्वरला जाताना पसरणीचा सुंदर घाटाचा रस्ता आहे. पाचगणी हे आरोग्यधाम आहे. येथील थंड, कोरडे हवामान अबालवृद्धांना मानवते. पाचगणीतील टेबललँड्, सिडनी पॉईंट, कांग्रा पॉईंट ही निसर्गरम्य ठिकाणे आहेत. कृष्णा नदीची नागमोडी वळणे पहाण्याजोगी आहेत. येथे घाटदेवीची यात्रा भरते. तसेच कार्तिक स्वामींची मंदिरे पहाण्याजोगी आहेत.

## गड (किल्ले)

सातारा जिल्हा हा गडांचा किंवा किल्ल्यांचा जिल्हा म्हणून ओळखला जातो. या जिल्ह्यातील महाबळेश्वर - पोलादपूर घाटमाथ्यावर वृक्षांनी वेढलेल्या निबीड वनांच्या प्रदेशात प्रतापगड आहे. समुद्रसपाटीपासून याची उंची ३,५४३ फूट आहे. पश्चिम व उत्तर सीमेवर उंच कडा आहेत. मोरो त्र्यंबक पिंगळे यांनी १६५६ साली गडाचे बांधकाम केले. शिवरायांनी याच गडावर अफजलखानाचा वध केला. गडावरील भवानी मातेचे मंदिर, हनुमान मंदिर व छत्रपती शिवाजी महाराजांचा पुतळा पाहण्यासारखे आहेत. विश्रामगृहाची सोय असून शिवछत्रपती प्रतिष्ठानतर्फे येथे अनेक उपक्रम केले जातात.

सदाशिवगड कराड तालुक्यात असून तो शिवाजी महाराजांनी बांधलेला आहे. टेकडीवरील महादेवाचे मंदिर प्रेक्षणीय असून तेथे श्रावण महिन्याच्या प्रत्येक सोमवारी मोठी यात्रा भरते.

चंदन व वंदन हे रहिमतपूर रेल्वे स्थानकाजवळील आणखी महत्त्वाचे किल्ले आहेत. वंदन गडाजवळील मरिआई मंदिर, टेकडीवरील सरकारवाडा पहाण्याजोगा आहे. चंदन-वंदन हे किल्ले शिवाजी महाराज, औरंगजेब, शाहू महाराज व पेशवे यांच्या ताब्यात होते.

याशिवाय मकरंद गड, रामदास स्वामींचे वास्तव्य असलेला सज्जन गड, कमळगड, केंजळगड, वसंत गड, सातारा शहराला लागून असलेला अजिंक्य तारा असे २७ किल्ले सातारा जिल्ह्यात आहेत. याशिवाय सातारा शहर, खिंडीतील गणपती, कास तलाव, ठोसेघर अशी अनेक प्रेक्षणीय स्थळे गोंदवल्याच्या परिसरात आहेत. पर्यटकांना ती भेटीसाठी सारखी खुणवित असतात.

प्रा. लक्ष्मण रघुनाथ मालुसरे
२१, दामोदर व्हीला, कोथरुड, पुणे २९.

# मानसपुजेत सद्‌गुरु श्रीगोंदवलेकर महाराज यांनी केलेला अनुग्रह

**शब्दांकन : श्री. मुरलीधर केशव फडणीस**



आमच्या आजीला श्रीमहाराजांनी देहात असताना अनुग्रह दिला होता. आमचे काका श्री. नारायण बळवंत फडणीस हे ही श्रीमहाराजांचे अनुग्रहीत. त्यांचेकडून व पू. श्री. तात्यासाहेब केतकरांकडूनही असे सांगणे होई की, 'फडणीस काकांना श्रीमहाराज, फडणीस साहेब म्हणून संबोधित. त्यांचा मुक्काम गोंदवले येथे बरेच वेळा असे. बरोबर थोडीशी मंडळीही असत. त्यामुळे त्यांचा मुक्काम श्रीमहाराजांचे घराजवळ असे. त्यांना अनुग्रह श्री. शिरवळकर महाराजांचा. मानसपूजा झाल्याशिवाय श्री. फडणीस काका जेवत नसत. एका मुक्कामात श्रीमहाराजांचे, 'गुरुमध्ये भेद नाही व सर्व सद्‌गुरु एकच' या विषयावर ५-७ दिवस निरूपण झाले.

श्री. फडणीस काकांना मानसपूजेत श्रीमहाराज दिसत व त्यांचे गुरुंचे दर्शन न झाल्यामुळे ते दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या दिवशीही जेवले नाहीत. सातवे दिवशी निरूपण संपल्यावर श्रीमहाराजांनी श्री. फडणीस साहेब व त्यांची मंडळी आज येथे श्रीरामाचा प्रसाद घेतील असे सांगून तशी व्यवस्था करण्यास सांगितले. श्री. फडणीस यांचे पान त्यांचे शेजारी मांडण्यास सांगून त्याप्रमाणे सर्वांना पानांवर बसावयास सांगितले.

नेहमीप्रमाणे 'जय जय श्रीराम' व 'वदनिकवळ घेता' हे झाले तरी श्री. फडणीस काका जेवण सुरू करेनात. तेव्हा श्रीमहाराज त्यांना म्हणाले, 'अजून ओळख पटली नाही का?' त्यांनी पाण्याचा तांब्या घ्यावयास सांगून त्यांचा हात धरून तुळशीवृंदावनाजवळ घेऊन गेले व तुळशीला पाणी घालून नमस्कार करावयास सांगितले. त्याप्रमाणे करताच श्री. फडणीस काकांना त्यांचे सद्‌गुरु श्री. शिरवळकर महाराजांचे दर्शन झाले व पुन्हा तुळशीस पाणी घालून नमस्कार केल्यावर श्रीमहाराजांचे दर्शन झाले. दोघेही येऊन पानावर बसले व प्रसाद घेतला. त्यांना सद्‌गुरु श्रीगोंदवलेकर महाराजांनी अनुग्रह देण्याचा अधिकार दिला होता.

माझे वडील पू. तात्या यांच्या चुलत चुलत्यांचा श्री. रघुनाथराव फडणीस यांचा उल्लेख प. पू. प्रा. के. वि. बेलसरे यांच्या श्रीगोंदवलेकर महाराज यांचे चरित्र या जुन्या पुस्तकात पान २४४ व २४५ वर आलेला आहे.

श्री. मुरलीधर केशव फडणीस,
'९' श्रीराम सोसायटी, उजनीनगर एरिया, सोलापूर ४१३ ००३.

**भजनाचा शेवट आला । एक वेळ राम बोला ॥**

**आजि पुण्य पर्व काळ । पुन्हा नाही ऐसीवेळ ॥**

**रामनाम वाचे बोला । आत्मसुखामाजी डोला ॥**

**दीनदास सांगे निका । रामनाम स्वामी शिक्का ॥**